# सुलभ श्रीमद्भागवत

## भाग २ रा

सुलभ श्रीमद्भागवत भाग १ ते ६ या प्रकाशनास
महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांचेकडून
अनुदान मिळाले आहे.
सदर ग्रंथाची किंमत त्यांनीच ठरविलेली आहे.

## स्कंध ४, ५ व ६

सन १९६४

किंमत ६ रुपये

# चतुर्थ स्कंधाची अनुक्रमणिका



# पंचम स्कंधाची अनुक्रमणिका

---

# षष्ठ स्कंधाची अनुक्रमणिका

अध्याय | विषय | पृष्ठें

॥ श्रीः ॥

# सुलभ श्रीमद्भागवत



## चतुर्थ स्कंध

## अध्याय १ ला

मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, आकूति, देवहूति व प्रसूति ह्या नांवांनीं प्रसिद्ध असलेल्या अशा तीन कन्या व प्रियव्रत आणि उत्तानपाद असे दोन पुत्र इतकीं अपत्यें स्वायंभुव मनूपासून शतरूपेच्या पोटीं जन्मास आलीं ॥१॥ त्यांपैकीं आकूतिनामक कन्या मनुराजानें रुचि ऋषीला दिली. आकूतीला जरी भाऊ होते, तरी (आपल्याला अधिक पुत्र असावे अशा इच्छेनें) तिचें दान करतांना मनूनें पुत्रिकाधर्मात *जसा संकल्प करतात, त्याप्रमाणें 'या कन्येला जो पुत्र होईल तो माझा' असा ठराव शतरूपेचें अनुमोदन घेऊन रुचिऋषीशीं केला होता ॥ २ ॥ तो भगवान् रुचि प्रजापति ज्ञानसंपन्न होता. त्यानें उत्तम प्रकारें ईश्वराचें ध्यान करून त्याच्या प्रभावानें आकूतीच्या ठिकाणीं एक पुत्र व एक कन्या अशी जुळी संतति उत्पन्न केली ॥ ३ ॥ त्यांपैकीं जो पुत्र होता, तो साक्षात् विष्णु असून त्यानें यज्ञ ह्या नांवाचें आपलें स्वरूप धारण केलें होतें आणि जी कन्या होती तिचें नांव दक्षिणा होतें. ती लक्ष्मीचा अंशावतार असून विष्णूपासून कधींहि वेगळी न राहणारी अशी होती ॥ ४ ॥ आपल्या कन्येला पुत्र झालेला ऐकून स्वायंभुव मनूला मोठा आनंद झाला, आणि दैदीप्यमान अशा त्या मुलाला तो आपल्या घरीं घेऊन आला. दक्षिणेला मात्र रुचिऋषीनें ठेवून घेतलें ॥ ५ ॥ दक्षिणा उपवर झाली असतां भगवान् यज्ञपति विष्णूनें, तिची आपल्यावर प्रीति आहे असें पाहून

---

*॥ अभ्रातृकां प्रदास्यमि तुभ्यं कन्यामलङ्कृताम् ॥

अस्यां यो जायते पुत्रः स मे पुत्रो भवेदिति ॥

'अंगावर अलंकार घातलेली ही कन्या मी तुला देतों; हिला बंधु नाहींत, म्हणून हिला जो मुलगा होईल, तो पुत्र माझा असावा' असें ठरवून कन्यादान करणें ह्याला पुत्रिकाधर्म असें म्हणतात.

तिच्याशीं विवाह केला. *ती नेहमीं आनंदी वृत्तीनें राहत असे व तिच्या समागमामुळें यज्ञाचेंहि मन संतुष्ट झालें. अशा रीतीनें राहत असतां यज्ञाला दक्षिणेच्या ठायीं बारा पुत्र झाले ॥ ६ ॥ तोष, प्रतोष, संतोष, भद्र, शान्ति, इडस्पति, इध्म, कवि, विभु, स्वह्न, सुदेव, रोचन असे हे बारा मुलगे होत. ॥ ७ ॥ हे दक्षिणेचे बारा पुत्र स्वायंभुव मन्वंतरांतील देव होत. ह्या सर्वांना तुषित असें सामान्य नांव होतें. मरीचिप्रभृति ह्या मन्वंतरांतील ऋषि होते व यज्ञ हा देवांचा अधिपति इन्द्र होता ॥ ८ ॥ मनुराजाला प्रियव्रत व उत्तानपाद ह्या नांवांचे दोन मोठे पराक्रमी पुत्र झाले. त्यांनीं आणि त्यांचे मुलगे, नातू व मुलीचे मुलगे यांनी त्या स्वायम्भुव मन्वंतराचें उत्तम प्रकारें पालन केलें ॥ ९ ॥ हे विदुरा, मनूनें आपली दुसरी कन्या कर्दमऋषीला दिली होती, त्यांचा इतिहास मी बहुतेक[१] पूर्वीं सांगितलेला असून तूं ऐकिला आहेच. ॥ १० ॥ त्या महासमर्थ मनुराजानें आपली प्रसूतिनामक तिसरी कन्या दक्षनामक ब्रह्मदेवाच्या पुत्रास दिली. त्या दक्षापासून प्रसूतीच्या ठिकाणीं जन्मलेली संतति त्रैलोक्यांत सर्वत्र पसरली आहे ॥ ११ ॥ कर्दम ऋषीनें आपल्या नऊ कन्या नऊ ब्रह्मर्षींना दिल्या, असें मी तुला पूर्वीं सांगितलें. आतां त्या कन्यांचा वंशविस्तार पुढें कसा झाला तें मी सांगतों. ॥ १२ ॥ कर्दमऋषीची स्त्री कला; तिला कश्यप आणि पूर्णिमा असे दोन मुलगे झाले. त्या दोघांच्या वंशानें हें जग भरून गेलें आहे ॥ १३ ॥ हे शत्रुतापना विदुरा, पूर्णिमाला विरज आणि विश्वग हे दोन पुत्र आणि देवकुल्या नांवाची कन्या, अशीं तीन अपत्यें झालीं. देवकुल्येनें श्रीभगवान् विष्णूचे चरण धुतले, त्यामुळें ती स्वर्गीची गंगानदी झाली ॥ १४ ॥ अत्रि ऋषीची स्त्री जी अनसूया, तिच्या उदरीं विष्णु, महेश्वर व ब्रह्मदेव या तिघांच्या अंशानें दत्त, दुर्वास व चंद्र, ह्या नांवांचे तीन पुत्र जन्मास आले ॥ १५ ॥ विदुर म्हणाला—हे गुरो मैत्रेया, जगाची उत्पत्ति, पालन व संहार करणारे जे ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर, हे श्रेष्ठ देव, त्यांनीं कोणतें अपूर्व कार्य करण्याकरितां अत्रि ऋषीच्या घरीं अवतार घेतला, तें तूं मला सांग ॥ १६ ॥ मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, अत्रि ऋषि ब्रह्मज्ञानी पुरुषांत श्रेष्ठ होता. ब्रह्मदेवानें त्याला सृष्टि उत्पन्न करण्यासाठीं प्रेरणा केली, तेव्हां तो तपश्चर्या करण्याचा निश्चय करून आपल्या पत्नीसहवर्तमान ऋक्ष नांवाच्या कुलपर्वतावर गेला ॥ १७ ॥ त्या पर्वतावरील अरण्यांत पुष्पगुच्छांनीं भरलेले असे अनेक पळसाचे व अशोकाचे वृक्ष असून त्यांतूनच निर्विन्ध्यानामक

---

*यज्ञ आणि दक्षिणा हीं भावंडें होतीं. तथापि यज्ञ हा विष्णूचा आणि दक्षिणा ही लक्ष्मीचा अवतार असल्यामुळें उभयतांचा विवाह झाला असें टीकाकार म्हणतात. मनु आणि शतरूपा हीं देखील भावंडेंच होतीं. वस्तुतः समाजाच्या प्राथमिक अवस्थेंत विवाहाचे निर्बंध नसतात, यास्तव मागाहून ते घालण्यांत आल्यावर पूर्वीच्या गोष्टीचें कांहीं तरी दिव्य कारणांनीं समर्थन करण्यांत येतें.

१ 'बहुतेक' असें म्हणण्याचें कारण त्यांच्या मुलींचे वंश अद्यापि सांगितले नाहींत. ते ह्याच अध्यायांत बाराव्या श्लोकापासून सांगण्यांत येतील.

नदी वाहत असल्यामुळें तिच्या उदकाच्या प्रवाहाचा नाद चोहींकडे घुमत होता ॥ १८ ॥ या अरण्यांत सुखदुःखादि द्वंद्वांचा त्याग करून, अत्रि ऋषि केवल वायुभक्षण करीत व प्राणायामाच्या योगानें आपल्या मनाचा निग्रह करीत शंभर वर्षेंपर्यंत एका पायावर उभा राहिला ॥१९॥ ही कडक तपश्चर्या करीत असतां, अत्रिऋषि 'जो कोणी या जगाचा नियंता आहे, त्यालाच मीं शरण आलों आहें. तरी त्यानें आपल्यासारखी संतति मला द्यावी' असें नित्य चिंतन करीत होता ॥२०॥ याप्रमाणें अत्रि ऋषीची तपश्चर्या चालली असतां प्राणायामरूपी इन्धनानें प्रदीप्त झालेला अग्नि त्याच्या मस्तकांतून बाहेर पडूं लागून त्रैलोक्याला जाळूं लागला. तेव्हां अप्सरा, ऋषि, गंधर्व, सिद्ध, विद्याधर आणि सर्प, हे ज्यांच्या कीर्तीचे वर्णन करीत आहेत असे जे ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर ते तिघेहि देव अत्रि ऋषीच्या आश्रमांत आले ॥२१॥२२॥ त्या वेळीं एका पायावर उभा राहून तपश्चर्या करणाऱ्या अत्रि ऋषीला, ते तिन्ही देवश्रेष्ठ आपल्या आश्रमांत येत आहेत असें पाहून मनापासून मोठा आनंद वाटला ॥ २३ ॥ मग नंदी, हंस व गरुड ह्या वाहनांवर बसलेल्या आणि त्रिशूळ, कमण्डलु व चक्र हीं आपआपलीं आयुधें धारण केलेल्या त्या देवांना, अत्रि ऋषींनीं भूमीवर दंडाप्रमाणें पडून साष्टांग नमस्कार घातला, आणि हातांत पूजासाहित्य घेऊन त्यांची पूजा केली ॥ २४ ॥ त्यांची दृष्टि दयायुक्त व मुखें हास्ययुक्त होतीं. तथापि, त्यांच्या तेजानें अत्रि ऋषीचे नेत्र दिपून गेल्यामुळें त्यांनीं ते मिटून घेतले, ॥ २५ ॥ आणि आपलें अन्तःकरण मात्र सर्वस्वी त्यांच्याकडे लावून गंभीर अर्थानें भरलेल्या आपल्या मधुर वाणीनें त्रैलोक्यश्रेष्ठ अशा त्या देवांची त्यांनीं हात जोडून स्तुति केली ॥ २६ ॥

अत्रिऋषि म्हणाले—देवहो, जगाची उत्पत्ती, पालन व संहार हीं कर्मे करण्यासाठीं मायेच्या गुणांची आपसांत वांटणी करून प्रत्येक युगांत निरनिराळे अवतार धारण करणारे असे जे ब्रह्मा, विष्णु व महेश्वर, तेच तुम्ही आहांत. मी तुम्हांला नमस्कार करतों. तुम्हांपैकीं ज्या एकालाच मीं बोलविलें होतें, तो कोण बरें ? ॥ २७ ॥ मी ह्या आश्रमांत राहून पुत्रप्राप्ति व्हावी एवढ्यासाठीं अनेक प्रकारच्या उपचारांनीं एका परमेश्वराचेंच चित्तांत ध्यान करीत होतों. असें असतां प्राण्यांच्या मनाला सुद्धां ज्यांचें ज्ञान होणार नाहीं असे तुम्ही तिघेजण ह्या आश्रमांत प्रत्यक्ष मूर्ति धारण करून कसे प्राप्त झाला आहां, ह्याविषयीं मला मोठें आश्चर्य वाटतें. तेव्हां माझ्यावर प्रसन्न व्हा आणि मला ह्याची फोड करून सांगा ॥ २८ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले–हे विदुरा, त्या तिन्ही श्रेष्ठ देवांनीं याप्रमाणें त्या ऋषीचें भाषण श्रवण केल्यावर हास्य करून आपल्या मधुर वाणीनें त्याला उत्तर दिलें ॥ २९ ॥

देव म्हणाले,–हे ब्रह्मज्ञ ऋषे, तुझा जसा संकल्प आहे, त्याप्रमाणेंच गोष्टी घडून येतील. त्यांत अन्यथा कधींहि होणार नाहीं. कारण उत्तम संकल्प करणाऱ्या अशा तुझा तो संकल्प आहे. तू ज्या एका तत्त्वाचें ध्यान करीत आहेस त्याचेच आम्ही तिघेजण अंशभूत आहोंत ॥ ३० ॥ हे ऋषे, तुझें कल्याण असो. आतां तुला आमच्या अंशांपासून जग-

प्रख्यात असे तीन पुत्र होतील आणि ते तुझी कीर्ती जगभर पसरितील ॥ ३१ ॥ विदुरा, याप्रमाणें अत्रि ऋषीला अभीष्ट वर देऊन व अत्रि ऋषि आणि अनसूया या दोघांनीं उत्तम प्रकारें केलेल्या पूजेचा स्वीकार करून ते तीन्ही श्रेष्ठ देव त्या आश्रमांतून त्या उभयतांचा निरोप घेऊन निघून गेले ॥ ३२ ॥ नंतर त्यांनीं वर दिल्याप्रमाणें ऋषींना ब्रह्मदेवाच्या अंशापासून सोम नांवाचा पुत्र झाला व विष्णूच्या अंशापासून योगशास्त्रांत निपुण असा दत्त नांवाचा पुत्र झाला. त्यांचा तिसरा पुत्र दुर्वास ऋषी हा शंकराचा अंश होय. विदुरा, आतां तुला अंगिरा ऋषीची संतति सांगतों, ऐक ॥ ३३ ॥ अंगिरा ऋषीची पत्नी जी श्रद्धा, तिला सिनीवाली[1], कुहू, राका आणि चौथी अनुमति, अशा कन्या झाल्या ॥ ३४ ॥ श्रद्धा व अंगिरा ऋषि ह्यांचे दुसरे दोन पुत्र स्वारोचिष मन्वंतरांत प्रसिद्धीस आले. त्यांपैकीं एक साक्षात् परमेश्वरस्वरूप उतथ्य व दुसरा ब्रह्मज्ञान-संपन्न बृहस्पति होय ॥ ३५ ॥ पुलस्त्य ऋषीला हविर्भूनामक स्त्रीच्या ठिकाणीं विश्रवा आणि अगस्त्य ऋषि असे दोन पुत्र झाले. त्यांपैकीं अगस्त्य ऋषि हा दुसऱ्या जन्मांत जठराग्नि झाला आणि विश्रवा हा मोठा तपस्वी झाला ॥ ३६ ॥ पुढे विश्रव्याला आपल्या इडविडा नांवाच्या स्त्रीपासून एक पुत्र झाला, तोच यक्षांचा राजा देव कुबेर होय. दुसऱ्या स्त्रीपासून[2] विश्रव्याला रावण, कुम्भकर्ण आणि बिभीषण असे तीन पुत्र झाले ॥ ३७ ॥ हे महाबुद्धिमान् विदुरा, पुलह ऋषीची गति नांवाची भार्या मोठी साध्वी होती. तिच्यापासून त्याला कर्मश्रेष्ठ, वरीयान् व सहिष्णु असे तीन पुत्र झाले ॥ ३८ ॥ क्रतु ऋषीची भार्या जी क्रिया तिच्या पोटीं ब्रह्मतेजानें तळपणारे असे साठ हजार पुत्र झाले. त्यांना *वालखिल्याऋषी असें म्हणतात ॥ ३९ ॥ हे शत्रुतापना विदुरा, वसिष्ठ ऋषीला त्याच्या ऊर्जानामक पत्नीच्या उदरीं सात पुत्र झाले. ते सर्वजण मनानें व आचरणानें अत्यंत शुद्ध असे ब्रह्मर्षि होते ॥ ४० ॥ चित्रकेतु, सुरोचि, विरजा, मित्र, उल्बण, वसुभृद्यान व द्युमान् हीं त्यांचीं नांवें होत. तसेंच त्याच्या दुसऱ्या स्त्रीला शक्ति आदिकरून पुत्र झाले ॥ ४१ ॥ विदुरा, अथर्वा ऋषीला चित्ति नांवाची स्त्री होती. तिच्यापासून त्याला घोडयाच्या मस्तकासारख्या मस्तकाचा दधीच नांवाचा एक व्रताचरणी पुत्र झाला. आतां यापुढें तुला मी भृगु ऋषीचा वंश सांगतों, तो तूं श्रवण कर ॥ ४२ ॥ महाभाग्यशाली भृगुऋषीला 'ख्याति' नांवाची स्त्री होती. तिच्यापासून त्याला धाता आणि विधाता असे

---

१ अमावास्या आणि पौर्णिमा यांचे दोन दोन भेद आहेत. ज्या अमावास्येस चंद्र दृष्टीस पडतो, तिला 'सिनीवाली' म्हणतात आणि जिला दिसत नाहीं तिला 'कुहू' म्हणतात; ज्या पौर्णिमेला चंद्राची एक कला कमी असेल तिला 'अनुमति' व पूर्ण मंडल असेल तिला 'राका' म्हणतात.

२ या स्त्रीचें नांव केशिनी असें होतें.

* यांच्या शरिराचें प्रमाण अंगठ्याएवढें होतें.

दोन मुलगे आणि श्रीहरीच्या चरणीं नेहमी लीन असणारी 'श्री' नांवाची कन्या अशीं तीन अपत्यें झालीं ॥४३॥ मेरूला आयति आणि नियति अशा दोन मुली होत्या. त्यांपैकीं त्यानें आयति धात्याला आणि नियति विधात्याला दिली. धात्यापासून नियतीला मृकण्ड नांवाचा पुत्र झाला आणि विधात्यापासून नियतीला प्राण नांवाचा पुत्र झाला ॥ ४४ ॥ मृकंड-ऋषीला मार्कण्डेय नांवाचा पुत्र झाला व प्राणाला वेदशिरा नांवाचा पुत्र झाला. भृगुऋषीला कवि नांवाचा तिसरा पुत्र होता. त्याच कवीचा पुत्र भगवान् शुक्र होय ॥ ४५ ॥ हे विदुरा, अंगिरसादिक ऋषींनीं संतति उत्पन्न करून पुष्कळ लोकसंख्या वाढविली. याप्रमाणें कर्दमऋषीच्या मुलींच्या वंशाचा विस्तार मीं तुला सांगितला ॥४६॥ जो भक्तियुक्त अन्तःकरणानें श्रेष्ठ अशा ह्या वंशविस्ताराचें श्रवण करील त्याचें सर्व पाप तत्काल नाहींसें होईल. असो. ब्रह्मदेवाचा दक्ष नांवाचा जो पुत्र त्यानें मनूच्या प्रसूति नांवाच्या कन्येशीं विवाह केला ॥ ४७ ॥ त्या समर्थ दक्षप्रजापतीला प्रसूतीपासून सुंदर नेत्राच्या सोळा कन्या झाल्या. त्यानें त्यांपैकीं तेरा जणींना धर्माला देऊन एकीचा अग्नीशीं विवाह लावून दिला ॥ ४८ ॥ उरलेल्या कन्यांपैकीं एक कन्या दक्षानें योगमार्गांत आसक्त असलेल्या सर्व पितरांना मिळून दिली व संसाराचा पाश तोडणाऱ्या शंकराला दुसरी दिली. श्रद्धा, मैत्री, दया, शान्ति, पुष्टि तुष्टि, क्रिया, उन्नति, बुद्धि, मेधा, तितिक्षा, ह्री आणि मूर्ति ह्या तेरा दक्षकन्या धर्माच्या स्त्रिया होत. त्यांत श्रद्धेला शुभ, मैत्रीला प्रसाद आणि दयेला अभय असे पुत्र झाले ॥ ४९ ॥ ५० ॥ तसेच शान्तीला सुख, तुष्टीला मुद, पुष्टीला स्मय, क्रियेला योग, उन्नतीला दर्प, बुद्धीला अर्थ असे पुत्र झाले ॥ ५१ ॥ मेधेला स्मृति, तितिक्षेला क्षेम आणि ह्रीला प्रश्रय असा प्रत्येकीला एकेक पुत्र झाला; परंतु सर्व गुणांचे निधान अशी जी मूर्तिनामक धर्माची स्त्री, तिच्या पोटीं नर व नारायण असे दोन ऋषीच पुत्ररूपानें अवतरले ॥ ५२ ॥ त्या नरनारायणांच्या जन्मकाळीं सर्व त्रैलोक्य आनंदित होऊन नरनारायणांची स्तुति करूं लागले. त्या वेळीं लोकांचीं अन्तःकरणें प्रफुल्लित होऊन दिशा, वायु, पर्वत व नद्या यांनीं सुद्धां प्रसन्नता धारण केली ॥ ५३ ॥ स्वर्गांत वाद्यें वाजूं लागलीं, आणि पुष्पवृष्टि सुरू झाली. सर्व ऋषि आनन्दित होऊन नरनारायणांची स्तुति करूं लागले आणि किंन्नर व गन्धर्वहि आनंदानें गायन करूं लागले ॥ ५४ ॥ अप्सरा नाचूं लागल्या, जिकडेतिकडे अत्यंत शुभ चिन्हें दिसूं लागलीं आणि ब्रह्मा-विष्णु-महेश्वरप्रभृति सर्व देव नवींनवीं स्तोत्रें करून त्या नरनारायणांची स्तुति करूं लागले ॥५५॥ देव म्हणाले.–" आकाशांतील अभ्रांत ज्याप्रमाणे नाना प्रकारचीं रुपें मनुष्याची कल्पनाशक्ति निर्माण करते, त्याप्रमाणें आपल्या स्वरूपांत मायेच्या योगानें विश्व निर्माण करून त्याच्या प्रकाशासाठीं ज्यानें आज या धर्माच्या घरीं ऋषीरूपानें अवतार धारण केला आहे, त्या परमपुरुषाला आम्ही नमस्कार करतों ॥ ५६ ॥ त्या परमपुरुषानें मर्यादेचें उल्लंघन करणाराचें नियंत्रण करण्यासाठीं सत्त्वगुणाच्या योगें आम्हां देवगणांना निर्माण केलें असून, त्याचें ज्ञान शास्त्रांनाहि अनुमानानेंच करून घेतां येतें. लक्ष्मीचें निवासस्थान जें निर्मळ असें कमळ, त्यालाहि सौंदर्यात मागें सारणाऱ्या आपल्या

अत्यंत दयायुक्त अशा नेत्रांनीं तो आमच्याकडे अवलोकन करो " ॥ ५७ ॥ विदुरा, याप्रमाणें नरनारायणांचें दर्शन झाल्यावर सर्व देवांनीं त्यांची स्तुति आणि पूजन केलें आणि मग ते ऋषि गन्धमादन पर्वतावर निघून गेले ॥ ५८ ॥ तेच हे भगवान् विष्णूचे अंशभूत ऋषि पृथ्वीचा भार दूर करण्यासाठी यादवांच्या व कौरवांच्या कुलांत कृष्ण व अर्जुन या नांवाचे अवतार घेऊन येथें प्राप्त झाले आहेत ॥ ५९ ॥ असो. विदुरा, अग्नीची पत्नी जी स्वाहा तिला पावक, पवमान व शुचि असे तीन पुत्र झाले. हे तिघेहि अग्नीच्या अभिमानी देवता असून अग्नींत हवन केलेलें हविर्द्रव्य हेंच त्यांचें अन्न असतें ॥ ६० ॥ त्यांपासून पंचेचाळीस अग्नि उत्पन्न झाले. हे पंचेचाळीस, त्यांचे तीन पितर[1] व एक पितामह[2] मिळून एकूणपन्नास अग्नि झाले ॥ ६१ ॥ वेदवेत्ते पुरुष वैदिक, यज्ञकर्मांत ज्यांचीं नांवें घेऊन अग्नीच्या इष्टि करितात, तेच हे अग्नि होत ॥ ६२ ॥ अग्निष्वात्त[3], बर्हिषद[4], सौम्य[5], आज्यप[6], साग्नि[7] आणि अनग्नि[8], हे पितर असून त्यांना दक्षप्रजापतीनें आपली स्वधानामक कन्या दिली होती ॥ ६३ ॥ स्वधेला पितरांपासून वयुना आणि धारिणी अशा दोन कन्या झाल्या. त्या दोघीहि ब्रह्मज्ञानाचा उपदेश करणाऱ्या असून शास्त्रीय व अनुभविक अशा ज्ञानांत पारंगत होत्या ॥ ६४ ॥ दक्षाची सोळावी कन्या जी सती तिला आपल्या गुणांना आणि स्वभावाला योग्य असा शंकर पति मिळाला होता व त्याच्या सेवेंत ती सर्वकाळ तत्पर असे; परंतु तिला पुत्रप्राप्ति झाली नव्हती ॥ ६५ ॥ अशी अल्पवयी असतांच एकदां आपल्या पित्यानें आपल्या निरपराधी पतीचा अपमान केलेला पाहून तिला फार दुःख झालें व त्या आवेशांत तिनें योगसामर्थ्यानें आपल्या देहाचा त्याग केला ॥ ६६ ॥

१ पावक, पवमान आणि शुचि. २ स्वाहाचा पुत्र अग्नि.

३ मृत्युलोकांत केवळ स्मार्त कर्में करून पितर झालेले. ४ मृत्युलोकांत अग्निहोत्रादि यज्ञ करून पितर झालेले. ५ यज्ञात सोमपान करणारे. ६ यज्ञांत घृतपान करणारे. ७ श्राद्धांत ज्यांना अग्नौकरण आहे ते. ८ श्राद्धांत ज्यांना अग्नौकरण नाहीं ते.

## पहिला अध्याय समाप्त

# अध्याय २ रा

विदुर म्हणाला–मैत्रेयमुने, दक्षप्रजापति आपल्या कन्यांवर फारच प्रीति करीत [illegible] असें असतां त्यानें आपली कन्या जी सती तिचा अनादर करून श्रेष्ठ असा जो शंकर त्याच्याशीं विरोध मांडला ह्याचें कारण काय? ॥ १ ॥ मैत्रेय मुने, स्थावर आणि जंगम [illegible] [illegible]विध जगताचा गुरु जो शंकर त्याचें कोणाशींहि वैर नाहीं. शान्ति हेंच त्याचें मूर्तिमंत स्वरूप आहे व तो आपल्या स्वरूपींच नेहमीं रत असतो. असें असतां त्या जगाच्या [illegible] देवतेशीं दक्षप्रजापतीनें द्वेष कां आरंभिला? ॥ २ ॥ हे ब्रह्मनिष्ठ मैत्रेयमुने, प्राणत्याग करणें अत्यंत दुष्कर असतांहि सती देवीनें तो केला. तरी जांवई व सासरा यांमध्यें इतका द्वेष उत्पन्न होण्याला कारण काय झालें तें तूं मला सांग ! ॥ ३ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, पूर्वीं एकदां सृष्टि करणाऱ्या प्रजापतींनीं यज्ञ चालू केले [illegible] त्या यज्ञांत मोठमोठे ऋषि, देवगण, आपल्या अनुयायांना घेऊन आलेले मुनि आणि अग्नि वगैरे सर्व एकत्र जमले होते ॥ ४ ॥ त्या सभेमध्यें सर्व मंडळी बसली असतां सूर्यासारख्या तेजानें चमकणारा दक्षप्रजापति तेथें आला. त्याच्या येण्याबरोबर त्या विस्तीर्ण सभामंडपांतील अंधकार अगदीं नाहींसा होऊन गेला आणि त्याला पाहतांच सर्व सभासदांचीं अन्तःकरणें त्याच्या तेजानें वेधून गेलीं. त्या वेळीं ब्रह्मदेव आणि शंकर ह्या दोघांशिवाय अग्निसुद्धां सर्व सभासद आपआपल्या आसनांवरून उठून उभे राहिले ॥ ५ ॥ ६ ॥ सभेंतील मोठमोठ्या अधिकारी पुरुषांनीं महासमर्थ अशा त्या दक्षप्रजापतीचा उत्तम प्रकारें सत्कार केला आणि तोहि सर्व लोकांचा गुरु जो ब्रह्मदेव त्याला नमस्कार करून त्याच्या [illegible] आपल्या आसनावर बसला ॥ ७ ॥ आपण बसण्यापूर्वींच शंकर बसलेला आहे व त्यानें आपला सत्कार केला नाहीं, असें पाहतांच तो अनादर सहन न होऊन दक्षानें [illegible] वक्रदृष्टीनें पाहिलें आणि आतां शंकराला हा जाळतोच कीं काय अशा [illegible] तो शंकराला उद्देशून बोलूं लागला ॥ ८ ॥ 'देव आणि अग्नि यांसहित सर्व [illegible] हो ! मला साधूंच्या वर्तणुकीसंबन्धानें आपल्याला कांहीं सांगावयाचें आहे, तें मी अज्ञानानें किंवा मत्सरानें सांगत नाहीं. यास्तव माझें भाषण आपण श्रवण करावें ॥ ९ ॥ हा निर्लज्ज शंकर, इन्द्रादि लोकपालांच्या यशाला काळिमा लावणारा आहे. [illegible] येण्याच्या वेळीं न उठतां हा स्वस्थ बसून राहिला, त्या योगें ह्याच्या ह्या वर्तनानें [illegible] आचरिलेल्या मार्गाला मात्र दूषण लागलें आहे ॥ १० ॥

सभासद हो, हा एका प्रकारें माझ्याशीं शिष्याचें नातें पावला आहे. कारण ह्यानें [illegible] [illegible]प्रमाणें गायत्रीसारख्या योग्यतेच्या माझ्या कन्येचें पाणिग्रहण ब्राह्मण व अग्नि [illegible] समक्ष केलें आहे ॥ ११ ॥ हरिणशावकाप्रमाणें सुंदर नेत्र असलेल्या माझ्या कन्येचें [illegible] पाणिग्रहण केलें असल्यामुळें, उत्थापन आणि वंदन यांच्या मानाला मी पात्र झालों

आहें. असें असतां या माकडडोळया शंकरानें बहुमानाचा शब्दहि तोंडानें उच्चारिला नाहीं ॥ १२ ॥ माझ्या मनांत ह्याला आपली कन्या देण्याची मुळींच इच्छा नव्हती. कारण हा कधींहि स्नानसंध्यादिक नित्यनैमित्तिक कर्में करीत नाहीं. नेहमीं अपवित्र स्थितींत राहतो व गर्वानें नित्य फुगलेला असतो. धर्ममर्यादांचें उल्लंघन करणें हें ह्याचें ब्रीदच आहे. तेव्हां ज्याप्रमाणें एखाद्या शूद्राला सुंदर वेदवाणीचा उपदेश द्यावा, त्याप्रमाणें मी ह्याला आपली सुंदर कन्या दिली म्हणावयाची ! ॥ १३ ॥ भयंकर श्मशानभूमींत प्रेतें व भूतगण यांना सभोंवतीं घेऊन व केंस मोकळे सोडून हा शंकर कधीं हंसत तर कधीं रडत, अशा नग्नावस्थेंत वेड्या-सारखा फिरत असतो ॥ १४ ॥ हा सर्वांगाला चिताभस्म फांसून प्रेतांवरील माळा गळ्यांत घालतो व मनुष्यांचीं हाडें अलंकार म्हणून धारण करतो. हा नेहमीं धुंदींत राहात असून ह्याला अमंगल लोकच प्रिय असतात. मूर्तिमंत तमोगुणी जे प्रमथगण व भूतगण त्यांचा हा अधिपति असून याचें नांव मात्र शिव आहे; पण वास्तविक याच्यासारखा अपवित्र दुसरा कोणी नाहीं ॥ १५ ॥ असें असतां केवळ ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून या अपवित्र, अमंगल व दुष्टचित्त अशा पिशाचपतीला मी आपली सुशील कन्या दिली, याविषयीं मला फार वाईट वाटतें ॥ १६ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, दक्षाशीं कोणत्याहि प्रकारें विरोध न करतां शंकर स्वस्थ बसला होता, तरी सुद्धां दक्षाला क्रोध उत्पन्न होऊन त्यानें याप्रमाणें त्याची निंदा केली आणि हातांत उदक घेऊन शंकराला शाप देण्यासाठीं तो सिद्ध झाला ॥ १७ ॥ तो म्हणाला—'हा शंकर खरोखर सर्व देवांमध्यें अधम आहे, यास्तव ह्याला ह्या देवयज्ञां-मध्यें इन्द्र, विष्णु आदिकरून देवांबरोबर हविर्भाग मिळतां कामा नये' ॥ १८ ॥ विदुरा, दक्ष याप्रमाणें भाषण करीत असतां सभासदांपैकीं मुख्यमुख्य पुरुषांनीं त्याचा निषेध केला, तरीपण त्यानें शंकराला शाप दिलाच. आणि ज्याचा क्रोध फार विकोपाला गेला आहे असा तो दक्ष त्या यज्ञमंडपांतून निघून चालता झाला. ॥ १९ ॥ हा दक्षाचा शाप ऐकून शंकराच्या सेवकगणांतील प्रमुख जो नंदिकेश्वर त्याचे डोळे क्रोधाच्या आवेशानें लाल झाले आणि दक्षाला व ज्यांनीं शंकराच्या निन्देला अनुमोदन दिलें त्या ब्राह्मणांना त्यानें भयंकर शाप दिला ॥ २० ॥ तो म्हणाला—भगवान् शंकर कोणाचाहि द्वेष करीत नाहीं, असें असून जो मूर्ख ह्या नश्वर शरीराला श्रेष्ठ समजून परमेश्वराचा द्वेष करतो, तो भेददृष्टीचा पुरुष तत्त्वज्ञानापासून विमुख होतो ॥ २१ ॥ गृहस्थाश्रमांतील प्रत्येक आचारण कपटानें भरलेलें असतांहि तुच्छ विषयसुखाच्या इच्छेनें हा दक्षप्रजापति त्यांमध्येंच गुंतून राहिला आहे; कर्मांची प्रशंसा * करणाऱ्या वेदांतील वाक्यांच्या श्रवणानें ह्याची बुद्धि मूढ असल्यामुळें तो कर्मांचा हा सारा पसारा मांडीत आहे ॥ २२ ॥ ह्या दक्षाच्या बुद्धीला देहच आत्मा आहे असें मानण्याचा नित्य अभ्यास झाला असल्यामुळें

*'अक्षय्यं ह वै चातुर्मास्ययाजिनः सुकृतं भवति' म्हणजे चातुर्मास्ययाग करणाराला अक्षय्य पुण्य प्राप्त होतें, इत्यादि वेदवाक्यें. ( श्रीधर )

हा आत्म्याचें सत्यस्वरूप विसरला आहे. यास्तव हा पशुतुल्य होऊन स्त्रीलंपट बनेल आणि ह्याचें मुख लवकरच बोकडाच्या मुखासारखें होईल ॥ २३ ॥ वस्तुतः अज्ञानात्मक असलेल्या कर्मविस्तारालाच ज्ञानस्वरूप समजणारा व शंकराचा अपमान करणारा हा मूर्ख दक्षप्रजापति आणि त्याचें अनुकरण करणारे जे असतील ते सर्व संसारचक्राच्या फेऱ्यांत सांपडतील ॥ २४ ॥ मद्याच्या वासानें मन मोहित व्हावें तसें कर्ममार्गाचें भपकेदार वर्णन करणाऱ्या वेदवाक्यांच्या मोहकपणानें शंकराचा द्वेष करणाऱ्या या कर्मठमंडळीचीं मनेंहि आकर्षून घेतलीं आहेत. यास्तव ते असेच कर्माच्या मोहांत राहातील ॥ २५ ॥ आणखी हे कर्मठ ब्राह्मण भक्ष्याभक्ष्याचा विचार न करतां जें मिळेल तें खातील. उपजीविकेकरतांच विद्याध्ययन, तपश्चर्या आणि व्रतें करतील आणि देह, इन्द्रियें आणि द्रव्य ह्यांच्यावर आसक्ति ठेवून भिक्षा मागत पृथ्वीवर हिंडतील ॥ २६ ॥

विदुरा, याप्रमाणें दक्षप्रजापतीला आणि त्या यज्ञांत काम करणाऱ्या ब्राह्मणवर्गाला नंदिकेश्वर शाप देत असतां त्याचें भाषण ऐकून भृगुऋषीनेंहि ब्रह्मदंडरूप अशा दुस्तर शाप त्या नंदिकेश्वरादिकांना उलट दिला ॥ २७ ॥ तो म्हणाला, जे कोणी शंकराचीं व्रतें करतील किंवा तीं व्रतें करणाऱ्यांचे अनुयायी होतील, ते सर्वजण खऱ्या धर्ममार्गाचा विरोध करणारे पाखण्डी होतील ॥ २८ ॥ ते सुरा, मद्य इत्यादि नाना प्रकारचीं अपवित्र पेयें या दीक्षेंत देवतेप्रमाणें पूज्य मानतील व अशा त्या शिवदीक्षेंत आचारभ्रष्ट, अविवेकी व जटा, भस्म आणि हाडें धारण करणारे लोकच प्रवेश करतील ॥ २९ ॥ अहो ! वर्ण, आश्रम व आचरण यांनीं युक्त असलेल्या पुरुषांच्या धर्माचा आधार असून ज्यानें धर्ममर्यादा घालून दिल्या, त्या वेदांची व त्याला अनुसरणाऱ्या ब्राह्मणांचीहि तुम्ही ज्या अर्थी निंदा करतां, त्या अर्थी तुम्ही पाखण्डी आहां ॥ ३० ॥ खरें पाहतां सर्व लोकांना कल्याणकारक असा वेद हाच सनातन धर्ममार्ग होय. पूर्वींचे सर्व लोक ह्याच मार्गानें गेले असून त्याला मूळ आधार प्रत्यक्ष परमेश्वर हाच होय ॥ ३१ ॥ सज्जनांना आचरणाचा नित्य मार्ग घालून देणारा असा जो शुद्ध आणि श्रेष्ठ वेद त्यांची तुम्हीं निंदा केल्यामुळें तुमचा तो पिशाचांचा अधिपति शंकर हाच ज्यांत मुख्य दैवत आहे, त्या पाखंडी मार्गातच जाऊन तुम्ही पडा ॥ ३२ ॥

मैत्रेय म्हणाला,—विदुरा, याप्रमाणें नंदिकेश्वरादि आपल्या अनुयायीगणाला भृगुऋषीनें दिलेला शाप ऐकून शंकरास वाईट वाटलें आणि तो सेवकांसह तेथून निघून गेला ॥ ३३ ॥

हे महाधनुर्धरा विदुरा, त्यानंतर सर्व प्रजापतींनींहि परमश्रेष्ठ अशा भगवान् श्रीहरीच्या आराधनेसाठीं आरंभिलेल्या यज्ञाची हजार वर्षांनीं पूर्तता केली आणि गंगायमुनांचा जेथें संगम झाला आहे, त्या प्रयागक्षेत्रांत अवभृथस्नान करून मनानें व शरिरानें निर्मळ झालेले ते सर्वजण तेथून आपआपल्या घरीं गेले ॥ ३४ ॥ ३५ ॥

## दुसरा अध्याय समाप्त

# अध्याय ३ रा

मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, याप्रमाणें दक्षप्रजापति आणि शंकर हे सासरेजांवई परस्परांविषयीं सारखा द्वेष धरून राहिले असतां बराच मोठा काल निघून गेला ॥ १ ॥ पण ज्या वेळीं परमश्रेष्ठ अशा ब्रह्मदेवानें दक्षाला सर्व प्रजापतींच्या अध्यक्षपदाचा अभिषेक केला, तेव्हां त्यालाहि गर्व उत्पन्न झाला* ॥२॥ आणि त्या गर्वभरांत त्यानें शंकर आदिकरून ब्रह्मनिष्ठ पुरुषांचा अव्हेर करून यज्ञाला आरंभ केला. प्रथम वाजपेय यज्ञ करून नंतर बृहस्पतिसव नांवाच्या उत्तम यज्ञाला त्यानें सुरुवात केली ॥ ३ ॥ त्या बृहस्पतिसव यज्ञांत दक्षानें सर्व ब्रह्मर्षि, देवर्षि आणि पितर यांना दक्षिणा इत्यादि देऊन त्यांचा चांगला सत्कार केला आणि त्यांच्या स्त्रियांनाहि बोलावून वस्त्रें व अलंकार देऊन पतींसह त्यांची यथासांग पूजा केली ॥ ४ ॥ तेव्हां आकाशांत संचार करणारे देव त्या यज्ञाविषयींच्या गोष्टी बोलत असतां, आपल्या पित्याच्या घरीं मोठा यज्ञाचा उत्सव चालला आहे, असें दक्षकन्या सतीला समजलें ॥ ५ ॥ तितक्यांत तिला असें दिसून आलें कीं, त्या यज्ञमहोत्सवासाठीं दहाही दिशांकडून, सुवर्णाचे अलंकार धारण केलेल्या व कानांत चकचकीत कुंडलें घालून उंची वस्त्रें परिधान केलेल्या अशा चंचलनेत्राच्या गन्धर्वादिकांच्या स्त्रियाहि आपल्या पतींसहवर्तमान विमानांत बसून आपल्या घरावरून जात आहेत. तो प्रकार पाहून सती पार्वतीला तिकडे जाण्याची उत्कण्ठा उत्पन्न झाली व ती आपला पति जो भूतपति शंकर त्याला म्हणाली, ॥ ६ ॥ सती म्हणाली,—'हे प्रिय शंकरा, आपला सासरा जो दक्षप्रजापति त्याच्या घरीं यज्ञाचा मोठा उत्सव चालू असल्याचें ऐकण्यांत येत आहे. जर आपली इच्छा असेल तर आपणहि त्या यज्ञासाठीं जाऊं. हे पाहा, देव देखील तिकडे जात आहेत ॥ ८ ॥

त्या ठिकाणीं माझ्या बहिणीसुद्धां आपल्या पतींसहवर्तमान आप्तजनांना भेटण्याकरितां गेल्या असतीलच. यास्तव आपणहि त्या यज्ञमहोत्सवामध्यें जावें आणि माझीं मातापिता जो आहेर आपणांस अर्पण करतील त्याचा आपण दोघांनीं स्वीकार करावा, अशी मलाहि इच्छा झाली आहे ॥ ९ ॥ हे कल्याणनिधे शंकरा, माहेरीं जाऊन फार दिवस झाल्यामुळें माझें मन माझ्या प्रेमळ आईच्या, बहिणीच्या आणि मावशीच्या भेटीसाठीं उत्कंठित झालें आहे. माझ्या बहिणी आपल्या पतींसह तेथें आल्या असतील. मी तिकडे जाईन तर त्यांना भेटेन आणि महर्षींनीं चालविलेला यज्ञसमारम्भहि पाहीन ॥१०॥

हे नाथ, तुम्ही जन्ममरणरहित असून हें त्रिगुणात्मक व आश्चर्यपूर्ण जग आपल्या मायेनें आपल्याच स्वरूपांत निर्माण केलें आहे. यास्तव आपल्याला त्याबद्दल उत्कंठा नसली,

---

*प्रथम दक्षाच्या मनांत शंकराविषयीं द्वेषच होता; पण नवीन कारणामुळें दक्षाला गर्वहि उत्पन्न झाला ( श्रीधर )

तरी मीं त्यांतील रहस्य न जाणणारी अशी अगतिक अबला असल्यामुळें, माझ्या जन्मभूमीचें दर्शन घेण्याची मला फार इच्छा झाली आहे ॥ ११ ॥ हे पाहा, दुसऱ्याहि स्त्रियांचे थवेच्या थवे उत्तम शृंगार करून आपल्या पतींसहवर्तमान तिकडे जात आहेत. हे नीलकंठा, आकाशाकडे पाहा, कलहंसासारखीं शुभ्र विमानें त्यांतून जात असल्यामुळें तें कसें शोभिवंत दिसत आहे ! ॥ १२ ॥ हे देवश्रेष्ठा, पित्याच्या घरीं चाललेल्या उत्सवाचा वृत्तांत ऐकून मुलीच्या मनाला कसें बरें चैन पडेल ? बोलावणें नसलें तरी देखील सज्जन लोक स्वामीच्या, आईबापांच्या आणि गुरूच्या घरीं जाण्यास अनमान करीत नाहींत ॥ १३ ॥ हे देवा, माझ्यावर प्रसन्न व्हा ! आपण दयाळू असून माझें एवढें कोड पुरविण्यास समर्थ आहां. आपण मोठे ज्ञानी असल्यामुळें मला आपण आपली अर्धाङ्गी केलें आहे; म्हणूनच मी आपल्याजवळ ही याचना केली आहे. ती पुरवून माझ्यावर कृपा करा ! ॥ १४ ॥ मैत्रेयऋषि म्हणाले,— याप्रमाणें प्रियेचें भाषण ऐकून, दक्षप्रजापतीनें प्रजापतींच्या समक्ष बोललेल्या मर्मभेदक अशा अवाच्य शब्दरूप बाणांचें शंकराला स्मरण झालें आणि तो प्रियेला हंसत हंसत उत्तर देऊं लागला ॥१५॥

भगवान् शंकर म्हणाला,—प्रिये, बोलाविल्यावांचून सुद्धां सज्जन आपल्या आप्तांच्या घरीं जातात, असें जें तूं म्हटलेंस तें अगदीं बरोबर आहे; पण तें केव्हां ? तर जेव्हां देहादिकांवरील मीपणाच्या मोठ्या अभिमानानें किंवा क्रोधाच्या ताठ्यानें त्या आप्तांची दृष्टि दोषयुक्त झाली नसेल तेव्हां ! ॥ १६ ॥ ज्ञान, तपश्चर्या, द्रव्य, सुदृढ शरीर, तारुण्य आणि उत्तम कुल हे सहा सज्जनांचे गुण आहेत खरे; पण ते दुष्टशिरोमणींना प्राप्त झाले म्हणजे तेच दोषास्पद होत असतात. त्यामुळें दुष्टांचें विवेकज्ञान अगदीं नाहींसें होतें, गर्व वाढत जाऊन दृष्टि दुष्ट होते व सत्पुरुषाचें तेज खरोखर त्यांना दिसेनासें होतें ॥ १७ ॥ त्यांच्या घरीं कोणी गेलें म्हणजे त्यांची बुद्धि त्या पाहुण्याविषयीं वाईट होते. ते भुंवया चढवून सक्रोध दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागतात. यास्तव अशा चंचल मनाच्या पुरुषांच्या घरीं, ते जरी आपले बंधु असले तरी, आप्तपणाची बुद्धि ठेवून कधींही जाऊं नये ॥ १८ ॥ कुटिल बुद्धीच्या बंधुजनांनीं दुर्वाक्यें बोलून मर्मस्थानीं प्रहार केले म्हणजे ते काळजाला इतके झोंबतात कीं, त्या दुःखामुळें तो रात्रंदिवस सारखा तळमळत असतो. शत्रूंनीं बाण मारून अंगाचे तुकडे काढले तरीहि तो तितका तळमळत नाहीं, तर सुखानें झोंप घेत असतो ॥१९॥ हे सुंदरि, मोठ्या उत्कर्षयुक्त स्थितींत असलेल्या दक्षप्रजापतीच्या सर्व कन्यांमध्यें तूंच त्याची फार आवडती व मान्य आहेस, ही गोष्ट उघड आहे; पण कांहीं झालें तरी, आतां तुझा माझ्याशीं संबंध झाला असल्यमुळें, तुझा पिता तुझा मान ठेवणार नाहीं. कारण त्याला माझ्याविषयीं वैषम्य वाटतें ॥ २० ॥ जीवांचें उपाधिभूत चित्त ज्या क्रिया करीत असेल त्यांच्याकडे सत्पुरुष केवळ उदासीनवृत्तीनें पाहात असतात; म्हणून त्यांना पुण्य, कीर्ति इत्यादि ऐश्वर्यें अनुकूल असतात; पण त्यांना पाहून दुर्जनाचें अन्तःकरण तप्त होऊं लागतें व इन्द्रियें अगदीं कासावीस होतात. त्याला सज्जनांची योग्यता किंवा ऐश्वर्य मिळवितां

येत नाहीं; म्हणून दैत्य जसा विष्णूचा द्वेष करतात, त्याप्रमाणें तो दुर्जन सज्जनांचा सहजच हेवा करूं लागतो ॥ २१ ॥ सुंदरि, सामोरें जाणें, नम्रता दाखविणें, नमस्कार करणें इत्यादि जे परस्परांच्या सत्काराचे प्रकार लोकांमध्यें चालू आहेत त्यांची खरी योग्यता विद्वानांना कळत असते; म्हणूनच ते त्यांचा उपयोग सर्वांच्या अन्तर्यामीं जो श्रेष्ठ श्रीहरि त्याच्याच संबंधानें अन्तःकरणपूर्वक करीत असतात. देहादिकावर अभिमान ठेवणाऱ्या मूर्खांच्या सत्काराकडून अर्थात् त्याचा उपयोग ते करीत नाहींत ॥ २२ । प्रिये, वसुदेव या संज्ञेनें प्रसिद्ध असलेलें असें जें अत्यंत शुद्ध अंतःकरण, त्यांतच त्या परमपुरुष वासुदेवाचें स्वरूप उघडें होऊन अनुभवाला येतें; म्हणून मी त्या अन्तःकरणांतच इंद्रियांना अगोचर अशा त्या भगवान् श्रीहरीची नमस्कारपूर्वक आराधना करीत असतों ॥ २३ ॥ यास्तव हे सुंदरि, आतां माझें तुला इतकेंच सांगणें आहे कीं, ज्या अर्थी मी कोणताहि अपराध केला नसतां त्या दक्षप्रजापतीनें यज्ञांत दुर्भाषणांनीं माझा धिक्कार केला, त्या अर्थी तो माझा शत्रू आहे; म्हणून तो तुझा जन्मदाता पिता असला तरी तू त्याच्या भेटीस जाऊं नये व त्याचे अनुयायी असतील त्यांचेंहि मुखावलोकन करूं नये ॥२४॥ याउपर, हे प्रिये जर माझी आज्ञा मोडून तूं जाशील तर त्यांत तुझें कल्याण होणार नाहीं. कारण आप्तजनांकडून संभाविताचा अपमान झाला म्हणजे त्यापेक्षां मरण बरें असें त्याला होतें ॥ २५ ॥

## तिसरा अध्याय समाप्त

# अध्याय ४ था

मैत्रेयमुनि म्हणाले,–विदुरा, दोहोंपैकीं कांहीं झालें तरी *सतीच्या शरिराचा नाश होणार, असा शंकराच्या मनांत विचार आल्यामुळें तो इतकेंच बोलून स्वस्थ राहिला. सतीच्या मनाचीहि अशीच दुहेरी स्थिति झाली. आप्तजनांना भेटण्याची इच्छा असल्यामुळें एकदां ती जाण्यासाठीं निघे; पण इतक्यांत शंकराच्या भीतीनें पुनः मागें परते ॥ १ ॥ आप्तांना भेटण्याच्या इच्छेचा भंग झाल्यामुळें तिला फारच वाईट वाटलें. प्रेमामुळें रडें कोसळलें, अश्रुबिन्दूनीं ती विव्हळ होऊन गेली व क्रोधानें तिच्या अंगाला कंप सुटला. शंकराकडे तिनें अशा क्रोधानें दृष्टि फेंकिली कीं, त्यामुळें ती त्या अद्वितीय पुरुषाला जणूं जाळीतच आहे कीं काय, असा भास होई ॥ २ ॥ नंतर स्त्रीस्वभावानुसार तिच्या बुद्धीला मोह पडल्यामुळें ती सुस्कारे टाकूं लागली. शोकानें व क्रोधानें तिचें अन्तःकरण खिन्न झालें आणि साधूंना देखील प्रिय अशा ज्या शंकरानें प्रेमानें तिला आपलें अर्धांग दिलें होतें, त्याला टाकून ती आपल्या मातापितरांच्या घरीं जाण्यास निघाली ॥ ३ ॥ ती एकटीच जलद पावलें टाकीत जात आहे असें पाहून शंकराच्या अनुचरांना फार वाईट वाटलें व मणिमान्, मद आदिकरून पार्षद आणि यक्ष ह्यासुद्धां हजारों शिवगण नंदिकेश्वराला पुढें करून तिच्यामागून लगबगीनें जाऊं लागले ॥ ४ ॥ त्यांनीं सती पार्वतीला नंदीवर बसविलें व बरोबर नगारे, मुरली, शंख, हीं गायनाचीं साहित्यें व सोंगट्या, चेंडू, आरसे, कमलें, शुभ्र छत्र, चामरें, माळा आदिकरून साहित्य घेऊन व मोठ्या थाटानें मिरवीत निघाले ॥ ५ ॥ थोड्या वेळानें ती सर्व मंडळी दक्षप्रजापतीच्या यज्ञमंडपांत येऊन थडकली. त्या ठिकाणीं जिकडेतिकडे वेदघोष चालला असून त्यायोगें यज्ञांतील पशुहिंसेला गंभीर स्वरूप आलें होतें. त्या ठिकाणीं देव, ब्राह्मण व ऋषि हे क्रमानें बसले असून मृत्तिका, काष्ठें, लोखंड, सुवर्ण, दर्भ आणि चर्म ह्यांचीं पात्रें जागोजाग दिसून येत होतीं ॥ ६ ॥ सती त्या यज्ञमंडपांत गेली, तेव्हां बहिणी आणि माता ह्यांशिवाय दुसऱ्या कोणी तिचा सत्कार केला नाहीं. कारण यजमान जो दक्षप्रजापति त्यानेंच तिचा अनादर केल्यामुळें, तिचा सत्कार करण्याविषयीं इतरांस भीति वाटत होती. माता व बहिणी ह्यांना मात्र तिच्या येण्यानें आनंद झाला. प्रेमाश्रूंनीं त्यांचे कंठ भरून आले आणि त्यांनीं तिला आदरपूर्वक आलिङ्गन दिलें ॥ ७ ॥ मातेनें आणि मावशांनीं तिची आदरपूर्वक पूजा केली व तिला बसण्यासाठीं उत्तम आसन दिलें. त्याचप्रमाणें बहिणींनीं आपल्या नात्याला योग्य असे सलगीचे प्रश्न तिला विचारले;

---

*** नको म्हणावें तर रागावून ही आतांच देहत्याग करील आणि जा म्हणावें तर तिकडे गेल्यावर दक्षानें अपमान केला म्हणजे संतापून तेथें जीव देईल.**

परंतु पित्यानें अनादर केल्यामुळें मातेनें केलेल्या या आदरसत्काराचा स्वीकार तिच्यानें करवला नाहीं ॥ ८ ॥ अशा प्रकारें त्या यज्ञमण्डपांत त्या महासमर्थ सतीचा अपमान झाला असतां, त्या यज्ञांत भगवान् शंकराला हविर्भाग नाहीं आणि त्याची अवहेलना मात्र आपला पिता करीत आहे, असें पाहून सतीला इतका क्रोध उत्पन्न झाला कीं, ती सर्व जगाला जाळून टाकते कीं काय, असें वाटूं लागलें ॥ ९ ॥ कर्ममार्ग म्हणजे यज्ञांतील धुरानें व्याप्त, पण त्यावरच दक्षप्रजापतीचे सारे प्रयत्न असल्यामुळें, त्या कर्माविषयीं त्याला अभिमान उत्पन्न होऊन तो ज्ञानमार्गी शिवाचा द्वेष करूं लागला. त्यानें सतीचा अपमान केलेला पाहून शंकराचे गण त्याचें पारिपत्य करण्यासाठीं सिद्ध झाले; पण सतीनें त्यांना आपल्या सामर्थ्यानें आवरलें आणि सर्व लोक ऐकत असतां रागानें संतप्त होऊन अस्पष्ट वाणीनें ती पित्याची कानउघाडणी करूं लागली ॥ १० ॥

सतीदेवी म्हणाली,—‘शंकर म्हणजे सर्व प्राण्यांचा जीव व आत्मा होय. त्याच्याहून ह्या जगांत श्रेष्ठ असा कोणी नाहीं. त्याला कोणी प्रिय नाहीं व कोणी अप्रियहि नाहीं. तसेंच त्याचें कोणाशीं वैर नाहीं. अशा त्या सर्वांच्या अन्तर्यामीं वास करणाऱ्या ईश्वराशीं विरोध करणारा तुझ्याशिवाय दुसरा कोणता पुरुष असेल ? ॥११॥ पाहा कीं, सज्जन जे आहेत, ते दुसऱ्यांच्या दोषांकडेही गुणदृष्टीनेंच पाहत असतात. तुझ्यासारखे जे कोणी ब्राह्मण आहेत, त्यांना मात्र ही दृष्टि नसते. दुसऱ्याच्या अल्पगुणांना मोठें स्वरूप देणारे खरोखर अत्यंत श्रेष्ठ पुरुष होत. असें असतां तूं मात्र गुणांच्या ठिकाणीं दोषदृष्टीच ठेवीत आहेस ॥ १२ ॥ जड शरीरालाच आत्मा असें म्हणणाऱ्या दुष्ट पुरुषांनीं साधूंची नित्य निंदा केली तर त्यांत आश्चर्य कसलें ? कारण थोर पुरुषांच्या पायांच्या धुळीनेंहि त्या देहात्मवाद्यांचें तेज फिक्कें होत असतें. अर्थात् मत्सरप्रेरित होऊन यांनीं थोर पुरुषांची निंदा करावी, हें त्यांच्या वृत्तीला शोभेसेंच आहे ॥ १३ ॥ पाहा कीं, शंकराचें दोन अक्षरी नांव जें शिव तें प्रसंगानुसार एकवार जरी मुखानें उच्चारलें, तरी तें मनुष्याच्या पापाचा तत्काल नाश करतें. त्याचें यश परम पवित्र आणि त्याची आज्ञा सर्वथा अनुल्लंघनीय असतांहि अपवित्र असा तूं, त्या शिवाचा द्वेष करतोस, याला काय म्हणावें ? ॥ १४ ॥ ब्रह्मानंदरूप मकरन्दाचा स्वाद मिळावा म्हणून साधूंची अन्तःकरणें ज्याच्या चरणकमलाची भ्रमरांप्रमाणें निरंतर सेवा करतात आणि जे चरणकमल सकाम लोकांना इच्छित भोग प्राप्त करून देतें; त्या विश्वाचें कल्याण करणाऱ्या शंकराचा तूं द्रोह करतोस ! ॥ १५ ॥ तुझ्या म्हणण्याप्रमाणें शंकर अगदीं अपवित्र आहे. कारण तो आपल्या जटा मोकळ्या सोडून स्मशानांत राहातो, प्रेतांवरच्या माळा गळ्यांत घालतो, चिताभस्म लावतो, मनुष्यकपालांचे अलंकार धारण करतो व पिशाचांशीं सहवास ठेवितो. पण ह्या गोष्टी तुझ्याशिवाय दुसरे जे ब्रह्मदेवप्रभृति थोर पुरुष आहेत त्यांना माहीत नाहींत काय ? आणि त्यांना माहीत असतांनाच ते शंकराच्या

चरणांवरील निर्माल्याला आपल्या मस्तकीं धारण करितात ॥ १६ ॥ हे दक्षा, धर्माचें पालन करणाऱ्या ईश्वराची कोणी मनुष्य निरर्गलपणें निंदा करीत असतां, त्याला शिक्षा करण्याचें जर त्यास सामर्थ्य नसेल, तर त्यानें कानांवर हात ठेवून तेथून निघून जावें; पण प्रतिकार करण्याचें सामर्थ्य असेल तर तें अमंगल करणाराची जिव्हा त्यानें तोडून टाकावी. तसें करण्यांत प्राणत्याग करावा लागला तरी करावा, हा धर्म होय ॥ १७ ॥ यास्तव ज्या अर्थीं तूं त्या नीलकण्ठाची निन्दा करतोस, त्या अर्थीं तुझ्यापासून उत्पन्न झालेलें हें माझें शरीर मी यापुढें धारण करूं इच्छीत नाहीं. मनुष्यानें चुकून एखादें अपवित्र अन्न खाल्लें, तर त्याच्या शुद्धतेचा उपाय म्हणजे तें अन्न ओकून टाकणें हाच होय, असें म्हटलें आहे ॥ १८ ॥ आपल्याच स्वरूपामध्यें रममाण होणाऱ्या अत्यंत मननशील पुरुषाच्या बुद्धीला वेदांतील कर्मकांडवचनांना अनुसरावें असें वाटत नाहीं. कर्मठ आणि ज्ञानी यांचे मार्ग, मनुष्यें आणि देव यांच्या मार्गाप्रमाणें भिन्न आहेत. प्रत्येकानें आपआपल्या धर्मानें राहावें; पण तसें करतांना दुसऱ्याची निंदा मात्र करूं नये ॥ १९ ॥ प्रवृत्तिमार्गहि खरा आहे आणि निवृत्तिमार्गहि खरा आहे; कारण वेदामध्यें या दोन्ही मार्गांचें व्यवस्थेनें विवेचन केलेलें आहे. आतां दोन्ही मार्ग एकदम कोणी आचरण करूं म्हणेल तर तें मात्र शक्य नाहीं. या दोन मार्गांपैकीं कर्ममार्गाची गति ब्रह्मस्वरूप शंकराच्या ठिकाणीं होत नाहीं ॥ २० ॥ हे पित्या दक्षा, वैराग्यशील पुरुषांनीं ज्याचें सेवन केलें, ते गूढ ज्ञानमार्ग आम्हीं अंगिकारिलेले आहेत. त्यांत तुमची गति होणें शक्यच नाहीं. त्या ज्ञानमार्गाची जागा यज्ञशाळांमध्यें नाहीं. तुमचे कर्मठांचे जे मार्ग आहेत, त्यांची स्तुति यज्ञांतील अन्नानें ढेंकर देणारे लोकच करूं जाणतात ॥ २१ ॥ हा माझा देह आतां मला पुरे झाला. शंकराचा अपराध करणारा, अशा तुझ्यापासून त्याची उत्पत्ति असल्यामुळें तो निंद्य झाला आहे. तुझ्यासारख्या दुष्ट पुरुषाच्या संगतीमुळें मला मोठी लाज उत्पन्न झाली आहे. थोरांची निंदा करणाराचा जन्म व्यर्थ होय. त्याला धिक्कार असो! ॥ २२ ॥ दक्षा, ज्या वेळीं भगवान् शंकर 'हे दाक्षायणि' अशी मला हाक मारून तुझ्या नांवाचा संबंध दाखवितो, त्या वेळीं माझ्या मनाला अत्यन्त दुःख होतें आणि थट्टा किंवा हास्य हीं मला सुचत नाहींशीं होतात. यास्तव तुझ्या शरिरापासून उत्पन्न झालेलें हें प्रेततुल्य शरीर मी आतां टाकून देतें" ॥ २३ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, त्या यज्ञामध्यें सतीनें दक्षाला उद्देशून याप्रमाणें भाषण केलें. नंतर तिनें पिवळें वस्त्र परिधान केलें आणि ती पृथ्वीवर उत्तरेकडे तोंड करून बसली. तिनें मौन धारण करून आचमन केलें आणि डोळे मिटून योगसमाधींत प्रवेश केला ॥ २४ ॥ सर्वांना प्रिय असलेल्या अशा त्या सतीनें प्रथम आपलें आसन निश्चल करून प्राण व अपान या दोन वायूंना समतोल केलें. नंतर उदानाला नाभिचक्रापासून उठवून हृदयांत आणलें व बुद्धीसह त्याला तेथें स्थिर केलें. नंतर हृदयांत स्थिर झालेल्या त्या वायूला तिनें हळूहळू कण्ठमार्गानें भृकुटीच्या मध्यभागीं नेलें ॥ २५ ॥ याप्रमाणें ज्या

शरिराला थोरांतही थोर अशा शंकरासारख्या थोर पुरुषानें आपल्या अंकावर बारंवार घेऊन ज्या शरिराचा प्रेमानें आदर केला होता, तें आपलें शरीर, दक्षाविषयीं उत्पन्न झालेल्या क्रोधामुळें टाकून देण्याची इच्छा त्या मानी सतीदेवीला झाली आणि तिनें आपल्या शरिरांत अग्नि व वायु यांची योगमार्गानें धारणा केली ॥ २६ ॥ याप्रमाणें अग्नि व वायु यांची धारणा केल्यावर त्या निष्पाप सतीनें सर्व जगाचा गुरु व आपला पति जो शंकर, त्याच्या चरणकमलाचें चिंतन सुरू केलें आणि आपलें अंतःकरण शंकरमय करून दृष्टि शून्य केली. अशा रीतीनें समाधियोग साधल्यांवर त्या समाधीपासून उत्पन्न झालेल्या अग्नीच्या योगानें तिनें आपला देह प्रज्वलित केला ॥ २७ ॥ तें अद्भुत कर्म पाहून आकाशांतून देवादिकांनीं व पृथ्वीवरून मनुष्यादिकांनीं मोठा हाहाःकार केला. ते म्हणाले, 'अहो ! भगवान् शंकराची प्रियपत्नी, सर्व जगाचे दैवत जी सती देवी, तिला दक्षप्रजापतीनें क्रुद्ध केल्यामुळें तिनें प्राणत्याग कीं हो केला ! ॥ २८ ॥ अहो ! सर्व स्थावरजंगमात्मक जग ज्याची प्रजा आहे अशा ह्या दक्षप्रजापतीचा केवढा हा दुष्टपणा होय ! ही उदारमनस्क सतीनामक त्याची कन्या, नित्य सन्मानास पात्र असतांहि ह्यानें तिचा अपमान केला व त्यामुळें तिनें प्राणत्याग केला ! ॥ २९ ॥ ब्रह्मद्रोह करणाऱ्या दुष्टहृदयी अशा ह्या दक्षाची जगांत मोठी अपकीर्ति होईल. कारण शंकराचा द्वेष करून ह्यानें स्वतः आपल्या कन्येचा अपराध केला व ती प्राण देण्यासाठीं सिद्ध झाली असतांहि ह्यानें तिचें निवारण सुद्धां केलें नाहीं !' ॥ ३० ॥ लोक असें बोलत असतां सतीनें केलेला प्राणत्यागाचा अद्भुत प्रकार पाहून शंकराचे पार्षदगण आपलीं शस्त्रें उभारून दक्षाला ठार करण्यासाठीं उभे राहिले ॥ ३१ ॥ ते गण वेगानें चाल करून येत आहेत असें पाहून भगवान् भृगुमुनीनें, यज्ञांत विघ्न आणणाऱ्या पुरुषांचा नाश करण्यास समर्थ अशा यजुर्वेदमंत्रानें दक्षिणाग्नीमध्यें हवन केलें ॥ ३२ ॥ याप्रमाणें त्या यज्ञांतील अध्वर्यु जो भगवान् भृगुमुनि यानें यजुर्मंत्रानें हवन केलें, त्याबरोबर ज्यांना पूर्वीं तपश्चर्येच्या योगानें सोमरसपानाचा अधिकार मिळाला होता ते ऋभु नांवाचे सहस्रावधि देव मोठ्या वेगानें अग्नींतून बाहेर पडले ॥ ३३ ॥ त्यांनीं आपल्या हातांत जळत्या कोलत्या आयुधें म्हणून घेतल्या होत्या व ते ब्रह्मतेजानें तळपत होते. त्या कोलत्यांनीं त्यांनीं यज्ञादिकांसह त्या प्रमथादि शिवगणांना ठार करण्यास आरंभ केला. तेव्हां ते सारे गण दाही दिशांनीं पळून गेले ॥ ३४ ॥

**चौथा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ५ वा

मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, दक्षप्रजापतीनें आपल्या पत्नीचा अपमान केल्यामुळें तिनें देहत्याग केला व त्या दक्षाच्या यज्ञांत उत्पन्न झालेल्या ऋभुदेवांनीं आपलें पार्षदसैन्य पळवून लाविलें, ही गोष्ट नारदऋषींपासून शंकरानें जेव्हां ऐकली, तेव्हां त्याला अतिशय क्रोध उत्पन्न झाला ॥ १ ॥ त्या रागानें तो जटिल असा उग्रस्वरूपी शंकर आपले ओठ चावूं लागला. त्यानें लगेच विद्युल्लता व अग्नि यांच्या ज्वाळेप्रमाणें अतिशय तेजस्वी अशी आपली एक जटा उपटून काढली आणि उभा राहून व हसण्याचा आविर्भाव आणून मोठी गंभीर गर्जना करीत त्यानें ती जटा भूमीवर आपटली ॥ २ ॥ त्याचबरोबर आपल्या शरिरानें स्वर्गाला स्पर्श करणारा असा प्रचण्ड शरिराचा एक उंच पुरुष त्या जटेपासून उत्पन्न झाला. त्याला हजार बाहु होते, त्याची कांति मेघाप्रमाणें काळी होती. सूर्याप्रमाणें अतिशय तेजस्वी असे तीन नेत्र असून त्याच्या दाढा भयंकर होत्या. त्याचे केंस पेटलेल्या अग्नीप्रमाणें तेजस्वी होते व त्यानें आपल्या कण्ठांत नरकपालांच्या माळा धारण केल्या असून आपल्या हातांत अनेक सज्ज आयुधें धारण केलीं होतीं ॥ ३ ॥ त्या पुरुषानें हात जोडून, 'मी आपलें कोणतें कार्य करूं तें सांगा!' अशी शंकराची प्रार्थना केली; तेव्हां भगवान् भूतनाथ शंकर म्हणाले, 'हे वीरभद्रा, तूं युद्धकुशल आहेस, यास्तव या माझ्या योद्धयांचें आधिपत्य स्वीकारून तूं दक्षप्रजापतीचा वध कर! त्याच्या यज्ञाचा विध्वंस करून टाक! तूं माझाच अंश आहेस ॥ ४ ॥ विदुरा, याप्रमाणें क्रुद्ध झालेल्या त्या शंकराची आज्ञा ऐकतांच वीरभद्रानें त्या सर्व समर्थ अशा महादेवाला प्रदक्षिणा घातली. त्या वेळीं त्याच्या शरिरांत इतकी वीरश्री संचरली होती कीं, आपल्या अकुण्ठित वेगानें आपण मोठमोठया वीरांच्या सामर्थ्यालाहि सहज तोंड देऊं असें त्याला वाटूं लागलें ॥ ५ ॥ मग शंकराचे पार्षद गण आरोळया मारीत त्याच्या मागें जमा झाले असतां त्यानें एक भयंकर आरोळी ठोकली आणि त्रैलोक्याचा संहार करणारा जो मृत्यु त्याचाहि नाश करण्यास समर्थ असा आपला त्रिशूल वर करून, पायांतील भूषणांचा नाद करीत तो वीरभद्र यज्ञभूमीकडे चाल करून गेला ॥ ६ ॥ इकडे त्या यज्ञमंडपांत असलेले उपाध्याय, यजमान, सभासद ब्राह्मण व त्यांच्या स्त्रिया अशीं सर्व, उत्तर दिशेकडे उडत असलेला धुरळा पाहून 'अरे, हा अंधकार कसला? हा धुरळा आला तरी कोठून?' असें आपसांत बोलून विचार करूं लागली ॥७॥ तीं म्हणालीं, वारा तर वाहत नाहीं! बरें, चोर असतील म्हणावें तर तसाहि संभव नाहीं; कारण अपराध्यांना कडक शिक्षा करणारा प्राचीनबर्हि राजा अद्याप जिवंत आहे. गाईहि लवकर लवकर हांकून घरीं नेण्याची ही वेळी दिसत नाहीं. मग हा धुरळा कोठून उत्पन्न

झाला ? जगाच्या प्रलयाची वेळ झाली कीं काय ? ॥ ८ ॥ दक्षपत्नी प्रसूति आदिकरून स्त्रियांचीं अन्तःकरणें तर फारच खिन्न झालीं. त्या म्हणूं लागल्या, 'सतीनें कोणताहि अपराध केला नसतां दक्षप्रजापतीनें सर्व कन्यांच्या देखत त्या आपल्या कन्येचा जो अपमान केला, त्या पापाचें च हें फल असावें ॥ ९ ॥ विशेषतः प्रलयकाळीं आपला जटाभर अस्ताव्यस्त मोकळा सोडून जो आपल्या त्रिशूळाच्या टोंकांनीं मोठमोठ्या दिग्गजांना टोंचून धरतो व मेघगर्जनेसारख्या प्रचण्ड अट्टहासानें सर्व दिशांचे जणूं तुकडे उडवीत आहे अशा शस्त्रांनीं युक्त असलेले आपले बाहुरूपी ध्वज पसरून नृत्य करीत असतो, अशा त्या शंकराला संताप आणून कोणाचें तरी कल्याण होईल काय ? ज्या शंकराचें तेज असह्य असून जो रागानें नित्य भरलेला असतो, ज्याची वक्रभ्रुकुटी सहन करणें कठीण, जो आपल्या भयंकर दाढांच्या प्रभेनें नक्षत्रगणांचें तेजहि नष्ट करतो, त्याच्या रागापुढें ब्रह्मदेव असला तरी त्याचीहि सुटका होणार नाहीं ! ॥ १० ॥ ॥ ११ ॥ अशा प्रकारच्या विचारतरंगांचे उद्गार काढीत त्या महात्म्या दक्षाची मंडळी कावरीबावरी होऊन त्या धूलिमय झालेल्या दिशेकडे पाहात असतां, आकाशांत, पृथ्वीवर व सर्वत्र भयंकर असे हजारों महोत्पात होऊं लागले ॥ १२ ॥ विदुरा, इतक्यांत ते शंकराचे गण त्या यज्ञभूमीवर चोहोंकडून चाल करून आले. त्यांच्या हातांत अनेक प्रकारचीं आयुधें असून तीं त्यांनीं सज्ज ठेविलीं होतीं. त्यांपैकीं कित्येक ठेंगणे होते, तर कित्येक काळे व कित्येक पिंगटवर्णाचे होते व कित्येकांचीं उदरें व मुखें मगरासारखीं होतीं ॥ १३ ॥ त्यांनीं येतांच सर्व यज्ञमंडप व्यापून टाकला व विध्वंस करण्याचा सपाटा चालविला. कित्येकांनीं प्राग्वंश ( यज्ञमंडपाचें पूर्वपश्चिम आढें ) तोडलें. कोणीं स्त्रियांना बसण्याची जागा मोडून टाकली. कित्येकांनीं सदोनामक मण्डप मोडला, तर इतरांनीं आग्नीध्रशाला, यजमानाचें क्रीडागृह व पाकशाला यांचा विध्वंस केला ॥ १४ ॥ कांहींनीं यज्ञपात्रें फोडलीं, तर कित्येकांनीं अग्नीचा विध्वंस केला. कित्येकांनीं अग्निकुण्डामध्यें मूत्रोत्सर्ग केला तर इतरांनीं उत्तरवेदीचीं सीमासूत्रें तोडून टाकलीं ॥ १५ ॥ कांहीं गण ऋषींचा छळ करूं लागले, तर कित्येक स्त्रियांना धाक घालूं लागले आणि कित्येक पळून जाणाऱ्या देवांना धरूं लागले ॥ १६ ॥ मणिमानानें भृगुऋषीला आणि वीरभद्रानें दक्षप्रजापतीला धरून बांधलें; तसेंच चण्डीशानें पूषादेवाला आणि नंदिकेश्वरानें भगनामक देवाला पकडून बांधलें ॥ १७ ॥ हा प्रकार पाहून सर्वच ऋत्विज, सभासद व देव, शंकराच्या पार्षदगणांनीं फेंकलेल्या पाषाणांच्या प्रहारांनीं अतिशय पीडित होत्साते जिकडे वाट मिळेल तिकडे पळूं लागले ॥ १८ ॥ पूर्वी भृगुऋषि अमरसभेंत आपली दाढीमिशी हालवीत शंकराला हंसला होता म्हणून त्या भृगूची दाढीमिशीच, तो हातांत स्रुवा घेऊन होम करीत असतां वीरभद्रानें उपटून टाकली ॥ १९ ॥ दक्षप्रजापति शंकराची निंदा करीत असतां सभेंत बसलेल्या भगानें आपल्या डोळ्यांनीं, दक्षाला ठीक करतोस असें खुणविलें होतें; म्हणून त्या भगाला वीरभद्रानें जमिनीवर पाडलें आणि त्याचे डोळे

बाहेर काढले ॥ २० ॥ जगद्‌गुरु शंकराला दक्ष शाप देत असतां पूषा आपले दांत दाखवून हसला होता म्हणून जसे बलरामानें कलिंगराजाचे दांत पाडले त्याप्रमाणें वीरभद्रानें त्या पूषादेवाचे दांत पाडून टाकले ॥ २१ ॥ मग तो वीरभद्र दक्षप्रजापतीच्या उरावर बसला आणि तीक्ष्ण धारेच्या आपल्या खड्गानें त्याचें शिर तोडूं लागला; पण त्याच्यानें ते शिर धडापासून वेगळें मात्र करवलें नाहीं ॥ २२ ॥ आपल्या अस्त्रसहित शस्त्रांनीं त्या यक्षाची त्वचा तुटत नाहीं, असें पाहून पशुपति वीरभद्राला फार आश्चर्य वाटलें आणि असें कां व्हावें, याविषयीं तो पुष्कळ वेळपर्यंत विचार करूं लागला ॥ २३ ॥ शेवटीं यज्ञांत पशूचा वध ज्या संज्ञपननामक विधीनें करतात, त्या विधीनेंच यास मारावें असें त्याच्या लक्षांत आलें आणि त्याला अनुसरून त्यानें यजमानरूप पशु जो दक्ष त्याचें मस्तक धडापासून वेगळें केलें ! ॥ २४ ॥ त्या वेळीं भूतगण, प्रेत आणि पिशाच ह्या मंडळींनीं फार उत्तम असें म्हणून वीरभद्राच्या त्या कृत्याची प्रशंसा केली; पण इतरांनीं मात्र हाय हाय !! काय हें ! असे उद्गार काढले ॥ २५ ॥ मग अतिशय क्रुद्ध झालेल्या त्या वीरभद्रानें दक्षमस्तकाचें दक्षिणाग्नींत हवन केलें आणि यज्ञमण्डप जाळून तो कैलासपर्वतावर निघून गेला ॥ २६ ॥

**पांचवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ६ वा

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, याप्रमाणें शंकराच्या सैन्यानें शूल, पट्टे, खड्ग, गदा, परिघ व मुद्गर ह्या आयुधांच्या साहाय्यानें उपाध्याय आणि सभासद ह्यांसहवर्तमान सर्व देवगणांचा पराभव केला आणि त्यांचे सर्व अवयव छिन्नभिन्न करून टाकले. तेव्हां ते देवगण भयानें व्याकुळ होऊन ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्याला नमस्कार करून ही इत्थंभूत गोष्ट त्यांनीं त्याला निवेदन केली ॥ १ ॥ २ ॥ कमलोद्भव ब्रह्मदेव व विश्वव्यापी नारायण ह्यांना असें होणार हें पूर्वींच माहीत होतें आणि म्हणूनच ते दोघे दक्षप्रजापतीच्या यज्ञाला गेले नव्हते ॥ ३ ॥ तो वृत्तान्त ऐकून घेऊन ब्रह्मदेव देवांना म्हणाला,—देवहो, लोकांमध्यें असा एक सामान्य नियम आहे कीं, अतिशय बलाढ्य पुरुषांचा अपराध करून त्यायोगें उत्कर्षाची कोणी इच्छा करील तर त्याची इच्छा बहुधा कल्याणकारक होत नाहीं ॥ ४ ॥ असें असतांहि तुम्ही ज्या अर्थीं शंकराचा हविर्भाग बंद केला, त्या अर्थीं तुमच्या-कडून त्याचा अपराध घडला आहे. तथापि शंकर लवकर प्रसन्न होणारा असल्यामुळें तुम्ही त्याचे चरणकमल घट्ट धरून निर्मळ अन्तःकरणानें त्याला प्रसन्न करून घ्या ॥ ५ ॥ देव हो, ह्या यज्ञाचें पुनरुज्जीवन व्हावें अशी जर तुमची इच्छा असेल, तर आतां तुम्ही त्वरित जाऊन त्या महादेवापाशीं क्षमा मागा. तो एकदां क्रुद्ध झाला तर त्रैलोक्य आणि त्यांतील लोकपाल ह्यांची क्षणांत राख करील असें त्याचें सामर्थ्य आहे. दक्षाचीं दुर्भाषणें त्याच्या मर्मस्थानीं लागलीं असून त्यांत आणखी प्रियपत्नीच्या वियोगाची भर पडली आहे ॥ ६ ॥ तो शंकर स्वतन्त्र असून त्याचें खरें स्वरूप, बल आणि पराक्रम हीं मलाहि अद्यापि कळलेलीं नाहींत. तशींच तीं इन्द्राला, तुम्हांला किंवा दुसरे जे देहधारी पुरुष आहेत त्यांना व ऋषींना सुद्धां समजलेलीं नाहींत. तेव्हां अशा त्या महादेवाची क्षमा मागून त्याचें सांत्वन करणें हा एकच उपाय आहे. दुसरा मार्ग नाहीं ! ॥ ७ ॥ याप्रमाणें देवांना आज्ञा करून ब्रह्मदेव प्रजापतीसह पितरांना बरोबर घेऊन आपल्या सत्यलोकाहून निघाला आणि सर्वसमर्थ अशा महादेवाचें आवडतें स्थान जो पर्वतश्रेष्ठ कैलास त्यावर गेला ॥ ८ ॥ औषधि, तप, मन्त्र व योग यांच्या योगानें जन्मतःच ज्यांनीं सिद्धि प्राप्त करून घेतली आहे, अशा देवादिकांनीं त्या कैलासपर्वतावर वास केला होता. त्याप्रमाणेंच किन्नर, गन्धर्व व अप्सरा यांनींहि तो पर्वत नित्य गजबजून गेलेला असे ॥ ९ ॥ त्या पर्वताचीं शिखरें अनेक प्रकारच्या रत्नांचीं बनलेलीं असून तीं शिखरें पिवडी, गेरू, खडू इत्यादि अनेक प्रकारच्या धातूंनीं चित्रविचित्र झालेलीं आहेत. त्यांवर अनेक जातींचे वृक्ष, वेली व गुच्छ असून, तेथें अनेक जातींच्या पक्ष्यांचाहि नित्य निवास असतो ॥ १० ॥ त्या पर्वतावर स्वच्छ पाण्याचे अनेक झरे असून अनेक प्रकारच्या गुहा व शिखरें यांनीं युक्त असल्यामुळें पतींसह क्रीडेसाठीं आलेल्या सिद्धस्त्रियांना तो फारच

रमणीय वाटतो ॥ ११ ॥ मयूरांच्या केकांनीं तो नेहमीं दणाणून जात असून पुष्पांतील मकरन्द प्राशन करून मदान्ध झालेले भ्रमर तेथें निरनिराळ्या रागांत गुंजारव करतांना आढळून येतात. तेथें कोकिलांचे गोड स्वर व पक्ष्यांचे मधुर शब्द नित्य ऐकूं येतात ॥ १२ ॥ उंच उंच शाखारूपी हस्तांनीं युक्त असलेल्या कल्पवृक्षांनीं तो जणूं काय पक्ष्यांना आपल्याकडे बोलावीतच आहे असें वाटतें. मोठमोठे हत्ती त्यावर फिरत असल्यामुळें तो पर्वत चालतच आहे असें दिसतें व झऱ्यांच्या झुळझुळ ध्वनीमुळें तो बोलतच आहे कीं काय असा भास होतो ॥ १३ ॥ मंदार, पारिजातक, सुरू, तमाल, शाल, ताल, कांचन, असाणा व अर्जुन या वृक्षांनीं तो सुशोभित झालेला असून आम्र, कदम्ब, निंब, अशोक, नागचांफे, उंडी, सोनचांफे, गुलाब, अशोक, बकुल, कुंद व काटेशेवंती इत्यादिकांनींहि तो भरून गेलेला होता ॥ १४ ॥ १५ ॥ सुवर्णाच्या वर्णाचीं कमलें, उत्तम उत्तम वेलदोड्यांचीं झाडें, जाई, कुडे, मोगरी व कस्तुरीमोगरी ह्यांनीं तो पर्वत सुशोभित दिसत होता ॥ १६ ॥ तसेंच फणस, उंबर, पिंपळ, पिंपरी, वड, हिंगु, भूर्जवृक्ष, साध्या पोफळी व राजपोफळी, जांभळी, खजूर, आंबाडा, उत्तम उत्तम आम्रवृक्ष, तसेंच चार, मोह, हिंगणमिंठे आणि इतर जातींचे वृक्ष आणि भरींव वेळू व पोकळ वेळू यांच्यामुळें त्या पर्वतावर अपूर्व शोभा दिसत असे ॥१७॥१८॥ त्या पर्वतावर अनेक सरोवरें असून त्यांत कुमुद, उत्पल, कल्हार, शतपत्र इत्यादि प्रकारच्या कमलांचे समूह प्रफुल्लित झाले होते, त्यामुळें कमलिनींवर बसून मधुर शब्द करणाऱ्या पक्ष्यांच्या थव्यांनीं तो पर्वत फारच सुशोभित दिसत होता ॥१९॥ हरिण, वानर, वराह, सिंह, साळी, गवे, शरभ, वाघ, काळवीट व वनमहिष; तसेंच कर्णान्त्र, एकपद, किन्नर, लांडगे व कस्तुरीमृग यांनीं तो पर्वत व्यापलेला असून कमलिनींच्या वाळवंटावरील केळींच्या गर्द झाडीमुळें त्याला विशेषच मोहकपणा प्राप्त झाला होता ॥ २० ॥ २१ ॥ नंदा नांवाच्या नदीनें तो पर्वत वेष्टिलेला असून तिचें पाणी सतीदेवीच्या स्नानानें अत्यन्त पवित्र झालें होतें. अशा त्या कैलासपर्वताला पाहून देव आश्चर्यचकित झाले ॥ २२ ॥ त्या पर्वतावर मनोहर अशी अलका नांवाची नगरी होती व सौगन्धिक नांवाच्या वनांत सौगन्धिक नांवाचींच कमलें होतीं, तींहि तेथे देवांना पाहावयास मिळालीं ॥ २३ ॥ त्या अलकानगरीच्या बाहेरच्या बाजूस नंदा आणि अलकनंदा अशा दोन नद्या श्रीहरीच्या चरणांवरील कमलांच्या परागानें अत्यंत पवित्र झालेल्या अशा होत्या ॥ २४ ॥ हे विदुरा, थकून गेलेल्या देवाङ्गना सुरतक्रीडेस्तव स्वर्गांतून खालीं उतरून ह्या नद्यांमध्यें स्नानासाठीं येतात व आपल्या पुरुषांच्या अंगावर पाणी शिंपडीत शिंपडीत त्यांत जलक्रीडा करतात ॥ २५ ॥ त्या देवाङ्गनांच्या शरीराला लाविलेलें केशर स्नानाच्या वेळीं ह्या नद्यांच्या पाण्यांत धुऊन निघाल्यामुळें तें पाणी पिंवळें होतें व त्यामुळें तहान लागली नसली तरीहि हत्ती तें उदक हत्तिणीला पाजतात आणि स्वतःहि पितात ॥ २६ ॥ ती अलका-नगरी रुप्याच्या, सोन्याच्या व महामोल रत्नांच्या शेंकडों विमानांनीं भरून गेली असून यक्षस्त्रिया तेथें फिरत असल्यामुळें, चित्रविचित्र रंगांच्या मेघांवर विजा चमकत असतां जसा

देखावा दिसतो, तसा त्या नगरीचा देखावा दिसत होता. कुबेराची नगरी सोडून देव पुढें गेले, तों त्यांना सौगन्धिक वन लागलें. त्यामध्यें आश्रितजनांची इच्छा पूर्ण करणारे व चित्रविचित्र फुलांनीं, फलांनीं व पानांनीं भरलेले अनेक कल्पवृक्ष असल्यामुळें तें वन फार मनोहर दिसत होतें ॥ २७ ॥ २८ ॥ तेथें भ्रमर गुंजारव करीत होते व कोकिल पक्ष्यांचे थवे आपल्या स्वरांनीं त्या गुंजारवाला अधिक मनोहरता आणीत होते. तें वन राजहंसांच्या कळपाला फारच प्रिय असून कमलांनीं भरलेलीं अनेक सरोवरें त्यांत होतीं ॥ २९ ॥ वनगजांनीं आपलीं गण्डस्थळें त्या अरण्यांतील चंदनवृक्षांना घासल्यामुळें त्या वृक्षांवरून वाहणारा वायु चंदनरसानें सुगंधित होई व त्यामुळें त्याचा स्पर्श झाला असतां यक्षस्त्रियांचीं अन्तःकरणें क्षुब्ध होऊन जात ॥ ३० ॥ तेथें कमळांनीं भरलेल्या अनेक विहिरी होत्या व त्यांत उतरण्यासठीं वैडूर्यरत्नांच्या पायऱ्या बांधल्या होत्या. त्या ठिकाणीं अनेक किंपुरुष विहारासाठीं येत असत. असें तें सौगंधिक वन पाहात देव पुढें गेले असतां एक वटवृक्ष त्यांच्या दृष्टीस पडला ॥ ३१ ॥ त्याची उंची शंभर योजनें असून शाखांचा विस्तार पाऊणशें योजनें होता. त्याच्या सभोंवतीं दाट छाया पडली असून त्यावर पक्ष्यांचीं घरटीं मुळींच नव्हतीं व तेथें कोणत्याहि प्रकारचा ताप होत नव्हता ॥ ३२ ॥ मुमुक्षुजनांचा आश्रयच अशा त्या महायोगरूपी वटवृक्षाखालीं बसलेला शंकर त्यांच्या दृष्टीस पडला. क्रुद्धस्वरूप टाकून दिलेल्या यमराजासारखा तो दिसत होता ॥३३॥ त्याची मूर्ति अगदीं शांत होती व सनन्दनप्रभृति शांत असे मोटमोठे सिद्ध पुरुष आणि यक्ष व राक्षस यांचा अधिपति कुबेर हे त्याची सेवा करीत होते ॥ ३४ ॥ ज्ञान, उपासना आणि योगसमाधि या मार्गांत तो परमेश्वर रममाण झाला होता. जगाचें कल्याण करणारा असल्यामुळें त्याच्या प्रेमास्तव लोकांना हितकारक होईल असेंच तो आचरण करीत होता ॥ ३५ ॥ त्याच्या शरिराची अङ्गकान्ति संध्याकाळच्या मेघाप्रमाणें आरक्तवर्ण दिसत होती. त्यानें आपल्या शरिरावर तपस्व्याला योग्य अशीं भस्म, दण्ड, जटा व चर्म हीं चिन्हें व मस्तकावर चन्द्रकोर धारण केली होती ॥ ३६ ॥ तो दर्भाच्या आसनावर बसला होता; त्याच्याजवळ पुष्कळ सत्पुरुष श्रवणासाठीं बसले होते व ते ऐकत असतां नारदाच्या प्रश्नावरून त्याला तो सनातन ब्रह्मज्ञानाचा उपदेश करीत होता ॥ ३७ ॥ उजव्या मांडीवर त्यानें आपला डावा पाय आणि गुडघ्यावर बाहू ठेविले होते व मनगटांत रुद्राक्षमाळा धारण केली होती आणि तर्[1]कमुद्रा लावून तो

१ तर्जन्यङ्गुष्ठयोरग्रे मिथः संयोज्य चाङ्गुलिः ।
विस्तार्य बन्धनं प्राहुस्तर्कमुद्रेति मान्त्रिकाः ॥

आंगठ्याजवळचें बोट ( तर्जनी ) व आंगठा यांचीं अग्रें परस्परांशीं जोडून ( तपकिरीची चिमूट घेतांना करतात तशीं ) बाकीचीं बोटें बसलेलीं ठेविलीं म्हणजे या बन्धाला मान्त्रिक लोक ' तर्कमुद्रा ' असें म्हणतात.

वीरासन[1] घालून बसला होता ॥ ३८ ॥ विचारवान् पुरुषांमध्यें श्रेष्ठ अशा त्या मननशील शंकरानें आपली डावी मांडी घट्ट बसावी म्हणून योगपट्ट धारण केला होता आणि ब्रह्मानन्दीं चित्त एकाग्र करून तो स्थिर बसला होता. अशा त्या शंकराला पाहून लोकपालांसह सर्व ऋषींनीं त्याला नमस्कार केला ॥ ३९ ॥ मोठे मोठे देव व दैत्य हे ज्याच्या चरणाला नित्य वंदन करतात व जो सर्वांना अत्यंत पूज्य आहे, असा तो शंकर, ब्रह्मदेव आलेला आहे असें पाहतांच उठून उभा राहिला आणि वामनस्वरूपी विष्णूनें कश्यपप्रजापतीला आपला पिता म्हणून वंदन करावें, त्याप्रमाणें त्यानें ब्रह्मदेवाला मस्तक लववून नमस्कार केला ॥ ४० ॥ त्याचप्रमाणें शंकराच्या सभोंवतीं जे दुसरे सिद्धगण व महर्षी होते त्यांनींहि ब्रह्मदेवाला नमस्कार केला. अशा रीतीनें सत्कार झाला असतां ब्रह्मदेव हसत हसत नमस्कार करणाऱ्या त्या शंकराला म्हणाला ॥ ४१ ॥

ब्रह्मदेव म्हणाला,—शंकरा, तूं सर्व विश्वाचा नियन्ता असून जगाचें उत्पत्तिस्थान जी प्रकृति आणि बीजरूप जो पुरुष, त्या प्रकृतीचें व पुरुषाचेंहि कारण असें जें भेदरहित परब्रह्म तेंहि तूंच आहेस, हें मीं जाणतों ॥ ४२ ॥ हे षड्गुणैश्वर्यसंपन्न शंकरा, जसा कोळी खेळतां खेळतां तंतु उत्पन्न करून जाळें बनवितो, कांहीं वेळ त्याचें रक्षण करतो व शेवटीं स्वतःच्या अंगांतच त्याला गुप्त करतो, त्याप्रमाणें तूं एकरूप असलेल्या प्रकृतिपुरुषाच्या ठिकाणीं क्रीडा करतां करतां हें जग उत्पन्न करतोस, ह्याचें पालन करतोस आणि शेवटीं त्याचा संहारहि करतोस ॥ ४३ ॥ धर्म व अर्थ यांची प्राप्ति करून देणारी जी वेदत्रयी तिचें रक्षण करण्यासाठीं दक्षाला निमित्त करून तूंच यज्ञ उत्पन्न केलास आणि धर्मनियमांचें पालन करणारे ब्राह्मण ज्या धर्ममर्यादांचें पालन करतात त्या धर्ममर्यादा तूंच लावून दिलेल्या आहेस ॥ ४४ ॥ हे मंगलस्वरूपा शंकरा, मंगलकारक कर्मे करणाऱ्या पुरुषांना स्वर्गलोक किंवा मोक्ष तूंच मिळवून देतोस व अशुभ कर्मे करणाऱ्यांना भयंकर नरकांतहि तूंच टाकतोस. असें असतां एखाद्या पुरुषाला चांगल्या कर्मांचें विपरीत फल मिळतें ह्याचें कारण काय?* ॥ ४५ ॥ ( असें होण्याला कारण तुझा कोप असें म्हणावें तर तेंहि संभवत नाहीं. कारण ) ज्यांनीं अन्तःकरण सर्वथा तुझ्या ठिकाणीं लावलें, सर्व प्राणिमात्रांत तूंच भरलेला आहेस अशी ज्यांनीं

---

१ शंकर वीरासन घालून बसला होता. त्याचें लक्षण असें:—

एकपादमथैकस्मिन्विन्यसेदूरुसंस्थितम् ।
इतरस्मिंस्तथाबाहुं वीरासनमिदं स्मृतम् ॥

एक पाऊल एका मांडीवर चढवून व दुसऱ्या मांडीवर बाहु ठेवून बसणें, ह्याला योगशास्त्रांत 'वीरासन' असें म्हणतात.

* दक्ष हा वेदमार्गाचें अनुष्ठान करणारा असतांना त्याचा नाश कां केला, असा या प्रश्नाचा रोख आहे.

दृष्टि ठेविली व सर्व भूतांना आत्मस्वरूपांतच अभेदभावानें पाहूं लागले, त्या सज्जनांचा पशूप्रमाणें नाश करणें ही गोष्ट तुझ्या क्रोधाकडूनहि होणार नाहीं ॥ ४६ ॥ हे शंकरा, ज्यांच्या अन्तःकरणांत द्वैतभाव दृढ झालेला असतो, ज्यांची दृष्टि कर्ममार्गात गढून गेलेली असते आणि ज्यांचीं अन्तःकरणें दुष्ट उद्देशांनीं भरलेलीं असतात, त्यांना दुसऱ्याचा उत्कर्ष पाहिला कीं मोठा हृद्रोग लागतो; मर्मभेदक दुर्भाषणें बोलून ते दुसऱ्याच्या मनावर प्रहार करतात; पण अशा पुरुषांचा दैवानेंच नाश केलेला असल्यामुळें आपल्यासारख्यांनीं त्यांच्या नाशास प्रवृत्त होणें इष्ट नाहीं ॥ ४७ ॥ दुर्धर परिणामाच्या अशा परमेश्वरी मायेनें ज्यांच्या चित्ताला मोह घातला, त्यांच्या दृष्टीमध्यें मी व दुसरा असा द्वैतभाव उत्पन्न होतो. अशा पुरुषांच्या हातून एखाद्या ठिकाणीं एखादे वेळीं अपराध घडला तरी सत्पुरुष आपल्या दयाळु स्वभावाला अनुलक्षून त्यांच्यावर कृपाच करतात; त्यांच्यावर आपला पराक्रम चालवून त्यांचा नाश करीत नाहींत ॥ ४८ ॥ शंकरा, तुला परमेश्वराच्या अगाध मायेनें मोह पाडलेला नाहीं, म्हणून तूं सर्वज्ञ आहेस. ज्यांच्या अन्तःकरणाला त्या मायेनें मोह पाडला आहे व त्यामुळें जे कर्में करण्यांत आसक्त होऊन गेले आहेत, अशा पुरुषांवर अनुग्रह करणेंच तुला उचित आहे ॥ ४९ ॥ यज्ञांत तुला शंकराला हविर्भाग मिळणें सर्वथैव उचित आहे. यज्ञ तडीस नेऊन त्याचें फल देणारा तूंच आहेस; परंतु अज्ञानी याज्ञिकांनीं तुला तो हविर्भाग दिला नाहीं व त्यामुळें त्या मनुपुत्र दक्षप्रजापतीचा यज्ञ समाप्त होण्याच्या पूर्वीच उद्ध्वस्त झालेला आहे; तरी आतां कृपा करून त्या केलेल्या यज्ञाचा पुनरुद्धार कर ! ॥ ५० ॥ हा दक्षप्रजापति पुनः जिवंत होवो, भगाला पुनः दृष्टि प्राप्त होवो, भृगूला पूर्वीप्रमाणें दाढीमिशा येवोत, असें कर ! ॥ ५१ ॥ रुद्रा, तुझ्या गणांनीं फेंकलेल्या शस्त्रांनीं व पाषाणांनीं देवांचीं व ऋत्विजांचीं गात्रें खिळखिळीं झालीं आहेत; यास्तव त्यांच्यावर अनुग्रह कर व त्यांना लवकर आरोग्य प्राप्त करून दे ! ॥ ५२ ॥ हे घोररूपा शंकरा, दक्षाच्या यज्ञाचा जो अवशिष्ट भाग राहिला होता, तो तुझाच भाग म्हणून असो. हे यज्ञविध्वंसका रुद्रा, त्या तुझ्या भागानें त्या यज्ञाची आतां तूं पूर्तता कर ! ॥ ५३ ॥

**सहावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७ वा

मैत्रेयमुनि म्हणाले,–विदुरा, ब्रह्मदेवानें अशा प्रकारें विनंती केली असतां शंकराला संतोष झाला आणि हंसूहि आलें. मग त्यानें 'ऐका!' असें म्हणून ब्रह्मदेवाशीं बोलण्यास प्रारम्भ केला ॥ १ ॥

शंकर म्हणाला,–हे प्रजापते, परमेश्वराच्या मायेनें ज्यांना मोहांत पाडलें आहे, अशा त्या लोकांचे अपराध मी आतां उच्चारीत नाहीं किंवा मनांतहि आणीत नाहीं; कारण त्या अपराधांबद्दल जो कांहीं दंड करावयाचा तो मी त्यांना करून चुकलों आहें ॥२॥ आतां दक्षप्रजापतीचें मस्तक जळून गेलें आहे, यास्तव तें बोकडाच्या मुखाचें होवो! तसेंच भगदेवाचे डोळे नष्ट झाल्यामुळें आपला यज्ञांतील हविर्भाग मित्रनामक देवाच्या डोळ्यांनींच तो यापुढें पाहो! ॥३॥ पूषादेवानें यजमानाच्या दांतांनींच यापुढें पीठभक्षणाचें कार्य करावें. देवांनीं मला यज्ञांतील अवशिष्ट हविर्भाग दिलेला आहे, म्हणून त्यांचे सर्व अवयव पूर्वीप्रमाणें जसेच्या तसे होवोत! ॥४॥ अध्वर्यु व दुसरे ऋत्विज ह्यांपैकीं ज्यांचे बाहु तुटले असतील, त्यांच्या बाहूंचीं कार्यें अश्विनीकुमारांच्या बाहूंनीं होवोत आणि ज्यांचे हात तुटले असतील त्यांचीं हातांचीं कार्यें पूषादेवाच्या हातांनीं व्हावींत. तसेंच भृगुऋषीला बोकडाची दाढी प्राप्त होवो! ॥५॥ मैत्रेयमुनि म्हणाले,–विदुरा, याप्रमाणें अत्यंत उदारस्वभावाच्या शंकराचें भाषण ऐकून सर्व भूतांच्या अन्तःकरणाला फार आनंद झाला आणि त्यांनीं आनंदानें 'फार उत्तम! फार उत्तम!' असे उद्गार काढले ॥ ६ ॥ नंतर शंकराला बरोबर येण्याची प्रार्थना करून इंद्रादि देव, शंकर व ब्रह्मदेव यांसह ऋषींना बरोबर घेऊन पुनः त्या यज्ञमंडपांत गेले ॥७॥ तेथें गेल्यावर भगवान् शंकरानें सांगितल्याप्रमाणें त्यांनीं सर्व व्यवस्था केली व दक्षाच्या धडाला यज्ञपशूचें मस्तक जोडून दिलें ॥ ८॥ याप्रमाणें मस्तक जोडलें असतां शंकरानें दक्षाकडे कृपादृष्टीनें पाहिलें, तेव्हां एखादा निजलेला मनुष्य जागा व्हावा त्याप्रमाणें जागा होऊन तो दक्ष उठून उभा राहिला. त्या वेळीं शंकर आपल्यापुढें उभा आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें ॥९॥ दक्षप्रजापतीचें मन शंकरद्वेषानें कलुषित झालें होतें, तथापि आतां शंकराचें दर्शन झाल्याबरोबर वर्षाऋतूंतील डोहाचें गढूळ पाणी जसें शरदृतूंत निर्मल होतें, त्याप्रमाणें दक्षाचें चित्तहि त्या वेळीं शुद्ध होऊन गेलें ॥ १० ॥ त्यानें लगेच शंकराची स्तुति करण्याचा विचार मनांत आणला; पण परलोकवासी झालेल्या आपल्या कन्येचें स्मरण झाल्याबरोबर प्रेम व उत्कण्ठा यांचा प्रादुर्भाव होऊन त्याच्या डोळ्यांतून अश्रु गळूं लागले आणि त्यामुळें त्याला शंकराची स्तुति थोडा वेळ करतां येईना ॥ ११ ॥ त्या बुद्धिमान् दक्षानें प्रेमाचा उमाळा आला असतांहि कष्टानें मन आवरून धरलें व निष्कपट अन्तःकरणानें तो शंकराची स्तुति करूं लागला ॥ १२ ॥

दक्षप्रजापति म्हणाला–शंकरा, मी तुझी पुष्कळ निंदा केली, तथापि तूं माझी उपेक्षा न करतां मला दण्ड केलास हा माझ्यावर मोठा अनुग्रहच झाला. शंकरा, तूं व विष्णु असे

उभयतां अधम अशाहि ब्राह्मणांची उपेक्षा करीत नाहीं; तर मग जे लोक धर्मप्रमाणें आपलें वर्तन ठेवतात, त्यांची उपेक्षा कशी कराल ? ॥ १३ ॥ हे भगवन्, तूंच आत्मज्ञानाचें व वेदाचें रक्षण करण्यासाठीं पूर्वी आपल्या मुखांतून विद्या, तपश्चर्या, व्रतें त्यांचें अनुष्ठान करणारे ब्राह्मण उत्पन्न केलेस; म्हणूनच जसा पशुपाल हातांत काठी घेऊन पशूंचें रक्षण करतो, त्याप्रमाणें तूं दण्ड करून त्या ब्राह्मणांचें सर्व संकटांतून रक्षण करतोस ॥ १४ ॥ शंकरा, मला तत्त्वज्ञानाची प्राप्ति झालेली नाहीं, म्हणूनच मी भरसभेंत तुझ्यावर अपशब्दरूपी बाणांचे प्रहार केले आणि परमपूज्य अशा तुझी निंदा केली. त्यामुळें मला अधोगतीच मिळणें योग्य असतां तूं माझ्या अपराधांकडे दुर्लक्ष करून प्रेमळ दृष्टीनें माझें रक्षण केलेस. ( ह्याचें उतराई होण्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं नाहीं. ) तूं या आपल्या स्वतःच्या कृतीनेंच संतुष्ट हो ! ॥ १५ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,- विदुरा, याप्रमाणें शंकराची क्षमा मागितल्यावर ब्रह्मदेवाचें अनुमोदन घेऊन दक्षप्रजापतीनें उपाध्याय, ऋत्विक व अग्नि यांच्या साहाय्यानें यज्ञकर्मास पुन्हा प्रारंभ केला ॥ १६ ॥ मग त्या श्रेष्ठ ब्राह्मणांनीं प्रमथादि वीरांच्या संपर्कानें उत्पन्न झालेल्या दोषांच्या निवृत्तीसाठीं व यज्ञ नीट शेवटास जावा म्हणून विष्णूला अर्पण करण्याकरितां तीन खापऱ्यांवर भाजून पुरोडाश सिद्ध केला ॥ १७ ॥ विदुरा, नंतर त्या पुरोडाशाची आहुति हातांत घेऊन अध्वर्यु व यजमान हे दोघेहि निर्मल अन्तःकरणानें विष्णूचें ध्यान करूं लागले. तेव्हां सकल दुःखांचा परिहार करणारा भगवान् विष्णु तेथें प्रगट झाला ॥ १८ ॥ बृहत् व रथंतर हीं दोन सामें ज्याचे दोन पंख आहेत अशा गरुडावर आरूढ होऊन भगवान् तेथें आले, त्या वेळीं त्यांच्या कान्तीनें दश दिशा उज्ज्वल झाल्या व यज्ञमंडपांतील सर्वांचें तेज फिकें पडलें ॥ १९ ॥ त्या श्यामवर्ण भगवंताच्या कमरेला सुवर्णाचा कमरपट्टा व मस्तकावर सूर्यासारखा तेजस्वी मुकुट शोभत असून भ्रमरासारख्या वर्णाचे काळेभोर केश व कानांतील कुण्डले त्यांच्या योगानें त्याचें मुख फारच सुंदर दिसत होतें. तसेंच सुवर्णाच्या अनेक अलंकारांनी मंडित झालेल्या आपल्या हातांत बाण, धनुष्य, गदा, खड्ग व ढाल हीं आयुधें त्यानें धरलीं असल्यामुळें त्याची मूर्ति पांगाऱ्याच्या वृक्षाप्रमाणें विचित्र दिसत होती ॥ २० ॥ त्याच्या वक्षःस्थलाचा लक्ष्मीनें आश्रय केला असून त्याच्या कंठांत सुंदर बनमाला झळकत होती व आपलें मुग्ध हास्य, व कृपाकटाक्ष यांच्या योगानें तो जगाला आनंद देत होता. त्याच्यामागें दोन्ही बाजूंना राजहंस पक्ष्यासारखा पंखा आणि चवरी हीं फिरत होतीं व मस्तकावरील चंद्रासारख्या श्वेतछत्रामुळें त्याला फारच शोभा आली होती ॥ २१ ॥ तो भगवान् आला आहे असें पाहिल्याबरोबर ब्रह्मदेव, इन्द्र, शंकर इत्यादि सर्व देव व ऋषिगण एकदम उठून उभे राहिले आणि त्याला सर्वांनीं वंदन केलें ॥ २२ ॥ त्याच्या तेजामुळें सर्वांची कान्ति फिकी पडून त्यांच्या तोंडून स्पष्ट शब्दहि येईनातसे झाले आणि भयानें ग्रस्त झाल्यामुळें हात जोडून ते त्याची स्तुति करूं लागले ॥ २३ ॥ त्याच्या माहात्म्याचें आकलन करणें ब्रह्मदेव आदि करून देवांना अशक्य

होतें. तथापि लोकांवर कृपा करण्यासाठींच देह धारण करणाऱ्या त्या भगवंताची सर्व देवांनीं आपआपल्या बुद्धीप्रमाणें स्तुति करण्यास प्रारंभ केला ॥ २४ ॥ यज्ञाचा अधिपति आणि प्रजापतींमध्यें श्रेष्ठ गुरु व सुनन्दनन्दप्रभृति पार्षदगणांनीं वेष्टिलेला असा जो भगवान् विष्णु, त्याला पाहिल्याबरोबर दक्षप्रजापतीला आनंद झाला. उत्तम प्रकारचें पूजासाहित्य घेऊन त्यानें विष्णूची पूजा केली आणि नम्रपणें हात जोडून त्याची स्तुति करीत तो त्याला शरण गेला ॥ २५ ॥

दक्ष म्हणाला,—परमेश्वरा, तूं आपल्या स्वरूपांतच नित्य राहात असून जाग्रत आदिकरून बुद्धीच्या अवस्थांपासून अलिप्त आहेस. तूं एक असून चैतन्यमय आहेस. तुझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं द्वैत नसल्यामुळें तुला भीतीच नाहीं. तूं मायेचा पराभव करून स्वतंत्रपणें वागत असतोस, तरी तिचा स्वीकार करून रामकृष्णादि अवतार धारण करीत असल्यामुळें काम, क्रोध, लोभ इत्यादि विकारांच्या आधीन झाल्याप्रमाणें तूं दिसून येतोस ॥ २६ ॥

ऋत्विज म्हणाले,—हे निरुपाधिक परमेश्वरा, नंदिकेश्वराच्या शापामुळें आमच्या बुद्धीला कर्ममार्गाबद्दल दुराग्रह उत्पन्न झाला असल्यामुळें तुझ्या सत्यस्वरूपाचें ज्ञान आम्हांला मुळींच होत नाहीं. याकारणास्तव ज्याच्या सिद्धीसाठीं देवतांच्या अधिकारांचे विशिष्ट नियम वेदांनीं केले, जो पुण्याचें साधन म्हणून तिन्हीं वेदांमध्यें सांगितलें आहे, तो यज्ञच तुझें स्वरूप होय असें आम्ही समजतों ॥ २७ ॥

सदस्य म्हणाले,—हे सर्वांना आश्रय देणाऱ्या भगवंता, मोठमोठ्या क्लेशांनीं दुस्तर झालेल्या अशा या संसारमार्गांत मृत्युरूपी उग्र सर्पासारखी दृष्टि लावून टपलेला असून विषयरूपी मृगजल, सुखदुःख, लाभअलाभ, जयअपजय इत्यादि अनेक द्वंद्वरूपी खंदक, दुष्टपुरुषरूपी पशूचें-भय व शोकरूपी वणवे हे सर्वत्र पसरलेले आहेत. तथापि कामवासनेनें पीडित झालेला अज्ञानी जीवांचा समुदाय, शरीर, घर इत्यादि मोठमोठीं ओझीं डोक्यावर घेऊन ह्या संसारांत पडलेला आहे. देवा, त्याला तुझ्या चरणरूपी विश्रांति-स्थानाची प्राप्ति कधीं होईल बरें? कारण या संसारांत विश्रांतीला जागा मुळींच नाहीं ॥ २८ ॥

रुद्र म्हणाला,—हे इच्छित वर देणाऱ्या भगवंता, तुझे चरण सर्व पुरुषार्थांच्या प्राप्तीचें साधन आहेत, म्हणूनच कोणत्याहि विषयोपभोगामध्यें न गुंतणारे ऋषिदेखील त्यांची आदरानें पूजा करतात. अशा त्या तुझ्या पूज्य चरणांच्या ठिकाणीं मी आपलें अन्तःकरण लाविलें आहे. अज्ञानी लोक जरी मला आचारभ्रष्ट म्हणत असले, तरी त्यांच्या त्या बडबडण्याची, तुझ्या श्रेष्ठ अनुग्रहामुळें मी मुळीच पर्वा करीत नाहीं ॥ २९ ॥

भृगु म्हणाला,—परमेश्वरा, तुझी माया अगाध आहे. तिनें ब्रह्मदेव आदिकरून सर्व प्राण्यांचें आत्मज्ञान हरण केलें आहे. त्यामुळें ते अज्ञानान्धकारामध्यें झोंप घेत असून त्यांना अन्तर्यामरूपानें वास करणाऱ्या तुझ्या सत्यस्वरूपाचे अद्यापि ज्ञान झालें नाहीं. तो

हा तूं, शरण आलेल्या प्राण्यांचा आत्मा असून हितकर्ता आहेस; म्हणून तूं माझ्यावर प्रसन्न हो! ॥३०॥

ब्रह्मदेव म्हणाला,--देवा, शब्द, स्पर्श इत्यादि विषयांचें भिन्न भिन्न ज्ञान करून घेण्याचेंच ज्यांचें सामर्थ्य अशा इन्द्रियांच्या योगानें हा जीव पाहतो, तें कांहीं तुझें स्वरूपच नव्हे. तूं ज्ञानाचा, शब्दादि विषयांचा व इन्द्रियांचा आधार असून मायिक प्रपञ्चाहून अगदीं भिन्न आहेस॥ ३१ ॥

इंद्र म्हणाला,—देवा, जगाचें पालन करणारें हें तुझें शरीर, देवांचे शत्रु जे दैत्य त्यांचा संहार करण्यासाठीं, सज्ज आयुधें धारण करणाऱ्या आठ हातांनीं युक्त असें असूनहि आमच्या मनाला आणि दृष्टीला आनंद देत आहे* ॥ ३२ ॥

ऋषींच्या स्त्रिया म्हणाल्या,--हे यज्ञरूपी परमेश्वरा, दक्षप्रजापतीनें तुझ्या आराधनेसाठीं हा यज्ञ आरम्भिला; परंतु शंकरानें दक्षावर क्रुद्ध होऊन त्याचा विध्वंस केला, त्यामुळें आमच्या ह्या यज्ञभूमीला स्मशानाप्रमाणें उदासीन स्वरूप प्राप्त झालें आहे. तर हे देवा, तूं आपल्या कमलासारख्या तेजस्वी दृष्टीनें ह्या यज्ञस्थलाला पवित्र कर ॥ ३३ ॥

ऋषि म्हणाले,—हे भगवन्, तुझें चरित्र फारच विलक्षण आहे. कारण तूं स्वतः कर्म आचरण करतोस, पण त्यानें तूं लिप्त होत नाहींस. तसेंच लोक आपल्याला ऐश्वर्य प्राप्त व्हावें म्हणून ज्या लक्ष्मीची उपासना करतात, ती लक्ष्मी स्वतः तुझी सतत सेवा करीत असते; पण तूं मात्र तिचा मुळींच आदर करीत नाहींस ॥ ३४ ॥

सिद्ध म्हणाले,—देवा, क्लेशरूप वणव्यामध्यें सांपडून पोळून गेलेला आमचा मनोरूप हत्ती, तृषेनें व्याकुळ झाल्यामुळें तुझ्या कथारूप शुद्ध अमृताच्या नदींत बुडी मारून बसला आहे व तेथें तो जसा कांहीं ब्रह्मानंदांत निमग्न झाल्याप्रमाणें राहत असतो. तो आतां संसाररूपी दावाग्नीला विसरून गेला असून त्या कथामृतनदीच्या बाहेर निघतच नाहीं ॥ ३५ ॥

दक्षाची पत्नी म्हणाली,–ईश्वरा, तूं येथें आलास ही फार चांगली गोष्ट झाली. तूं आम्हांवर प्रसन्न हो, तुला आम्ही नमस्कार करतों. लक्ष्मीपते, तूं मनोहर अशा आपल्या लक्ष्मीसह आमचें रक्षण कर! जसें हातपाय आदिकरून सर्व अवयव आहेत, पण मस्तक नाहीं, तर मनुष्याच्या त्या नुसत्या धडाला अगदीं शोभा नसते, त्याप्रमाणें हे यज्ञाधिपते, यज्ञामध्यें प्रयाज, अनुयाज इत्यादि अंगें यथास्थित असलीं तरी तुझ्यावांचून शोभा येत नाहीं! ॥ ३६ ॥

---

*इंद्रियांना गोचर होणारा पदार्थ मिथ्या असतो असें ब्रह्मदेवाच्या स्तुतींत म्हटलें आहे. त्यावर आक्षेप घेतलासें करून भगवंताचें अष्ट आयुधें धारण करणारें स्वरूप दृष्टीला गोचर असूनहि मिथ्या नाहीं, असा इंद्राच्या स्तुतीचा भाव श्रीधरस्वामींनीं दाखविला आहे.

लोकपाल म्हणाले—प्रभो, सर्वांमध्यें अन्तर्यामरूपानें वास करून सर्व दृश्य जगाला पाहणारा असा तूंच मिथ्याभूत विषयांना प्रकाशित करणाऱ्या या आमच्या इन्द्रियांनीं पाहिला गेलास काय? हे विश्वव्यापक परमेश्वरा, असा पंचभूतांनीं युक्त असलेला जो सहावा जीव, तो तूंच असें जें आम्हांला भासतें, ती केवळ तुझी माया होय! ॥ ३७ ॥

योगेश्वर म्हणाले,—हे प्रभो, तूं सर्वांचा अन्तर्यामी आहेस. जो पुरुष तुला आपल्याहून वेगळा असा मुळींच मानीत नाहीं, तोच तुला अत्यंत प्रिय असतो, हें खरें; तथापि, हे भक्तवत्सला, आम्ही एकनिष्ठ भक्तीनें तुला शरण आलों आहोंत. यास्तव तूं आम्हांवर अनुग्रह कर! ॥ ३८ ॥ जगाची उत्पत्ति, स्थिति व संहार या कार्यासाठीं जीवांच्या अदृष्टामुळें ज्या तुझ्या मायेच्या गुणांमध्यें अनेक प्रकारें भेद उत्पन्न होतात, त्या मायेच्या योगानेंच तूं आपल्या स्वरूपांमध्यें ब्रह्मदेव आदिकरून भिन्न भिन्न स्वरूपें, निर्माण करतोस; आणि आपल्या स्वरूपींच स्थिर राहून आरम्याच्या ठिकाणीं भासणारे गुण आणि त्यांमुळें दृश्य होणारीं भिन्न भिन्न रूपें. ह्यांना तूंच दूर करतोस अशा हे देवा, तुला नमस्कार असो! ॥ ३९ ॥

ब्रह्मदेव म्हणाले,—हे ईश्वरा, आम्ही व दुसरेहि कोणी तुझें स्वरूप जाणीत नाहीं. तूं शुद्ध सत्त्वगुणात्मक मूर्ति धारण करून धर्माचें फल देत असतोस; पण वास्तविक तूं निर्गुण आहेस, तुला मी नमस्कार करतों! ॥ ४० ॥

अग्नि म्हणाला—ज्याच्या तेजामुळें मी अधिक प्रज्वलित होऊन उत्तम अशा यज्ञामध्यें घृतानें भिजलेलें हविर्द्रव्य देवासाठीं वाहून नेतों, त्या यज्ञसंरक्षक परमेश्वराला मी नमस्कार करतों. तसेंच 'आश्रावय,' 'अस्तु श्रौषट्, 'यज,' 'ये यजामहे' 'वषट्' ह्या यजुर्वेदांतील पांच[1] मंत्रांनीं उत्तम प्रकारें हवन केलेले पांच[2] प्रकारचे यज्ञ हेंच ज्यांचें स्वरूप आहे त्या यज्ञस्वरूपी परमेश्वराला मीं नमस्कार करतों ॥ ४१ ॥

देव म्हणाले—पूर्वीं कल्पाच्या अंतीं ज्यानें आपलें उत्पन्न केलेलें सर्व कार्यरूप जग, आपल्या उदरामध्यें सांठवून ठेविलें होतें, ज्याच्या ज्ञानमार्गाचें चिंतन सिद्ध पुरुष आपल्या हृदयामध्यें करतात व जो तूंच प्रलयकालाच्या पाण्यांत शेषाच्या विस्तृत शय्येवर

---

१ चतुर्भिश्च चतुर्भिश्च द्वाभ्यां पञ्चभिरेव च॥
हूयते च पुनर्द्वाभ्यां स मे विष्णुः प्रसीदतु ॥

आश्रावय' हा चार अक्षरी मंत्र, 'अस्तु श्रौषट्' हा आणखी एक चार अक्षरी मन्त्र, 'यज' हा दुसरा दोन अक्षरी मन्त्र, 'ये यजामहे' हा पांच अक्षरी मंत्र आणि 'वषट्' हा दुसरा दोन अक्षरी मन्त्र; ह्या पांच मन्त्रांनीं ज्याला संतुष्ट करण्यासाठीं होम करतात, तो विष्णु मला प्रसन्न होवो.

२ अग्निहोत्र, दर्शपूर्णमास, चातुर्मास्य, पशुयाग आणि सोमयाग हे यज्ञाचे पांच प्रकार होत.

शयन करीत असतोस, तोच तूं आदिपुरुष आज आमच्या दृष्टीस पडत आहेस आणि आम्हां सेवकांचें रक्षण करीत आहेस ! ॥ ४२ ॥

गंधर्व म्हणाले,—हे सर्वव्यापका जगदीश्वरा देवा, मरीचि आदिकरून प्रसिद्ध ऋषि व ब्रह्मदेव, इन्द्र व रुद्रप्रमुख देवगण हे सर्व तुझ्याच अंशाचे अंश होत व हें जग तुझ्या क्रीडेचें साहित्य आहे. तुला आम्ही नित्य नमस्कार करतों ! ॥ ४३ ॥

विद्याधर म्हणाले,— ईश्वरा, चतुर्विध पुरुषार्थांचें साधन असें शरीर प्राप्त झालें असतां तुझ्या मायेनें प्राण्याला हें माझें, किंबहुना हेंच मीं असा त्याविषयींचा अहंकार उत्पन्न होऊन क्षुद्र विषयांच्या अभिलाषेमुळें इतका मूढ होऊन जातो कीं, त्याच्या पुत्रादिकांनीं विनय सोडून देऊन त्याचा अनेक वेळां धिक्कार केला तरी देखील त्याला शरिरादिकांचा मोह सोडवत नाहीं; पण तोच तुझ्या कथामृताचें सेवन करूं लागला म्हणजे तो मोह सोडून देण्यास समर्थ होतो ॥ ४४ ॥

ब्राह्मण म्हणाले,—ईश्वरा, तूंच यज्ञ व तूच होमद्रव्य असून अग्निहि तूंच आहेस. तूंच स्वतः मन्त्र, समिधा, दर्भ व यज्ञपात्रें असून सदस्य, ऋत्विज्, यजमान, यजमानपत्नी, देवता, अग्निहोत्र, स्वधा, सोमरस, घृत, मधु हीं सर्व तूंच आहेस ॥ ४५ ॥ हे वेदमूर्ते, यज्ञस्वरूपी, क्रतुस्वरूपी असा तूं पूर्वी जेव्हां महावराहरूपानें अवतरलास, तेव्हां लोकोपयोगी अशा तुझी स्तुति करूं लागले त्या वेळीं गजराज जसा उदकांतून कमलिनीला सहज वर काढतो, त्याप्रमाणें तूं मोठ्यानें गर्जना करीत पृथ्वीला दाढेवर धरून रसातलांतून तिला लीलेनें वर आणलेंस ॥ ४६ ॥ हे यज्ञसंरक्षका, आमच्याकडून ह्या यज्ञरूपी सत्कर्मात अनेक दोष झाल्यामुळें आम्ही तुझ्या दर्शनाची इच्छा करीत होतों. यास्तव आतां तूं आमच्यावर प्रसन्न हो आणि हा यज्ञ शेवटास ने ! पुरुषांनीं केवळ तुझ्या नामाचें कीर्तन केलें तरी तेवढ्यानें देखील यज्ञांतील सर्व विघ्नें तत्काल दूर होतात. अशा तुला आम्ही नमस्कार करतों ! ॥ ४७ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—हे विदुरा, अशा रीतीनें त्या यज्ञसंरक्षक श्रीहरीची सर्वजण स्तुति करीत असतां, वीरभद्रानें दूषित केलेल्या यज्ञकर्माची ज्ञात्या दक्षप्रजापतीनें नीट परिसमाप्ति केली ॥ ४८ ॥ हे निष्पाप विदुरा, सर्वांच्या अन्तर्यामीं असून सर्वांच्या यज्ञांतील हविर्भाग भक्षण करणारा तो भगवान् विष्णु, दक्षाच्या यज्ञानें संतुष्ट होत्साता त्याला हाका मारून म्हणाला ॥ ४९ ॥

भगवान् म्हणाले,—दक्षा, जगाची उत्पत्ति, स्थिति व लय यांचें आदिकारण सर्वांचा अंतर्यामी, महासमर्थ, सर्वसाक्षी, स्वयंप्रकाश, उपाधिरहित असा मी असून, ब्रह्मदेव आणि शंकर हीं माझींच रूपें होत ॥ ५० ॥ दक्षप्रजापते, मी आपल्या त्रिगुणात्मक मायेंत प्रवेश करून जगाची उत्पत्ति, स्थिति व संहार करतों आणि त्या त्या कार्याला योग्य अशा ब्रह्मा, विष्णु, महेश्वर अशा संज्ञाहि धारण करतों ॥ ५१ ॥ सर्वांचा अन्तर्यामी केवळ ब्रह्मरूप जो मी त्या माझ्याठिकाणीं सम—विषम, सजातीय—विजातीय हे भेद

मुळींच नाहींत. म्हणून ब्रह्मदेव, शंकर आणि सर्व प्राणी यांना जो भेददृष्टीनें पाहतो तो अज्ञानी होय ॥ ५२ ॥ ज्याप्रमाणें मनुष्य, मस्तक, हात, पाय आदिकरून आपल्या अवयवांना आपल्याहून भिन्न मानीत नाहीं, त्याप्रमाणें माझा भक्तहि सर्व भूतांना माझ्याहून भिन्न समजत नाहीं ॥ ५३ ॥ हे दक्षा, ब्रह्मा, विष्णु, आणि शंकर ह्या तिघांचें स्वरूप एकच असून तिघेहि सर्व भूतांच्या अन्तर्यामीं राहत असतात; यास्तव ह्या तिघांसंबंधानें जो भेदबुद्धि ठेवीत नाहीं, त्यालाच शान्ति प्राप्त होते ॥ ५४ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, प्रजापतीमध्यें श्रेष्ठ अशा त्या दक्षाला श्रीहरीनें याप्रमाणें उपदेश केला असतां, दक्षानें त्रिकपाल पुरोडाशाचा भाग अर्पण करून विष्णूची पूजा केली आणि प्रधान व अंगभूत असे दोन्ही प्रकारचे योग करून देवांचीहि त्यानें आराधना केली ॥ ५५ ॥ नंतर समाधानयुक्त अन्तःकरणानें त्यानें यज्ञाचा अवशेष भाग रुद्राला अर्पण करून त्याला संतुष्ट केलें आणि उदवसान नांवाचें यज्ञांतील शेवटचें कर्म करून करून सोमपान करणाऱ्या इतरांचीहि त्यानें आराधना केली. अशा प्रकारें यज्ञाची समाप्ति करून त्यानें शेवटीं ऋत्विजांसह अवभृथ स्नान केलें ॥ ५६ ॥ दक्षप्रजापतीला स्वतःच्या सामर्थ्यानेंच जरी सिद्धि प्राप्त झाली, तरी देवांनीं सुद्धां ‘ तुझी बुद्धि धर्माच्या ठिकाणीं स्थिर असो ’ असा आशीर्वाद दिला आणि ते स्वर्गलोकीं गेले ॥ ५७ ॥ विदुरा, दक्षप्रजापतीच्या त्या सतीनामक कन्येनें आपलें पूर्वीचें शरीर टाकून दिल्याचा वृत्तांत हा असा आहे. पुढें ती सती हिमालयाच्या मेनानामक पत्नीच्या उदरीं जन्मास आली आहे, असें आम्हीं ऐकिलें आहे ॥ ५८ ॥ ती हिमालयकन्या अंबिका, प्रलयकाळीं निद्रित असलेली सृष्टि पुनः उत्पन्न करणारी मायाशक्ति जशी सृष्टीच्या आरंभीं ईश्वरापाशीं प्राप्त होते, त्याप्रमाणें अनन्यभावानें शरण जाणाऱ्या भक्तांचा एकच आधारभूत अशा त्या पूर्वजन्मींच्या प्रिय पतीलाच पुनः वरावयास इच्छिती झाली ॥ ५९ ॥ मैत्रेयमुनि म्हणतात, हे विदुरा, दक्षप्रजापतीच्या यज्ञाचा विध्वंस करणाऱ्या भगवान् शंकराचें हें चरित्र मी बृहस्पतीचा शिष्य जो महाभगद्भक्त उद्धव त्यापासून श्रवण केलें ॥ ६० ॥ हे कुरुवंशोद्भवा विदुरा, हें शंकराचें अत्यंत पवित्र चरित्र श्रोत्यांची तशीच वक्त्यांची कीर्ति व आयुष्य वाढविणारें आणि त्यांच्या पापसमूहाचा नाश करणारें आहे. जो कोणी हें चरित्र भक्तिभावानें श्रवण करील आणि दुसऱ्यास सांगेल तो पापापासून मुक्त होईल ॥ ६१ ॥

**सातवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ८ वा

मैत्रेयमुनि म्हणतात,– विदुरा, सनकप्रभृति पांच ऋषि, तसेंच नारद, ऋभु, हंस व यति हे ब्रह्मदेवाचे पुत्र आजन्म ब्रह्मचर्यव्रतच धारण करून राहिले. त्यांनीं गृहस्थाश्रमाचा स्वीकार मुळींच केला नाहीं ॥ १ ॥ हे शत्रुनाशका विदुरा, ब्रह्मदेवाचा पुत्र जो अधर्म, त्याला मृषानांवाची भार्या होती. तिला दम्भ व माया अशीं अपत्यें झालीं. ब्रह्मदेवाच्या निर्ऋतिनामक पुत्राला संतति नव्हती; म्हणून यानें ह्या दोन अपत्यांचा स्वीकार केला ॥ २ ॥ हे बुद्धिमन्ता विदुरा, दम्भाला व मायेला लोभ व निकृति अशीं दोन अपत्यें झालीं व त्यांपासून पुढें क्रोध व हिंसा हीं उत्पन्न झालीं. क्रोध व हिंसा यांपासून कलि व त्याची बहीण दुरुक्ति, अशीं उत्पन्न झालीं ॥ ३ ॥ हे साधुश्रेष्ठ विदुरा, कलीपासून दुरुक्तीला भयनामक पुत्र व मृत्युनामक कन्या अशीं दोन अपत्यें झालीं. याचप्रमाणें दंभ व मृत्यु यांपासून यातना व नरक हीं दोन मुलें जन्मास आलीं ॥ ४ ॥ हे निष्पाप विदुरा, याप्रमाणें मी तुला प्रतिसृष्टि संक्षेपानें निवेदन केली. मनुष्यानें हें पुण्यकारक आख्यान तीन वेळां श्रवण केलें असतां अन्तःकरण निर्मळ होतें ॥ ५ ॥ हे कुरु-कुलभूषणा विदुरा, आतां मी तुला श्रीहरीचा अंश जो ब्रह्मदेव त्याच्यापासून उत्पन्न झालेल्या पुण्यकीर्ति स्वायंभुव मनूचा वंश पुढें सांगतों ॥ ६ ॥ शतरुपेचा पति जो स्वायंभुव मनु त्याला प्रियव्रत व उत्तानपाद असे दोन पुत्र झाले. ते विष्णूचे अंशावतार असून जगाचें रक्षण करण्यांत नित्य तत्पर असत ॥ ७ ॥ उत्तानपादराजाला सुनीति आणि सुरुचि अशा दोन राण्या होत्या. त्यांपैकीं सुरुचि ही पतीची अत्यन्त आवडती होती व दुसरी सुनीति ही तशी नव्हती. त्या सुनीतीचा ध्रुव नांवाचा पुत्र होता ॥ ८॥ एकदां उत्तानपादराजा सुरुचीच्या उत्तमनामक पुत्राला मांडीवर घेऊन खेळवीत असतां ध्रुवालाहि आपल्या पित्याच्या मांडीवर बसण्याची इच्छा झाली व तो मांडीवर चढूं लागला; पण राजाला त्याचें कौतुक वाटलें नाहीं ॥ ९ ॥ सुरुचि फारच गर्विष्ठ होती. आपल्या सवतीचा पुत्र राजाच्या मांडीवर बसूं इच्छितो असें पाहून तिला मत्सर उत्पन्न झाला आणि राजासमक्ष ती त्याला हिणवून बोलूं लागली ॥ १० ॥ ती म्हणाली,–बाळा, तूं राजपुत्र आहेस खरा, पण राजाच्या आसनावर बसण्यास योग्य नाहींस ! कारण तुझा जन्म माझ्यापासून झाला नाहीं ॥ ११ ॥ अरे, ज्या अर्थीं दुर्लभ वस्तूच्या प्राप्तीविषयीं तुला इच्छा झाली आहे, त्या अर्थीं तूं खरोखरच बालक आहेस. आपण कोणा इतर स्त्रीच्या गर्भामध्यें वाढलों आहों, हें तुझ्या ध्यानांत मुळींच आलें नाहीं ॥ १२ ॥ तुला राजाचें आसन मिळावें अशी जर इच्छा असेल, तर तूं तपश्चर्या करून ईश्वराची आराधना कर आणि त्याच्या अनुग्रहानें माझ्या उदरीं जन्म प्राप्त करून घे ! ॥ १३ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, सावत्र आईचीं हीं अत्यंत कठोर भाषणें ध्रुवाच्या हृदयाला फारच झोंबलीं व त्यामुळें, काठी मारली म्हणजे सर्प जसा फोंफावतो, त्याप्रमाणें

तो सुस्कारे टाकूं लागला. पण हा सर्व प्रकार पाहून पित्यानें मात्र अबाक्षर देखील काढलें नाहीं. तेव्हां त्याला सोडून देऊन तो ध्रुव बालक रडत रडत आपल्या आईकडे गेला ॥ १४ ॥ आपला पुत्र दीर्घ उसासे टाकीत असून त्याचे ओंठ थरथर कांपत आहेत, असें जेव्हां सुनीतीनें पाहिलें, तेव्हां तिनें त्याला आपल्या मांडीवर घेतलें आणि आपली सवत ध्रुवाला कशी टोंचून बोलली तें अन्तःपुरांतील लोकांच्या तोंडून ऐकल्यावर तिला फार दुःख झालें ॥ १५ ॥ रानांतील वेल वणव्यांत सांपडली म्हणजे जशी होरपळून जाते, त्याप्रमाणें त्या सुनीतीचें अन्तःकरण शोकरूपी दावाग्नीनें करपून गेलें सवतिचे शब्द आठवून तिचें धैर्य गळून गेलें, ती विलाप करूं लागली आणि तिच्या त्या कमळासारख्या सुंदर नेत्रांवर अश्रुबिंदु दिसूं लागले ॥ १६ ॥ त्या अबलेला ह्या दुखाचा शेवट कसा होईल तें समजेना. ती दीर्घ उसासे टाकीत आपल्या मुलाला म्हणाली,—बाळा, या प्रकरणांत दुसऱ्याचा दोष आहे असें समजूं नकोस; कारण जो मनुष्य दुसऱ्याला दुःख देतो, त्याला असेंच दुःख भोगावें लागतें ॥ १७ ॥ बाळा, सुरुचि जें तुला बोलली तें अगदीं खरें आहे. ज्या मला नुसतें भार्या असें म्हणण्याची देखील राजाला लाज वाटते, अशा माझ्या हातभागिनीच्याच उदरांत तूं जन्माला आला आहेस आणि माझ्या दुधानें वाढला आहेस ॥ १८ ॥ म्हणून वत्सा, तुला जर उत्तमाप्रमाणें राज्यासनावर बसण्याची इच्छा असेल तर तूं मत्सरबुद्धि सोडून देऊन तुझ्या सावत्र आईच्या निष्कपट सांगण्याप्रमाणें श्रीहरीच्या चरणकमलाचीच आराधना कर ॥ १९ ॥ कारण बाळा, मन व प्राण यांना वश करणारे योगीजन देखील ज्याला पूज्य मानतात असें उत्कृष्ट पद ब्रह्मदेवानें सुद्धां, विश्वाच्या पालनासाठीं सत्त्वगुणाचें स्वरूप धारण केलेल्या श्रीहरीच्या चरणकमलाची सेवा करूनच मिळविलें आहे ॥ २० ॥ त्याचप्रमाणें तुमचा आजोबा जो भगवान् मनु, त्यानेंहि सर्व प्राण्यांत परमेश्वर भरला आहे अशी बुद्धि ठेवून पुष्कळ दक्षणा ज्यांत आहे, अशा अनेक यज्ञांनीं त्या परमेश्वराची आराधना केली व त्यामुळेंच त्याला इतर साधनांनीं दुर्मिळ असें भूलोकींचें व स्वर्गीचें उत्तम सुख प्राप्त झालें ॥ २१ ॥ बाळा, मोक्ष मिळवूं इच्छिणारे पुरुष देखील त्याच्याच चरणकमलाचा शोध करितात, यास्तव त्या भक्तवत्सल प्रभूचाच तूं आश्रय कर, त्याच्यावर आपला निश्चल भाव ठेव व स्वधर्माचरण करून शुद्ध झालेल्या अन्तःकरणांत त्यांची स्थापना करून त्याची सेवा कर ॥ २२ ॥ ब्रह्मदेवासारखे इतर लोक जिचा शोध करीत असतात, ती लक्ष्मी हातांत कमळ घेऊन ज्याचा शोध करीत असते, त्या कमलपत्रासारख्या सुंदर नेत्रांच्या श्रीहरीशिवाय दुसरा कोणी तुझ्या दुःखाचा परिहार करणारा असेल असे मला दिसत नाहीं ! ॥ २३ ॥

मैत्रेय मुनि म्हणाले—विदुरा, अशा प्रकारचें प्रेमभरित परंतु पुरुषार्थाला प्राप्त करून देणारें मातेचें भाषण श्रवण करून ध्रुवानें आपल्या बुद्धीनें आपल्या मनाचें शांतवन केलें, आणि तो पित्याच्या नगरांतून बाहेर निघाला ॥ २४ ॥ ही गोष्ट जेव्हां नारद-मुनींच्या कानावर गेली तेव्हां ध्रुवानें काय करावयाचें ठरविलें आहे तें सर्व जाणून घेतल्यावर

त्यांना आश्चर्य वाटलें आणि पापाला दूर करणारा असा आपला हात नारदानें ध्रुवाच्या मस्तकावर ठेवला व तो त्याला म्हणाला ॥ २५ ॥ अहो ! क्षत्रियांचें तेज पाहा किती विलक्षण आहे तें ! त्यांना मानखंडना मुळींच सहन होत नाहीं. हा ध्रुव लहान आहे तरी देखील आपल्या सावत्र आईचें दुष्ट भाषण ह्याच्या हृदयाला कसें लागून गेलें आहे ! ॥ २६ ॥

नंतर नारदमुनि ध्रुवाला म्हणाले,—बाळा, तूं अद्यापि लहान असल्यामुळें तुझें लक्ष विशेषतः खेळण्यांतच असावयाचें; तेव्हां या वेळीं मान किंवा अपमान यांचें ज्ञान तुझ्या ठिकाणीं असेल अशी आमची कल्पना नाहीं ॥ २७ ॥ ध्रुवा, तुला मान किंवा अपमान ह्यांतील भेद कळत असला, तरी असंतोष मानण्याचें कारण नाहीं. कारण पुरुषाच्या असंतोषाला मोहाशिवाय दुसरीं निराळीं कारणें नाहींत. जगांत मनुष्याला सुख किंवा दुःख प्राप्त होणें ज्याच्या त्याच्या कर्मावरच अवलंबून आहे ॥ २८ ॥ यास्तव, हे बाळा, शहाण्या मनुष्यानें सर्व गोष्टी ईश्वराच्या आधीन आहेत असें समजून दैवयोगानें जितकें आपल्याला मिळालेलें असेल तेवढ्यांतच संतोष मानावा ॥ २९ ॥ आतां मातेच्या उपदेशाप्रमाणें योगमार्गाचा आश्रय करून ईश्वराचा प्रसाद मिळविण्याची तूं इच्छा करीत आहेस, पण त्या श्रीहरीची आराधना करून त्याला संतुष्ट करणें ही गोष्ट मनुष्याला फारच कठीण आहे असें मला वाटतें ॥ ३० ॥ सर्वसंगपरित्याग करून तीव्र योगाभ्यासाच्या साहाय्यानें समाधि लावून योगी लोक अनेक जन्मपर्यंत त्या परमेश्वराच्या मार्गाचा शोध करीत असतात; तथापि त्यांना त्याचें ज्ञान होत नाहीं ॥ ३१ ॥ यास्तव ध्रुवा, तूं हा मार्ग सोडून देऊन परत घरीं जा ! तुझा हा आग्रह व्यर्थ आहे. तुझा कल्याणसाधनाचा काल जेव्हां प्राप्त होईल तेव्हां त्यासाठीं तुझ्याहातून योग्य प्रयत्न होईल ॥ ३२ ॥ दैवयोगानें ज्याला जें कांहीं सुख किंवा दुःख प्राप्त झालें असतां त्यांतच जो पुरुष सुख मानतो तोच अज्ञानांतून पार पडतो ॥ ३३ ॥ आपल्यापेक्षां अधिक गुणांचा मनुष्य जर आपणाला लाभला तर त्याला पाहून आनंद मानावा, कमी गुणांचा प्राप्त झाला तर त्यावर कृपा करावी, आणि आपल्या बरोबरीचा असला तर त्याच्याशीं मैत्री करावी. अशा रीतीनें वागल्यास प्राण्याला दुःखें कधींही भोगावीं लागत नाहींत ॥ ३४ ॥

ध्रुव म्हणाला,—मुने, मनुष्याच्या अंतःकरणावर सुखाचे व दुःखाचे अनेक प्रसंग येतात; म्हणून त्यांनीं शांति धरावी ही गोष्ट आमच्यासारख्यांच्या ध्यानीं येणारी नव्हे ! तथापि आपण ती कृपा करून मला सांगितली ॥ ३५ ॥ आतां माझा जन्म निष्ठुर अशा क्षत्रिय कुलांत झाला असल्यामुळें माझ्या स्वभावांत विनय नाहीं. त्यांतहि सुरुचीच्या अपशब्दरूपी बाणांचे माझ्या मनावर प्रहार झाल्यामुळें त्यांत आपला हा उपदेश ठसणें शक्य नाहीं ॥ ३६ ॥ हे ब्रह्मनिष्ठ मुने, आमच्या पितरांना किंवा इतरांनाहि अद्यापि जें प्राप्त झालें नाहीं असें त्रिभुवनांतील श्रेष्ठ पद मला मिळावें अशी माझी इच्छा आहे. त्यास्तव त्याचा चांगला मार्ग मला सांगा ॥ ३७ ॥ नारदमुने,

भगवान् ब्रह्मदेवाच्या शरिरापासून तुमचा जन्म झालेला असून आपण वीणा वाजवीत जगाच्या कल्याणासाठींच खरोखर सूर्याप्रमाणें सर्वत्र फिरत असतां ॥ ३८ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, हें ध्रुवाचें भाषण ऐकून नारदमुनीला संतोष झाला, आणि त्याच्या अंतःकरणांत दया उत्पन्न होऊन तो ध्रुवबाळाला गोड शब्दांनीं उपदेश करून बोलूं लागला ॥ ३९ ॥

नारद म्हणाला,—ध्रुवा, मातेनें तुला ज्याचा उपदेश केला तो भगवान् श्रीहरीच तुझ्या कल्याणाचा मार्ग होय. यास्तव त्या श्रीहरीकडे आपलें चित्त सर्वस्वीं लावून तूं त्याची सेवा कर ॥ ४० ॥ ध्रुवा, ज्या मनुष्याला धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या पुरुषार्थरूपी कल्याणाला प्राप्त करून घेण्याची इच्छा असेल, त्याला तें प्राप्त करून घेण्यासाठीं श्रीहरीच्या चरणांची सेवा करणें हेंच एक साधन होय ॥ ४१ ॥ बाळा, तुझें कल्याण असो. आतां तूं यमुनेच्या पवित्र तीरावर जा. तेथें पुण्यप्रद असें मधुवन असून त्यांत भगवान् श्रीहरीचा निवास असतो ॥ ४२ ॥ त्या ठिकाणीं यमुनेच्या मंगलकारक उदकांत त्रिकाळ स्नान करून तूं योग्य अशीं कर्में कर आणि स्वस्तिकादि आसन सिद्ध करून पूरक, कुंभक व रेचक अशा तिहेरी प्राणायामाच्या योगानें प्राण, इंद्रियें व मन, यांचे दोष हळूहळू नाहींसे कर आणि गंभीर मनानें श्रीहरीचें ध्यान करीत राहा ! ॥ ४३ ॥ ४४ ॥

भक्तांवर अनुग्रह करण्याविषयीं उत्सुक असलेला, मुख व नेत्र सर्वकाल प्रसन्न ठेवणारा, सुंदर नासिका, रमणीय भृकुटि व रम्य कपोल यांनीं युक्त असून सर्व देवांमध्यें सुंदर दिसणारा; तरुणस्वरूपी, रमणीय अवयवयुक्त, ओंठ व नेत्र किंचित् रक्तवर्ण असलेला, भक्तजनांना आश्रय आणि सुख देऊन शरणागतांचें रक्षण करणारा, दयेचा केवळ सागरच, वक्षःस्थलावर श्रीवत्सचिन्ह धारण करणारा, मेघाप्रमाणें श्यामवर्ण व सर्व पुरुषलक्षणांनीं युक्त व कंठांत वनमाळा आणि चार हातांत शंख, चक्र, गदा व पद्म हीं धारण करणारा, मस्तकावर किरीट, कानांत कुण्डलें, बाहूंत बाहुभूषणें, हातांत कडीं; आणि कंठांत कौस्तुभमणि घालून पीताम्बर परिधान केलेला; कमरेंत कमरपट्टा आणि पायांत सुवर्णाचीं नूपुरें असून दर्शनाला योग्य असें अत्यंत शान्त व मनाला आणि नेत्रांना आनंद देणारें रूप धारण केलेला; चमकणाऱ्या नखरूप हिरकण्यांच्या रांगांनीं युक्त असे पाय असलेला, भक्तांच्या हृदयकमलाच्या कोशाला व्यापून त्यांच्या अंतःकरणामध्यें राहिलेला; आपल्याकडे प्रेमानें पाहून किंचित् हास्य करणारा असा जो श्रेष्ठ वर देणारा भगवान् श्रीहरि त्याचें निश्चल आणि एकाग्र मनानें ध्यान करावें ॥ ४५ ॥ ४६ ॥ ॥ ४७ ॥ ४८ ॥ ४९ ॥ ५० ॥ ५१ ॥ याप्रमाणें परम मंगलकारक अशा श्रीहरीच्या रूपाचें ध्यान करणाऱ्या पुरुषाच्या मनांत त्वरित पूर्ण वैराग्य उत्पन्न होतें आणि मग तें पुनः विषयाकडे कधींच वळत नाहीं ॥ ५२ ॥ नारदमुनि म्हणतात,–हे राजपुत्रा,

आतां मी तुला जप करण्यास योग्य असा उत्तम गुप्त मन्त्र सांगतों तो ऐक ! या मंत्राचा सात रात्रीं जप केला म्हणजे पुरुषाला देवाचें दर्शन होतें ॥ ५३ ॥ "ॐ नमो भगवते वासुदेवाय" हा तो द्वादशाक्षरी मंत्र होय ! देश व काल यांचें वैशिष्ट्य जाणणाऱ्या सुज्ञ पुरुषानें हा मंत्र म्हणून नाना प्रकारच्या पूजाद्रव्यांनीं श्रीहरीची प्रत्यक्ष पूजा + करावी ॥ ५४ ॥ पवित्र उदकें, पुष्पें, वनांतील मुळें, फळें, कन्द, दूर्वा आदिकरून पवित्र अंकुर व भगवंताला प्रिय असणाऱ्या अशा तुलसी इत्यादि सामग्रीनें परमेश्वराची पूजा करावी ॥ ५५ ॥ मग विचारशील होऊन पुरुषानें चित्त स्थिर आणि शांत करून मौनव्रत धरावें, वनांतील कन्दमूलादिकांचा परिमित आहार करावा आणि सुवर्णादि धातूंची श्रीहरीची प्रतिमा संपादन करून तिची पूजा करावी किंवा पृथ्वी, उदक इत्यादिकांच्या ठिकाणीं त्याची कल्पना करूनहि पूजा करावी ॥ ५६ ॥ त्याप्रमाणेंच पुण्यश्लोक असा श्रीहरि आपल्या अचिन्त्य मायेच्या योगानें इच्छेस येतील ते अनेक अवतार घेऊन जीं मनोहर चरित्रें करील त्यांचें सेवकानें मनन करावें ॥ ५७ ॥ त्याशिवाय पूर्वीच्या लोकांनीं भगवंताची पूजा करण्याचे जे मार्ग स्वीकारिले त्या सर्व मार्गांनीं मन्त्रस्वरूपी परमेश्वराची "ॐ नमो भगवते वासुदेवाय" या मंत्रानें पूजा करावी ॥ ५८ ॥ अशा प्रकारें कायावाचामनेंकरून भक्तियुक्त पूजासाहित्यानें श्रीहरीची पूजा केली असतां, उत्तम प्रकारें व निष्कपटपणें सेवा करणाऱ्या भक्तांचा भाव भगवान् वृद्धिंगत करतो आणि धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांपैकीं जें सुख अत्यंत इष्ट असें वाटत असेल, तें सुख त्यांना तो देतो ॥ ५९ ॥ ६० ॥ इन्द्रियांना संतुष्ट करण्याची आशा सर्वस्वीं सोडून अत्यंत एकनिष्ठ अशा भक्तियोगानें परमेश्वराविषयीं नित्य प्रेम बाळगावें व मुक्तीसाठीं त्याची सेवा करावी ॥ ६१ ॥ याप्रमाणें नारदमुनींनीं ध्रुवाला उपदेश केला असतां तो राजपुत्र त्या मुनीला प्रदक्षिणापूर्वक नमस्कार करून श्रीहरीच्या चरणांनीं भूषित झालेल्या अशा पवित्र मधुवनांत तप करण्यासाठीं निघून गेला ॥ ६२ ॥ तो तपोवनांत गेल्यावर नारदमुनि तेथून उत्तानपाद राजाच्या अन्तःपुरांत गेला आणि राजानें अर्पण केलेल्या अर्घ्यपाद्यादि उपचारांचा स्वीकार केल्यावर आसनावर स्वस्थ बसून राजाला विचारूं लागला ॥ ६३ ॥

नारद म्हणाला,—राजा, तुझें मुख असें सुकलेलें कां दिसतें व मनामध्यें दीर्घकाळ कसला विचार करीत आहेस ? संपत्तिप्रधान अशा तुझ्या धर्माचरणामध्यें किंवा ऐश्वर्यभोगामध्यें कांहीं उणेपणा आला आहे काय ? ॥ ६४ ॥

राजा म्हणाला,—हे नारदमुने, मी स्त्रीलम्पट होऊन निष्ठुर मनाचा झालों आणि आपल्या अवघ्या पांच वर्षांच्या अल्पवयी पण अत्यंत सुज्ञ अशा पुत्राला त्याच्या मातेसह घालवून दिलें आहे ॥ ६५ ॥ मुने, आतां तो माझा बाळ रानामध्यें

+ मानसपूजा नव्हे.

थकून आणि भुकेनें व्याकुळ होऊन पडला असतां त्याचें मुख सुकून गेलें असेल, व तशा स्थितींत त्याला लांडगे तर खाणार नाहींत ना ? ॥ ६६ ॥ नारदमुने, स्त्रीच्या पूर्णपणें स्वाधीन होऊन मी किती दुष्टपणा केला पाहा ! माझा पुत्र प्रेमानें मांडीवर बसूं इच्छीत असतां म्यां दुष्टानें त्याचा अंगीकार केला नाहीं ! ॥ ६७ ॥

नारद म्हणाला,—राजा, तुझ्या पुत्राचें रक्षण देव करीत असल्यामुळें त्याविषयीं शोक करण्याचें तुला मुळींच कारण नाहीं. अरे, त्याचें सामर्थ्य तुला माहीत नाहींसें दिसतें. त्याचें यश सर्व जगांत व्यापून राहिलें आहे ॥ ६८ ॥ राजा, तुझा तो पराक्रमी पुत्र इन्द्रादि लोकपालांना सुद्धां करण्यास कठीण असें कार्य करून व तुझ्या कीर्तीचा प्रसार करीत लवकरच परत येईल ॥ ६९ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, याप्रमाणें नारदमुनींचें भाषण ऐकिल्यावर त्या उत्तानपाद राजाला आपल्या राज्यलक्ष्मीविषयीं अनादर वाटूं लागला आणि तो सारखें आपल्या पुत्राचेंच चिन्तन करीत राहिला ॥ ७० ॥ इकडे ध्रुव नारदाच्या सांगण्याप्रमाणें मधुवनांत गेला आणि तेथें स्नान करून व अहोरात्र उपवास करून एकाग्र अंन्तःकरणानें त्यानें श्रीहरीची पूजा केली ॥ ७१ ॥ पुढें तीन तीन दिवस उपोषण करून चौथ्या दिवशीं शरीरनिर्वाहाला अवश्य लागतील तितकीं कवठें व बोरें भक्षण करावीं, अशा रीतीनें श्रीहरीची आराधना करीत त्यानें एक महिना घालविला ॥ ७२ ॥ पुढें दुसऱ्या महिन्यांत प्रत्येक सहाव्या दिवशीं, गळून पडलेलीं पानें, गवत इत्यादिकांवरच निर्वाह करून त्या अल्पवयी ध्रुवाने श्रीहरीची आराधना केली ॥ ७३ ॥ तिसरा महिना तर प्रत्येक नवव्या दिवशींच उदकपान करून त्यानें काढला आणि समाधि लावून श्रीहरीची उपासना तो करूं लागला ॥ ७४ ॥ नंतर चौथ्या महिन्यांत प्रत्येक बाराव्या दिवशीं वायुभक्षण करण्याचा क्रम त्यानें ठेवला आणि प्राणाला स्वाधीन करून श्रीहरीचें ध्यान करीत देहाचें धारण केलें ॥ ७५ ॥ पांचवा महिना सुरू झाल्यावर प्राणांवर पूर्णपणें नियंत्रण चालविणारा तो एकाच पायावर खांबाप्रमाणें निश्चल उभा राहून ब्रह्मदेवाचें ध्यान करूं लागला ॥ ७६ ॥ विदुरा, शब्दादि विषय व इन्द्रियें ह्यांना आधारभूत असें जें मन, तें सर्व विषयांवरून त्यानें आवरून घेतलें आणि हृदयामध्यें एका श्रीहरीचेंच ध्यान करीत राहिल्यामुळें त्याला त्या भगवत्स्वरूपावांचून दुसरें कांहींच दिसेनासें झालें ॥ ७७ ॥ याप्रमाणें महत्तत्त्वादिकांचें आधारभूत व प्रकृतिपुरुषाचेंहि नियामक असें जें ब्रह्मतत्व त्याचें ध्यान तो ध्रुव करीत असतां तिन्ही लोक थरथर कांपूं लागले ॥ ७८ ॥ तो राजकुमार एका पायावर उभा राहून ब्रह्मचिंतन करूं लागला. त्याच्या अंगठ्याच्या भारानें पृथ्वी लवूं लागली आणि हत्ती जसा नौकेंत उभा राहिला म्हणजे, तो आपले पाय उचलील त्याप्रमाणें तिचा डावा उजवा भाग खालीं वर होतो, तशा प्रकारें पृथ्वीची एक बाजूहि ध्रुवाच्या भारानें दबून गेली ॥ ७९ ॥ विश्वस्वरूपी श्रीहरि आपल्याहून निराळा

नाहीं, अशा अभेदबुद्धीनें ध्रुव आपल्या प्राणाचा आणि त्याच्या द्वारांचा निरोध करून ईश्वराचें ध्यान करूं लागला, तेव्हां इन्द्रादि लोकपालांसहित सर्व लोकांचे श्वास कोंडून गेले व त्यामुळें त्यांना फार पीडा होऊं लागून ते विष्णूला शरण गेले ॥ ८० ॥

देव म्हणाले,—श्रीहरे, स्थावरजंगमात्मक सर्व प्राण्यांच्या शरिरांतील प्राणवायु हा असा एकाएकीं कोंडून गेला असून, त्याचें कारण आम्हांला कांहीं समजत नाहीं. परमेश्वरा, आपण शरणागतांचे रक्षणकर्ते आहां. आम्ही आपणांला शरण आलों आहों. तरी आपण आमची ह्या दुःखापासून मुक्तता करावी ॥ ८१ ॥

श्रीभगवान् म्हणाले,—देव हो, तुम्ही भिऊं नका. तुमचे सर्वांचे श्वासोच्छ्वास कोंडून जाण्याचें कारण उत्तानपाद राजाचा पुत्र ध्रुव माझ्या ठिकाणीं ऐक्य पावला आहे हें होय. आतां तुम्ही आपल्या स्थानीं परत जा ! त्या ध्रुव बाळाला त्याच्या दुश्चर तपश्चर्येपासून मी आतां निवृत्त करतों ॥ ८२ ॥

**आठवा अध्याय समाप्त**

# अध्याय ९ वा

मैत्रेयमुनि विदुराला म्हणाले,—विदुरा, याप्रमाणें देवांची भीति श्रीहरीनें दूर केली असतां ते देव महापराक्रमी अशा श्रीहरीला नमस्कार करून स्वर्गाला निघून गेले. नंतर अनंत मस्तकांनीं युक्त असा भगवान् सुद्धां आपला भक्त जो ध्रुव त्याला पाहण्याच्या इच्छेनें गरुडावर बसून मधुवनांत प्राप्त झाले ॥ १ ॥ योगाभ्यासाच्या दृढतेमुळें ध्रुवाची बुद्धि निश्चल झाली असून त्याला आपल्या हृदयरूपी कमलाच्या कलिकेमध्येंच विद्युल्लतेसारखें तेजस्वी असें श्रीहरीचें रूप स्पष्ट दिसत होतें. तें एकाएकीं गुप्त झालेलें पाहून ध्रुवानें डोळे उघडिले, तोंच त्याला हृदयांत दिसत असलेली श्रीहरीची मूर्ति बाहेर आपल्यापुढें उभी असलेली दिसून आली ॥२॥ श्रीहरीचें दर्शन होतांच अल्पवयी ध्रुवाची फारच धांदल उडाली. त्यानें आपलें शरीर काठीप्रमाणें पृथ्वीवर लववून परमेश्वराला वंदन केलें आणि तें करतांना आपल्या नेत्रांनीं तो भगवत्स्वरूपाचें जणूं काय प्राशनच करूं लागला. मुखानें त्याचें चुंबन घेऊन बाहूंनीं जणूं काय तो आलिंगनच देत आहे कीं काय असें भासलें ॥३॥ मग आपल्या व इतरहि सर्वांच्या हृदयांत वास करणाऱ्या श्रीहरीचें हात जोडून ध्रुव गुणवर्णन करूं लागला; परंतु अल्पवयामुळें तें कसें करावें हें त्याला समजेना. हें पाहून भगवंतानें आपल्या वेदस्वरूपी शंखानें त्या ध्रुवाच्या गालाला स्पर्श केला ॥ ४ ॥ तेव्हां परमेश्वरानें दिलेली ती वेदमय वाणी ध्रुवाला तत्काळ प्राप्त झाली असतां ईश्वर व जीव यांचा निर्णय कळल्यामुळें त्याच्या मनांत भक्तीच्या योगानें श्रीहरीविषयीं प्रेम उत्पन्न झालें, आणि लवकरच अढळपदाला प्राप्त होणारा तो ध्रुव श्रीहरीची विशाल कीर्ति श्रवण करून स्थिर चित्तानें त्याची स्तुति करूं लागला ॥ ५ ॥

ध्रुव म्हणाला,—हे भगवन्, सर्वशक्तिमान् असा जो तूं आपल्या चैतन्यशक्तीनें अंतःकरणांत प्रवेश करून माझ्या ह्या निद्रित वाणीला, तसेंच हात, पाय, कान, त्वचा इत्यादि इंद्रियांना चैतन्य देतोस त्या सर्वान्तर्यामीं व षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा तुला मी नमस्कार करितों ॥ ६ ॥ हे भगवन्, सर्वांच्या अन्तर्यामीं राहणारा असा तूं एकच आहेस. ज्याप्रमाणें अग्नि भिन्न भिन्न काष्ठांच्या अनुरोधानें अनेक प्रकारचा भासतो, त्याप्रमाणें तूं विविधगुणांनीं युक्त अशा आपल्या मायानामक शक्तीच्या योगानें महत्तत्त्व आदिकरून ह्या सर्व सृष्टीला उत्पन्न करितोस आणि त्या मायेच्या भासमान गुणांमध्यें प्रवेश केल्यामुळें अनेक प्रकारचा भासूं लागतोस ॥ ७ ॥ हे परमेश्वरा, ब्रह्मदेव जेव्हां तुला शरण गेला तेव्हाच तूं दिलेल्या ज्ञानाच्या योगानें, झोंपीं गेलेला मनुष्य जागा होऊन त्याला जवळचे पदार्थ दिसूं लागावे, त्याप्रमाणें—त्याला हें सर्व विश्व दिसूं लागलें. हे दीनबन्धो, मुक्त पुरुष देखील ज्या तुझ्या पायांच्या स्थानाचा आश्रय करितात, ते स्थान,

तूं केलेले अनंत उपकार स्मरणारा पुरुष कसें बरें विसरेल ? ॥ ८ ॥ हे परमेश्वरा, स्पर्शजन्य विषयसुख मनुष्यांना नरकांत सुद्धां प्राप्त होतें, यास्तव प्रेतासमान अशा या देहानें उपभोगण्यास योग्य अशा विषयसुखाची इच्छा करितात व जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडविणाऱ्या व कल्पवृक्षाप्रमाणें इच्छित मनोरथ पूर्ण करणाऱ्या तुझी, मोक्षाशिवाय इतर कांहीं तरी मागण्याच्या हेतूनें पूजा करतात, त्यांची बुद्धि तुझ्या मायेनें मोहित झाली आहे असें म्हटलें पाहिजे ॥ ९ ॥ परमेश्वरा, तुझ्या चरणकमलाचें ध्यान केलें, किंवा तुझ्या भक्तांचीं चरित्रे ऐकिलीं, म्हणजे त्या योगानें प्राण्यांना जें सुख प्राप्त होतें तें तुझ्या सच्चिदानंद ब्रह्मस्वरूपांत देखील प्राप्त होणारें नाहीं. मग यमराजाच्या तलवारीनें तोडलेल्या विमानांतून खालीं पडणाऱ्या प्राण्यांना तें कसें बरें प्राप्त होईल ? ॥ १० ॥ यास्तव, हे अनंता, माझी तुझ्याजवळ एवढीच मागणी आहे कीं, शुद्ध मनानें तुझी निरंतर भक्ती करणारे जे साधु असतील त्यांचा मला समागम घडावा, म्हणजे नित्य तुझ्या गुणसंकीर्तनरूपी अमृताच्या पानानें तृप्त होऊन अनेक दुःखांनीं भरलेल्या अशा या भवसमुद्राला अनायासें तरून जाईन ॥ ११ ॥ हे भगवन्, तुझ्या चरणकमलाच्या सुगन्धाला ज्यांचीं मनें अत्यन्त लुब्ध झालेलीं असतात त्या भक्तांची संगति करणाऱ्या पुरुषांना आपलें हें प्रिय शरीर व ह्याचे संबंधी अशीं, पुत्र, मित्र, घर, द्रव्य व स्त्री यांचें मुळींच स्मरण होत नाहीं ॥ १२ ॥ हे अनादि परमेश्वरा, पशु, पर्वत, वृक्ष, पक्षी, सर्प, देव, दैत्य, मनुष्यें इत्यादिकांनीं व्यापलेलें व बऱ्यावाईट अनेक प्रकारांनीं भरलेलें असें जें महत्तत्वादि अनेक तत्त्वांनीं बनलेलें विराट् शरीर, ते तुझेंच रूप होय, हेंहि मी जाणतों; परंतु ह्याच्या पलीकडे जेथें शब्दांचा व्यापार चालत नाहीं, अशा तुझ्या मूळ स्वरूपाचें मात्र मला मुळींच ज्ञान नाहीं ॥ १३ ॥ परमेश्वरा, कल्पाच्या शेवटीं जेव्हां हें सर्व जग आपल्या उदरांत तूं धारण करितोस, त्या वेळीं तुला साहाय्य करणारा एक शेष मात्र असतो व आपल्या स्वरूपीं दृष्टि ठेवून त्या शेषावर तूं शयन करीत असतोस; आणि सर्व लोकांचें उत्पत्तिस्थान जें सुवर्णमय कमळ तें तुझ्या नाभिरूप समुद्रामध्यें उत्पन्न होतें व त्याच्या मध्यभागीं तेजस्वी असा ब्रह्मदेव प्रगट होतो. हे परमेश्वरा, त्या तुला मीं शरण आलों आहें ॥ १४ ॥ हे भगवन्, बुद्धीच्या निरनिराळ्या अवस्थांना आपल्या अखण्ड चैतन्यरूप शक्तीच्या योगानें तूं अवलोकन करितोस, म्हणून तूं अविनाशी, मुक्त, अत्यन्त शुद्ध आणि सर्वज्ञानी असा असून तुझ्या स्वरूपांत विकार घडत नाहीं. तूं सर्वांचा आदिपुरुष असून षड्गुणैश्वर्यसंपन्न व तिन्ही लोकांचा स्वामी आहेस. जगाचें पालन करण्याच्या कार्यांत तूं यज्ञपति हें स्वरूप धारण करितोस; पण वास्तविक तूं त्या सर्वांहून निराळाच आहेस ॥ १५ ॥ नित्य एकमेकांशीं विरुद्धगतीनें असणाऱ्या विद्या आदिकरून अनेक प्रकारच्या शक्ती ज्याच्या ठिकाणीं अनुक्रमानें अकस्मात् उत्पन्न होतात त्या भेदरहित, अनादि, अनंत, केवळ आनंदस्वरूपी, निर्विकार व जगाचें आदिकारण अशा ब्रह्मस्वरूपाला मीं शरण आलों आहें ॥ १६ ॥ हे श्रीहरे, पुरुषार्थ हीच तुझी मूर्ति होय, असें समजून जो पुरुष तुझ्या चरणकमलाची आराधना करतो, त्याला राज्यादि उपभोगांपेक्षां अधिक

योग्यतेचें परमार्थफल प्राप्त होतें. हे परमेश्वरा, असें असतांहि गाय आपल्या वासराचें संरक्षण करित्ये, त्याप्रमाणें भक्तांवर कृपा करण्यासाठीं अत्यंत उत्सुक असलेला तूंहि आम्हां दीनांचें संरक्षण करितोस ॥ १७ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—हे विदुरा, सदिच्छा धारण करणाऱ्या त्या बुद्धिमान् ध्रुवानें याप्रमाणें भक्तवत्सल अशा त्या श्रीहरीची स्तुति केली असतां त्याचा गौरव करून भगवान् ध्रुवाला म्हणाले ॥ १८ ॥

भगवान् म्हणाले,—हे राजपुत्रा ध्रुवा, तुझ्या अन्तःकरणांत काय इच्छा आहे ती मला ठाऊक आहे, तुझें कल्याण असो. तुझें तप फार तीव्र आहे. यास्तव तुला जें पाहिजे आहे तें मिळविणें फार कठीण असलें तरी तें मी तुला देतों ॥ १९ ॥ हे कल्याणस्वरूप ध्रुवा, ज्या तेजस्वी अढळपदावर आजपर्यंत कोणीहि जाऊन बसलेला नाहीं व ज्यावर ग्रह, नक्षत्रें व तारा या नभोगोलांचें चक्र स्थापिलेलें आहे ॥ २० ॥ जें पद कल्पान्तापर्यंत राहणाऱ्या लोकांपेक्षांहि चिरकाल राहणारें आहे, ज्याप्रमाणें धान्य मळण्यासाठीं तयार केलेल्या खळ्यांत मधोमध पुरलेल्या खांबाला बांधिलेले बैल, त्या खांबाच्या सभोंवतीं फिरतात, त्याप्रमाणें धर्म, अग्नि, कश्यप, शुक्र, तसेंच तपश्चर्येसाठीं वनांत राहणारे ऋषि, हे तारकांसह ज्याच्या सभोंवतीं नित्य फिरतात, तें स्थान मीं तुला दिलें आहे ॥ २१ ॥ पृथ्वीचें राज्य तुला देऊन तुझा पिता वनांत गेला म्हणजे तूं धर्माचा आश्रय करून इन्द्रियांची शक्ति नष्ट न होतां छत्तीस हजार वर्षेपर्यंत पृथ्वीचें रक्षण करशील ! ॥ २२ ॥ ध्रुवा, तुझा सावत्रबन्धु उत्तम हा मृगयेला गेला असतां तेथें नाश पावेल आणि त्याची माता सुरुचि त्याच्या ठिकाणीं मन आसक्त झाल्यामुळें अरण्यांत त्याचा शोध करीत असतां वणव्यामध्यें प्रवेश करील ॥ २३ ॥ हे ध्रुवा, यज्ञ हेंच माझें हृदय असल्यामुळें पुष्कळ दक्षिणा देऊन अनेक यज्ञांनीं तूं माझी आराधना करशील आणि त्यामुळें इहलोकीं उत्तम भोग भोगल्यावर शेवटीं तुला माझें स्मरण घडेल आणि त्यामुळें तूं सर्वांना वंद्य होऊन, ज्या स्थलीं एकदां जाऊन पोंचलें असतां माघारें येऊन संसारांत पडावें लागत नाहीं, असें जें ऋषिलोकांच्याहिवर असलेलें माझें स्थान, तें तुला प्राप्त होईल ! ॥ २४ ॥ २५ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले;—विदुरा, भगवान् श्रीहरीचें ध्रुवानें पूजन केलें आणि भगवंतानें प्रसन्न होऊन त्याला आपलें अढळ स्थान दिलें व ध्रुव पाहात असतांच तो आपल्या वैकुंठलोकास निघून गेला ॥ २६ ॥ तसाच ध्रुव सुद्धां विष्णूच्या चरणांची सेवा केल्यामुळें सर्व मनोरथांची समाप्ति करणारें असें इष्ट पद प्राप्त झालें असतां आपल्या नगरीला निघून गेला; पण त्याचें मन व्हावें तसें प्रसन्न झालें नाहीं ॥ २७ ॥

विदुर म्हणाला—हे मैत्रेयमुने, सकाम पुरुषाला प्राप्त होणें सर्वथैव अशक्य असें अढळपद ध्रुवानें श्रीहरीच्या चरणांची सेवा करून एकाच जन्मांत प्राप्त करून घेतलें. असें असतांहि पुरुषार्थांचें ज्ञान असलेल्या त्या ध्रुवाला आपला मनोरथ जणूं काय पूर्ण

झाला नाहीं असें कां बरें वाटलें ? ॥ २८ ॥ मैत्रेयमुनि म्हणाले,–विदुरा, ( ध्रुवाचें मन व्हावें तसें प्रसन्न झालें नाहीं ह्याचें कारण तुला सांगतों. ) त्याच्या अन्तःकरणाला सावत्र मातेच्या दुष्ट शब्दांनीं घरें पाडिलीं होतीं व तिचें एकेक वाक्य त्याला सारखें आठवत होतें. त्यामुळें मुक्तिदात्या परमेश्वराचें दर्शन झालें असतांहि त्यापाशीं मुक्ति मागण्याची इच्छा आपल्याला झाली नाहीं, ही गोष्ट मनांत येऊन त्याला खेद झाला होता ॥ २९ ॥

ध्रुव आपल्याशींच बोलूं लागला, सनकसनंदन आदिकरून नैष्ठिक ब्रह्मचर्य धारण करणाऱ्या मुनींनीं अनेक जन्मपर्यंत समाधियोगाचा अभ्यास केला तेव्हांच ज्याच्या पदांचें त्यांना ज्ञान झालें, त्या श्रीहरीच्या चरणांची छाया मी केवळ सहा महिन्यांत प्राप्त करून घेतली. असें असूनहि मी क्षुद्र दृष्टि ठेविल्यामुळें त्यापासून शेवटीं दूर झालों ॥ ३० ॥ अहो, माझ्या अज्ञानाबद्दल मला आतां खेद वाटतो. खरोखर माझें भाग्यच मन्द आहे. पाहा कीं, संसाराचा नाश करणाऱ्या श्रीहरीच्या चरणांजवळ प्राप्त होऊनहि मी त्याच्याजवळ नश्वर अशाच पदाची याचना केली ! ॥ ३१ ॥ मला उच्चस्थान प्राप्त झालें असतां देवांना खालीं राहावें लागेल, म्हणून हा प्रकार त्यांना सहन न झाल्यामुळें त्यांनीं माझ्या बुद्धीला भ्रम पाडिला असावा आणि त्यामुळेंच मी अत्यंत मूढ होऊन गेलों व नारदमुनींनीं यथार्थ उपदेश केला असतांहि त्याप्रमाणें मी वागलों नाहीं ॥ ३२ ॥ श्रीहरीच्या मायेचा आश्रय केल्यामुळें माझ्या दृष्टींत भेदभाव उत्पन्न झाला आहे आणि झोंपी गेलेला पुरुष ज्याप्रमाणें व्याघ्रादिक असत्पदार्थांना पाहून भयग्रस्त होतो, त्याप्रमाणें आत्म्यावांचून दुसरी कांहीं वस्तु नसतांना सुद्धां, हा माझा बन्धु, हा माझा शत्रु अशा भ्रामक विवेचनेनें दुःख पावत आहे ॥ ३३ ॥ मनुष्याचें आयुष्य संपल्यावर त्याच्या रोगाची वैद्याकडून चिकित्सा करणें जसें व्यर्थ आहे, त्याप्रमाणेंच माझी ही मागणी व्यर्थ होय. सर्व जगताचा आधार असा तो परमेश्वर प्रसन्न होणें कठीण; परंतु मी त्याला आपल्या तपश्चर्येच्या योगानें प्रसन्न करून घेतलें आणि तो संसाराचा नाश करणारा असतांहि म्यां अभाग्यानें त्याच्याजवळ संसारच मागून घेतला ! ॥ ३४ ॥ निर्धन मनुष्यानें सार्वभौम राजापाशीं जाऊन न सडलेले टरफलासहित तांदुळ मागावे, त्याप्रमाणें आत्मानंदाची प्राप्ति करून देणाऱ्या श्रीहरीपाशीं मी मूर्खपणानें अभिमानाची याचना केली. तेव्हा माझें पुण्यच संपलें असें म्हणावयास नको काय ? ॥ ३५ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, श्रीकृष्णाच्या चरणकमलांतील परागांचें सेवन करणारे तुझ्यासारखे लोक दैवयोगानें जें काय प्राप्त होईल तेवढ्यानेंच आपल्या मनाचा संतोष ठेवतात, आणि श्रीहरीच्या सेवेवांचून दुसऱ्या कोणत्याहि पुरुषार्थाची ते स्वतःकरितां इच्छा करीत नाहींत ॥ ३६ ॥

---

१ यालाच कोंकणांत ' भात ' ( नपुंसकलिंगी ) म्हणतात.

असो. विदुरा, उत्तानपादराजाला आपला पुत्र ध्रुव घरीं परत येत आहे ही वार्ता समजली; पण तो परत येणें म्हणजे मेलेला मनुष्य परत येण्यासारखें होतें, म्हणून राजाला तें खरें वाटलें नाहीं. तो मनांत म्हणाला, 'माझ्या पदरीं पुण्य मुळींच नाहीं, तेव्हां हें उत्तम फल मला कोठून मिळणार?' ॥ ३७ ॥ परंतु त्याला 'तुझा पुत्र ध्रुव लवकरच परत येईल' असें जें नारदानें पूर्वी सांगितलें होतें त्याची आठवण झाली आणि ध्रुवाच्या येण्याची वार्ता खरीच असावी असें त्याला वाटलें; तेव्हां त्याला फारच हर्ष झाला आणि त्यामुळें क्षणभर तो देहभानहि विसरला. त्या आनंदाच्या भरांत ती वार्ता आणणाऱ्याला त्यानें एक बहुमोल हार दिला ॥ ३८ ॥ नंतर त्यानें सुवर्णालंकारांनीं सुशोभित अशा आपल्या रथाला उत्तम घोडे जोडून त्यावर आरोहण केलें आणि अनेक ब्राह्मण, कुलवृद्ध, अमात्य व बान्धव यांना बरोबर घेऊन पुत्रदर्शनासाठीं उत्कण्ठित झालेला तो राजा, शंख, दुन्दुभि व मुरली इत्यादि वाद्यें वाजत असतां ब्राह्मणांकडून वेदघोष करवीत आपल्या नगरींतून त्वरित बाहेर पडला ॥ ३९ ॥ ४० ॥ सुनीति व सुरुचि ह्या त्या उत्तानपाद राजाच्या दोन्ही राण्या अंगावर सुवर्णाचे अलंकार घालून उत्तमासह पालखींत बसल्या आणि ध्रुवाला सामोऱ्या जाण्यास निघाल्या ॥ ४१ ॥ राजाचें अन्तःकरण पुत्रप्रेमानें अगदीं कळवळून गेलें होतें. उपवनाजवळ येतांच ध्रुव त्याच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर तो आपल्या रथांतून उतरून त्याच्याजवळ गेला ॥ ४२ ॥ राजाचें मन पुत्रविरहामुळें फारच उत्कण्ठित झालें होतें व त्यामुळें तो उसासे टाकीत होता. अशा स्थितींत विष्णूच्या चरणस्पर्शानें ज्याचीं सर्व पातकरूप बंधनें तुटून गेलीं आहेत, असा आपला पुत्र पाहतांच राजानें त्याला आपल्या दोन्ही बाहूंनीं गाढ आलिंगन दिलें ॥ ४३ ॥ आणि आपला मोठा मनोरथ पूर्ण झाला असें वाटून त्यानें आपल्या पुत्राचें मस्तक वारंवार हुंगिलें व आपल्या शीतल अशा आनंदाश्रूंनीं त्याला स्नान घातलें ॥ ४४ ॥ याप्रमाणें स्वागत झालें असतां त्या सज्जनश्रेष्ठ ध्रुवानें आपल्या पित्याच्या चरणांना नमस्कार केला आणि पित्यानेंहि त्याला अनेक आशीर्वाद देऊन खुशाली विचारली. मग ध्रुवानें आपल्या दोन्ही मातांनाहि मस्तक लववून नमस्कार केला ॥ ४५ ॥ ध्रुवानें सुरुचीच्या चरणीं मस्तक ठेविलें तेव्हां तिनें त्याला उठवून आलिंगन दिलें आणि सद्गदित कंठानें 'बाळा, चिरंजीव हो!' असा आशीर्वाद दिला ॥ ४६ ॥ मैत्री आदिकरून गुणांच्या योगानें भगवान् श्रीहरीला प्रसन्न करून घेतलें असतां—पाणी जसें स्वाभाविकपणें खोल प्रदेशाकडे वळतें, त्याप्रमाणें—सर्व प्राणी त्या पुरुषाला आपोआपच अनुकूल होतात ॥ ४७ ॥ असो. नंतर प्रेमामुळें एकमेकांस भेटण्यास उत्सुक झालेले, उत्तम व ध्रुव ह्या दोघांनीं परस्परांना आलिंगन दिलें, तेव्हां त्यांच्या अंगांवर रोमाञ्च उभे राहिले आणि त्यांच्या डोळ्यांतून सारखा आनंदाश्रूंचा पूर वाहूं लागला ॥ ४८ ॥ ध्रुवाची माता जी सुनीति, तिनेंहि प्राणापेक्षां प्रिय अशा आपल्या पुत्राला आलिङ्गन दिलें आणि त्याच्या शरिराचा स्पर्श होतांच तिला अतिशय आनंद होऊन तिचीं सर्व मानसिक दुःखें नष्ट झालीं ॥ ४९ ॥ मैत्रेय म्हणतात, विदुरा, त्या वेळीं त्या वीरमाता सुनीतीचे स्तन तिच्या डोळ्यांतून वाहणाऱ्या आनंदाश्रूंनीं भिजून गेले

असतां त्यांतून दूध वाहूं लागलें ॥ ५० ॥ तेव्हां लोक त्या राणीची प्रशंसा करून म्हणाले, 'हे सुनीति, पुष्कळ काळ नाहींसा झालेला तुझा पुत्र आज पुनः तुला मिळाला, ही मोठ्या सुदैवाची गोष्ट होय. हा तुझें दुःख दूर करून भूमण्डळाचें रक्षण करील' ॥ ५१ ॥ आम्हांला तर निश्चयपूर्वक असें वाटतें कीं, ज्या श्रीहरीचें ध्यान केल्यामुळें अत्यन्त दुर्जय अशा मृत्यूलाहि वीर पुरुषांनीं जिंकिलें, त्या भक्तांचें दुःख दूर करणाऱ्या भगवन्ताची तूं उत्तम प्रकारें आराधना केली आहेस' ॥ ५२ ॥ विदुरा, याप्रमाणें सर्व लोकांनीं ध्रुवाचा गौरव केल्यावर उत्तानपाद राजानें त्याला उत्तमासह हत्तिणीवर बसवून संतुष्ट अन्तःकरणानें नगरांत प्रवेश केला. त्या वेळीं सर्व लोक त्याची स्तुति करूं लागले ॥ ५३ ॥ लोकांनीं नगरामध्यें जागोजाग मकराच्या आकाराचीं सुंदर तोरणें उभारलीं. त्या तोरणांना केळीं व केळफुलें ह्यांनीं युक्त असे केळीचे खांब आणि तशाच प्रकारचीं सुपारीचीं रोपें लाविलीं असल्यामुळें त्यांना फारच शोभा आली होती ॥ ५४ ॥ प्रत्येक द्वारावर आंब्याचे टाळे, वस्त्रें, माळा व मोत्यांचे सर लावून व दीपयुक्त असे पाण्याचे घडे ठेवून त्या नगराला विशेष शोभा आणिली होती ॥ ५५ ॥ तसेंच भोंवतालचे तट, आंतील उंच वेशींचीं घरें आणि सोन्यानें मढविलेल्या कळसांचे मोठमोठे सात मजली वाडे यांच्या तेजामुळें त्या नगराला सुंदर स्वरूप प्राप्त झालें होतें ॥ ५६ ॥ त्या नगरांतील घरांचीं अंगणें, गल्ल्या आणि राजमार्ग झाडून त्यांवर चंदनाचा सडा घातला होता व ठिकठिकाणीं लाह्या, अक्षता, फळें, फुलें, तांदूळ आणि पूजासाहित्य हीं ठेविलेलीं होतीं ॥५७॥ अशा त्या नगरांतून ध्रुव चालला असतां ठिकठिकाणच्या स्त्रियांनीं तो दृष्टीस पडतांच त्याला प्रेमळ आशीर्वाद दिले व त्याच्यावर पांढऱ्या मोहऱ्या, अक्षता, दहीं, उदक, दूर्वा, पुष्पें व फळें ह्यांचा वर्षाव केला व त्या स्त्रियांनीं गायिलेलीं गोड गाणीं श्रवण करीत ध्रुवानें आपल्या पित्याच्या मंदिरांत प्रवेश केला ॥ ५८ ॥ ५९ ॥ उत्तानपाद राजाचें तें उत्तम मंदिर उंची स्फटिकांचें बांधिलें होतें. अशा त्या मंदिरामध्यें मातापित्यांच्या संगोपनांत ध्रुव राहूं लागला व देवांना जसा स्वर्ग तसेंच तें मंदिर त्याला वाटूं लागलें ॥ ६० ॥ त्या मंदिरामध्यें दुधाच्या फेंसासारखे शुभ्र स्वच्छ बिछाने, सोन्याच्या टोपणाचे हस्तिदन्ती पलंग, मूल्यवान् आसनें व सोन्याचीं उपकरणें सर्वत्र मांडलेलीं होतीं ॥ ६१ ॥ त्या मन्दिराच्या भिंती कांहीं उंची पाचूच्या व कांहीं स्फटिकांच्या असून त्यांत बसविलेल्या सुंदर पुतळ्यांच्या हातांत रत्नांचे दिवे शोभत होते ॥ ६२ ॥ त्याच्या सभोंवतीं अनेक उपवनें असून त्यांत जागोजाग अनेक प्रकारचे कल्पवृक्ष होते, पक्ष्यांचीं जोडपीं त्यांत बसून गात होतीं व मत्त भ्रमरांचे समुदाय गुंजारव करीत होते. अशीं तीं उपवनें मनोहर होतीं ॥ ६३ ॥ त्या उपवनांतील विहिरींना वैदूर्यमण्यांच्या पायऱ्या असून त्यांत तांबडीं, काळीं व पांढरीं कमलें लाविलीं होतीं, व हंस आणि कारण्डव, तसेच चक्रवाक व सारस यांच्या कळपांनीं त्यांचा आश्रय केला होता ॥ ६४ ॥ आपल्या पुत्राचा अद्भुत प्रभाव ऐकून व पाहून त्या राजर्षि उत्तानपाद राजाला फार आश्चर्य वाटलें ॥ ६५ ॥ मग कांहीं काळानें, आपला पुत्र वयांत आला असून प्रधानमंडळाला मान्य आहे व प्रजाहि त्यावर प्रीति

करीत आहे असें जाणून उत्तानपाद राजानें त्याला राज्याभिषेक करविला ॥ ६६ ॥ आणि आपण वृद्ध झालों असें जाणून त्यानें सर्वसंगपरित्याग केला व स्वरूपाचें चिंतन करीत तो वनांत निघून गेला ॥ ६७ ॥

**नववा अध्याय समाप्त**

# अध्याय १० वा

मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, ध्रुवानें शिशुमार प्रजापतीच्या भ्रमिनामक कन्येशीं विवाह केला आणि तीपासून त्याला कल्प व वत्सर असे दोन पुत्र झाले ॥ १ ॥ तसेंच वायूची इला नामक जी कन्या ती त्याची दुसरी भार्या होती. तिच्या ठिकाणीं त्याला उत्कल नांवाचा, स्त्रियांचें मन हरण करणारा असा सुंदर पुत्र झाला ॥ २ ॥ परंतु उत्तमानें विवाहच केला नाहीं. एकदां तो पर्वतावर मृगयेला गेला असतां एका बलाढ्य यक्षानें त्याचा वध केला. तेव्हां त्याची माताहि पुत्राच्या दुःखानें मरण पावली ॥ ३ ॥ बंधूच्या वधाची ही वार्ता ऐकून ध्रुवाला फार वाईट वाटलें व क्रोधानें संतप्त होऊन यक्षाचें पारिपत्य करण्याचा त्यानें निश्चय केला व लगेच आपल्या विजयशाली रथांत बसून त्यानें यक्षांच्या अलकानामक राजधानीवर चाल केली ॥ ४ ॥ शिवगणांचा निवास असलेल्या उत्तर दिशेकडे तो गेला असतां हिमालय पर्वताच्या एका विस्तीर्ण दरीमध्यें वसलेली व यक्षांनीं गजबजलेली अलकानगरी त्याच्या दृष्टीस पडली ॥ ५ ॥ तेथें पोंचतांच त्या महाबाहु ध्रुवानें आपला शंख फुंकला व त्याच्या ध्वनीनें आकाश आणि दाही दिशा दणाणून टाकल्या. त्या भयंकर नादामुळें यक्षस्त्रियांचे डोळे कावरेबावरे झाले व त्या अगदीं घाबरून गेल्या ॥ ६ ॥ ध्रुवाचा तो शंखध्वनि कुबेराचे अनुयायी असलेल्या त्या पराक्रमी यक्षांना सहन झाला नाहीं. त्यांच्यांतील मोठमोठे योद्धे आपलीं आयुधें सज्ज करून लगेच नगराच्या बाहेर आले आणि त्यांनीं ध्रुवावर चाल केली ॥ ७ ॥ तेव्हां आपल्यावर चाल करून येणाऱ्या यक्षांवर त्या महारथी शूर ध्रुवानें आपल्या प्रचंड धनुष्यावरून प्रत्येकीं तीन तीन बाण सोडिले व सर्वांना एकाच वेळीं घायाळ केलें ॥ ८ ॥ ते बाण यक्षांच्या कपाळांना लागले तेव्हां आपला पराभव झाला असें वाटून त्यांनीं ध्रुवाच्या त्या अतुल पराक्रमाची खरोखर प्रशंसा केली ॥ ९ ॥ सर्पाला कोणाचा पाय लागला असतां तो जसा त्याला सहन होत नाहीं, त्याप्रमाणें त्या यक्षांना ते ध्रुवाचे बाण सहन झाले नाहींत. त्याच्यावर उलट मारा करण्याच्या इच्छेनें त्या सर्वांनीं एकाच वेळीं त्याच्यावर सहा सहा बाण सोडले ॥ १० ॥ ते यक्ष एक लक्ष तीस हजार होते. त्या सर्वांनीं क्रुद्ध होऊन ध्रुवाचा प्रतिकार करण्यास्तव त्याच्या रथावर परिघ, खड्ग, प्रास, शूल, कुठार, शक्ति, ऋष्टि, भुशुण्डी व चित्रविचित्र पिसांचे बाण यांचा सारखा वर्षाव चालू केला. ॥ ११ ॥ ॥ १२ ॥ त्या वेळीं, पावसाची सर जोरानें पडूं लागली असतां डोंगर जसा दिसेनासा होतो, त्याप्रमाणें यक्षांच्या त्या प्रचण्ड शस्त्रवर्षावानें उत्तानपाद राजाचा पुत्र ध्रुवहि झांकून गेला. अर्थात् मुळींच

दिसेनासा झाला ॥ १३ ॥ हा प्रकार पाहून मनुष्यांतील सूर्यच असा तो ध्रुव यक्षांच्या सेनासमुद्रांत बुडून नष्ट झाला कीं काय असें आकाशांतून तो युद्धचमत्कार पाहणाऱ्या सिद्धांना वाटलें आणि त्यांनीं मोठा हाहाःकार केला ॥ १४ ॥ पण चमत्कार असा कीं, 'यक्षांचा जय झाला' म्हणून राक्षस गर्जना करीत आहेत तोंच, धुक्यांतून सूर्य जसा बाहेर पडतो, त्याप्रमाणें ध्रुवाचा रथ शस्त्रांच्या त्या समूहांतून बाहेर पडला ॥१५॥ त्यानें आपल्या दिव्य धनुष्याचा टणत्कार करून शत्रूंच्या मनांत भय उत्पन्न केलें आणि वायु जसा मेघपटलाला उडवितो, त्याप्रमाणें त्यानें त्या अस्त्रसमूहाला क्षणांत नष्ट करून टाकलें ॥ १६ ॥ त्याच्या धनुष्यापासून सुटलेले तीक्ष्ण बाण, इन्द्राचें वज्र पर्वतांच्या अंगांत जाऊन भिनावें, त्याप्रमाणें, राक्षसांचीं कवचें फाडून त्यांच्या अंगांत घुसले ॥ १७ ॥ त्या वेळीं त्या बाणांमुळें यक्षसैन्यांतील वीरांचीं सुंदर कुंडलयुक्त शिरें तुटून पडलीं, कित्येकांच्या सुवर्णमय तालवृक्षासारख्या मांड्या तुटल्या आणि कित्येकांचे कड्यातोड्यानें सुंदर दिसणारे हात शरिरांपासून वेगळे झाले. त्या वेळीं छिन्नभिन्न झालेले शरिरांचे तुकडे, तसेच मूल्यवान् हार, बाहुभूषणें, मुकुट व इतर शिरोभूषणें इत्यादि अलंकारांनीं तीं समरांगणें आच्छादून गेलीं आणि वीर पुरुषांच्या वृत्ति उचंबळून येतील अशी त्याला शोभा आली ॥ १८ ॥ १९ ॥ क्षत्रियांमध्यें श्रेष्ठ अशा त्या ध्रुवाच्या बाणांनीं हत झालेल्या यक्षगणांतून जे कांहीं अवशिष्ट राहिले, त्यांचेहि अवयव अनेक ठिकाणीं छिन्नविच्छिन्न झाले होते. सिंहाशीं झुंज खेळून घायाळ झालेले हत्ती जसे पळून जातात त्याप्रमाणें ते राक्षसहि रणांगणांतून पळून गेले ॥ २० ॥ अशा रीतीनें त्या मानवश्रेष्ठ ध्रुवाला, हातांत शस्त्र घेऊन युद्धासाठीं सिद्ध असलेला कोणीहि पुरुष जेव्हां त्या समरभूमीवर दिसेनासा झाला, तेव्हां त्याला शत्रूंची नगरी पाहण्याची इच्छा झाली; परंतु मायावी शत्रूंचा पुढें काय करण्याचा बेत आहे, तें कोणा मनुष्याला पूर्वी समजणें शक्य नसतें, म्हणून तो त्या नगरींत गेलाच नाहीं ॥ २१ ॥ ह्या मायावी यक्षांच्या नगरींत प्रवेश करणें बरें नव्हे; अशा प्रकारें चित्रविचित्र रंगांच्या रथांत बसलेला ध्रुव आपल्या सारथ्याला सांगत आहे, तोंच शत्रू पुनः युद्धाचा उद्योग करीत असावे अशी त्याला शंका आली आणि प्रतिकाराच्या प्रयत्नाला तो लागला. इतक्यांत समुद्राच्या गर्जनेसारखा शब्द वाऱ्याबरोबर येऊन त्याच्या कानीं पडला आणि लगेच दाही दिशांकडे धुरळाहि दिसूं लागला ॥२२॥ क्षणमात्रांत आकाश चोहोंकडून मेघपटलानीं आच्छादून गेलें, विजा चमकूं लागल्या आणि भयंकर गडगडाट होऊं लागला ॥२३॥ निष्पाप विदुरा, मग जिकडेतिकडे रक्ताचे प्रवाह, कफ, पू, विष्ठा, मूत्र व मेद यांचा वर्षाव होऊं लागला आणि ध्रुवाच्या पुढें आकाशांतून धडें पडूं लागलीं ॥ २४ ॥ इतक्यांत त्याला अंतराळामध्यें एक पर्वत दिसला व दाही दिशांकडून गदा, परिघ, खड्ग, मुसळें हीं आयुधें पडूं लागून त्यांबरोबर दगडांचाहि वर्षाव होऊं लागला ॥ २५ ॥ विजेप्रमाणें तीव्र श्वास सोडणारे आणि क्रोधामुळें आपल्या नेत्रांनीं जणूं काय अग्निच ओकणारे असे सर्प सर्वत्र धावूं लागले व उन्मत्त हत्ती, सिंह, वाघ यांचेहि कळपचे कळप धावून येऊं लागले ॥ २६ ॥

तसेंच समुद्रानें प्रलयकाळाप्रमाणें उग्र व भयंकर स्वरूप धारण केलें व मोठ्यानें गर्जना करीत पृथ्वीला बुडवीत बुडवीत तो ध्रुवाच्या अगदीं जवळ येऊन ठेपला ॥ २७ ॥ विदुरा, क्रूर कर्में करण्याकडे ज्यांची नेहमींच स्वाभाविक प्रवृत्ति असते, अशा त्या असुरांनीं आपल्या आसुरी मायेच्या योगानें धैर्यहीन पुरुषांना भय उत्पन्न करणारे असे अनेक उत्पात निर्माण केले ॥ २८ ॥ अशा रीतीनें त्या असुरांनीं ध्रुवावर आपल्या दुस्तर मायेचा प्रयोग केलेला पाहून तेथें आलेल्या अनेक ऋषींनीं ध्रुवास कल्याणकारक असा आशीर्वाद दिला ॥ २९ ॥

ते ऋषि म्हणाले—हे ध्रुवा, ज्याचें नांव उच्चारलें असतां किंवा श्रवण केलें असतां दुस्तर अशा मृत्यूला लोक सहज तरून जातात, असा जो भक्तांचें दुःख हरण करणारा भगवान् शार्ङ्गधर * ( शार्ङ्ग धनुष्य धारण करणारा ) श्रीहरि तो तुझ्या शत्रूंचा निःपात करो ! ॥ ३० ॥

---

* **भगवांस्तव शार्ङ्गधन्वा** इत्यादि शब्द उच्चारून ऋषींनीं ध्रुवाला नारायणास्त्राचे स्मरण दिलें असें चक्रवर्ती नामक टीकाकार म्हणतो.

**दहावा अध्याय समाप्त**

# अध्याय ११ वा

मैत्रेयऋषि म्हणतात—विदुरा, याप्रमाणें त्या ऋषींनीं दिलेला आशीर्वाद ऐकून ध्रुवानें आचमन केलें आणि आपल्या धनुष्यावर नारायणास्त्र योजलें. ॥ १ ॥ तें अस्त्र धनुष्यावर योजतांक्षणींच, ज्ञानाचा उदय झाल्याबरोबर दुष्ट नष्ट व्हावे, त्याप्रमाणें यक्षांनीं उभारलेला सारा मायेचा देखावा तत्काळ नाहींसा झाला ॥ २ ॥ सोन्याच्या टोकांनीं व कलहंस पक्ष्यांच्या पिसांनीं युक्त असलेल्या अशा आपल्या बाणांवर नारायणास्त्राची योजना करून जेव्हां ते बाण ध्रुवानें सोडले, तेव्हां ते भयंकर शब्द करीत मोर जसे अरण्यांत घुसतात, त्याप्रमाणें ते शत्रुसैन्यांत घुसले ॥ ३ ॥ त्या तीक्ष्ण बाणांच्या मारानें ते यक्ष सैरावैरा पळूं लागले आणि क्रोधानें संतप्त होत्साते, सर्प जसे फणा उभारून गरुडावर धांवावे, तसे ते आपलीं शस्त्रें सज्ज करून ध्रुवावर धांवून आले. ॥ ४ ॥ पण ते चाल करून आल्यावरोबर ध्रुवानें आपल्या बाणांनीं त्यांचे बाहु, मांड्या, कंठ, पोट इत्यादि अवयव त्या समरांगणावर छिन्नभिन्न केले आणि ब्रह्मचारी सूर्यमंडळाचा भेद करून ज्या श्रेष्ठ लोकांची प्राप्ति करून घेतात, त्या लोकाला त्यानें त्या सर्व गुह्यकांना पाठवून दिलें ! ॥ ५ ॥ याप्रमाणें चित्रविचित्र रथानें युक्त असा ध्रुवराजा गुह्यकांचा नाश करीत आहे, असें पाहून त्याचा आजोबा जो स्वायंभुवमनु त्याला दया आली आणि ऋषींसह तो तेथें येऊन आपल्या नातबाला म्हणाला ॥ ६ ॥

स्वायंभुवमनु म्हणाला—बाळा ध्रुवा, पापी असा हा राग म्हणजे नरकाचें केवळ द्वारच होय. यास्तव ज्यामुळें निरपराधी अशा या गुह्यकांचा तूं वध केलास, तो भयंकर राग आतां पुरे कर ! ॥ ७ ॥ बाळा, या गुह्यकांनीं कांहीं अपराध केला नसतां त्यांचा तूं वध केलास, ही गोष्ट साधूंच्या दृष्टीनें अत्यंत निंद्य असून आपल्या कुळाला मुळींच शोभण्यासारखी नाहीं ॥ ८ ॥ ध्रुवा, भावाविषयीं तुझ्या मनांत फार प्रेम आहे व त्यामुळें त्याचा वध झाला असतां तुला अत्यंत दुःख होऊन त्याचा वध करणाऱ्या एकाच्या अपराधास्तव तूं युद्धामध्यें अनेक गुह्यकांचा वध केलास ! ॥ ९ ॥ बाळा, आत्मा म्हणजे देहच होय, असें मानून पशूप्रमाणें प्राण्यांचा वध करण्याचें क्रूर कर्म करणें, हा परमेश्वराची भक्ति करणाऱ्या साधूंचा मार्ग खरोखरच नव्हे ! ॥ १० ॥ तूं तर, सर्व प्राण्यांच्या अंतर्यामीं वास करणाऱ्या व वश करून घेण्यास कठीण अशा श्रीविष्णूची आराधना करून आणि सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं आपलेपणा ठेवून त्यांच्या सर्वश्रेष्ठ अशा अढळपदाची प्राप्ति करून घेतली आहेस ॥ ११ ॥ अशा रीतीनें श्रीहरीचें नित्य चिंतन करून तूं त्याच्या भक्तांमध्यें अत्यंत मान्यता मिळविलेली आहेस. सज्जनांच्या मार्गाचें अनुकरण करण्यांतच कल्याण आहे असें तूं नेहमीं मानीत असतां, तुझ्या हातून हें निन्द्य कर्म घडलें तरी कसें ? ॥ १२ ॥ हे ध्रुवा, सहनशीलता, दया, मैत्री आणि सर्व

प्राणिमात्रांच्या ठायीं समदृष्टि या गुणांनींच सर्वव्यापी परमेश्वर प्रसन्न होतो ॥ १३ ॥ अशा रीतीनें परमेश्वर प्रसन्न झाला असतां तो पुरुष मायेच्या सत्त्वादि तीन गुणांनीं रहित व जीवोपाधीपासून मुक्त होतो व आत्यंतिक सुखरूपी ब्रह्मपदाला जातो ॥ १४ ॥ सृष्टिकर्त्यासाठीं उत्पन्न केलेल्या पंचमहाभूतांपासून प्रथम स्त्री व पुरुष हीं उत्पन्न होतात व पुढें जगांत त्या दोघांच्या समागमानें इतर स्त्रीपुरुषांची उत्पत्ति होते ॥ १५ ॥ हे ध्रुवा, ह्याप्रमाणें परमेश्वराच्या मायेमुळें होणाऱ्या सत्त्व, रज व तम ह्या त्रिगुणांच्या मिश्रणानें जगाची उत्पत्ति, रक्षण व संहार हीं होत असतात ॥ १६ ॥ पण निर्गुण असा तो श्रेष्ठ परमात्मा त्यांत केवळ निमित्तमात्र आहे. लोहचुंबकाच्या निमित्तानें जसें लोखंड फिरतें, तसें हें सर्व दृश्य व अदृश्य विश्व त्याच्या ठिकाणीं फिरत असतें ॥ १७ ॥ काळाच्या अचाट शक्तीनें त्रिगुणांत जोराचा क्षोभ होतो व त्यामुळें तो परमेश्वर आपलें सामर्थ्य निरनिराळ्या रीतीनें प्रगट करतो म्हणजे वस्तुतः तो कांहीं करणारा नसतांहि हें विश्व निर्माण करतो, स्वतः संहारक नसतांहि त्याचा संहार करतो, असें दाखवितो. ही त्या सर्वशक्तिमान् परमेश्वराची कृति अगदीं अतर्क्य होय ॥ १८ ॥ स्वतः अनादि, अनंत आणि अक्षय असा हा कालस्वरूपी परमात्मा, प्रथम उत्पन्न केलेल्या लोकांकडून पुढील लोकांना निर्माण करवितो, यास्तव हा उत्पत्तिकर्ता होय व त्याचाहि मृत्यूकडूनच नाश करवितो म्हणून त्याला संहारकर्ता असें म्हणतात ॥ १९ ॥ वस्तुतः समभावानें सर्व प्राण्यांत प्रवेश करणाऱ्या मृत्युरूपी श्रेष्ठ परमेश्वराला खरोखर स्वकीय किंवा परकीय कोणी नाहीं; परंतु जसे वाऱ्याबरोबर धुळीचे लोट उठतात त्याप्रमाणें ह्या कालरूपी परमात्म्याच्या मागोमाग धांवत राहून कर्माधीनपणामुळें परतंत्र असे हे प्राणिमात्रांचे समुदाय स्वकर्मानुसार सुखदुःखें भोगीत असतात ॥ २० ॥ कालरूपी परमात्मा आत्मस्वरूपांत नित्य स्थिर असल्यामुळें स्वतः क्षय व वृद्धि यांपासून अलिप्त असतो; परंतु दुष्कर्मांत निमग्न असणाऱ्या प्राण्यांच्या आयुष्याची मात्र तो क्षय व वृद्धि करीत असतो ॥ २१ ॥ हे राजा ध्रुवा, ह्या परमेश्वराला कोणी कर्म म्हणतात, कोणी स्वभाव असें नांव देतात, कोणी हा कालस्वरूपी आहे असें मानतात; कित्येक त्याला दैव म्हणतात व कित्येक पुरुषांचा काम अशा नांवानें त्याला ओळखतात ॥ २२ ॥ बा ध्रुवा, अदृश्य, अतर्क्य आणि नाना शक्तींचें उत्पत्तिस्थान असलेल्या त्या परमात्म्याचा उद्दिष्ट हेतु कोणासहि कळत नाहीं; मग आपण कोणापासून उत्पन्न झालों, त्याचें खरें स्वरूप कोण जाणूं शकेल बरें ? ॥२३॥ हे बाळा ध्रुवा, ह्या कुबेरसेवक यक्षांनीं तुझ्या भावाला मारिलें नाहीं; कारण अरे बाळा, पुरुषांच्या जन्ममृत्यूचें खरें कारण दैव हेंच होय ॥ २४ ॥ तोच परमेश्वर विश्वाची उत्पत्ति, संरक्षण व संहार करीत असतो; तथापि त्याच्या ठायीं अहंकाराचा लेशहि नसल्यामुळें तो गुणकर्मांनीं लिप्त होत नाहीं ॥ २५ ॥ सर्व भूतांचा अंतर्यामी, त्यांचा स्वामी व त्यांची उत्पत्ति करणारा असा हा परमेश्वर आपल्या त्रिगुणात्मक मायेनें युक्त होऊन विश्वाची उत्पत्ति, संरक्षण व संहार करीत असतो ॥ २६ ॥ बा ध्रुवा, नाकांत वेसण घालून जखडलेल्या बैलाप्रमाणें सृष्टि उत्पन्न करणारे प्रजापति देखील ज्याला बळि अर्पण करतात, जो अभक्तांना मृत्युस्वरूप आणि भक्तांना मोक्षदायक आहे, त्या जगाला

आधारभूत अशा दैवस्वरूपी ईश्वराला सर्व प्रकारें तूं शरण जा ! ॥ २७ ॥ तूं केवळ पांच वर्षांचा असतांच तुला सावत्र आईचें भाषण मर्मी झोंबलें व त्यामुळें आपल्या आईला सोडून तूं वनांत गेलास. तेथें तपश्चर्येनें इंद्रियांना अगोचर असणाऱ्या विष्णूची तूं आराधना केलीस आणि त्रैलोक्यांत श्रेष्ठ असें ध्रुवपद मिळविलेंस ॥२८॥ तर हे ध्रुवा, आतां तूं शत्रुमित्रादि भेदभाव मिथ्या आहे असें समजून तो टाकून दे व अभेदबुद्धि मनांत बाळगून निर्गुण, अविनाशी, अद्वितीय व नित्यमुक्त अशा परमात्म्याचा स्वतःच्या अंतःकरणांत शोध कर ! ॥ २९ ॥ अशा रीतीनें तूं आत्म्याच्या ठिकाणीं शोध करूं लागलास म्हणजे प्रत्यगात्मा अनंत, आनंदरूप व षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा भगवंताच्या ठिकाणीं तुझी उत्तम भक्ति हळू-हळू दृढ होईल आणि मी व माझें अशा रीतीनें वाढलेली अज्ञानाची गांठ अगदीं तोडून टाकशील ! ॥ ३० ॥ हे राजा, औषधानें ज्याप्रमाणें रोगाचा विध्वंस करतात त्याप्रमाणें कल्याणाचा कट्टा शत्रु असा जो क्रोध, तो आपल्या ज्ञानाच्या योगानें तूं समूळ नाहींसा कर ! तुझें कल्याण असो ! ॥ ३१ ॥ क्रोधानें पछाडलेल्या पुरुषापासून लोकांना अतिशय भय प्राप्त होतें. यास्तव स्वतः निर्भय होऊं इच्छिणाऱ्या समंजस पुरुषानें त्याला मुळींच थारा देऊं नये ॥ ३२ ॥ आपल्या भावाला यक्षांनीं मारिलें असें समजून क्रोधानें त्या यक्षांचा तूं वध केलास; पण असें करण्यांत शंकराचा परममित्र जो कुबेर त्याची तूं एक प्रकारें अवहेलनाच केली आहेस ! ॥ ३३ ॥ तर हे बाळा, महात्म्यांच्या तेजामुळें आपल्या कुळावर जोंपर्यंत एखादें अरिष्ट ओढवलें नाहीं, तोंपर्यंत नम्रतापूर्वक गोड भाषणांनीं त्या कुबेराला तूं सत्वर प्रसन्न करून घे ! ॥ ३४ ॥ याप्रमाणें स्वायंभुवमनूनें आपला नातू जो ध्रुव त्याला उपदेश केला असतां त्यानें आपल्या आजोबाला नमस्कार केला. नंतर स्वायंभुवमनु ऋषींसहवर्तमान आपल्या नगराला निघून गेला. ॥ ३५ ॥

## अकरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १२ वा

मैत्रेयमुनि म्हणाले,—यक्षांचा वध करण्याचें क्रूर कर्म ध्रुवानें बंद केलेलें पाहून भगवान् कुबेर ध्रुवाकडे आला. त्याला पाहून ध्रुवानें हात जोडले आणि चारण, यक्ष व किन्नर हे स्तुति करीत असतां कुबेर त्याच्याशीं बोलूं लागला ॥ १ ॥

कुबेर म्हणाला,—'हे निष्पाप क्षत्रियपुत्रा ध्रुवा, तूं आपल्या आजोबाच्या आज्ञेप्रमाणें वागून, एकदां केलेलें वैर सोडून देणें कठीण असतांहि, तें तूं सोडलेंस हें पाहून मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें ॥ २ ॥ बा ध्रुवा, खरें पाहिलें तर तूं यक्षांचा वध केला नाहींस आणि यक्षांनींहि तुझ्या भावाचा वध केला नाहीं असें म्हटलें पाहिजे. कारण प्राण्यांच्या जन्ममृत्यूला वास्तविक कारणभूत असा एक काळच होय ॥ ३ ॥ 'मीं–तूं' अशा प्रकारची मनुष्याची भावना खरोखर निरर्थक असून ती केवळ अज्ञानामुळें उत्पन्न झालेली असते. ती केवळ स्वप्नांत पाहिलेल्या देखाव्याप्रमाणें असून परमेश्वरचिंतनाच्या अभावीं तिचा प्रादुर्भाव होतो व तीमुळें बंध आणि मोक्ष या भावना उत्पन्न होतात ॥ ४ ॥ ध्रुवा, यास्तव तूं आतां जा आणि सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं आत्मभाव ठेवून सर्वभूतें हेंच ज्याचें शरीर अशा त्या भगवान् श्रीविष्णूचें भजन कर ! तुझें कल्याण असो ! श्रीविष्णूचे चरण सेवा करण्यास अत्यंत योग्य आहेत. संसाराची तो निवृत्ति करणारा आहे व त्रिगुणात्मक अशा आपल्या मायानामक शक्तीनें तो जसा युक्त आहे, तसा तिच्यापासून तो स्वतंत्रहि आहे; अशा त्या भगवंताची आराधना कर ! त्यायोगें तुला त्याच्या चरणसेवेनें मोक्षप्राप्ति होईल ॥ ५ ॥ ६ ॥ हे राजा ध्रुवा, तुझ्या मनांतून जो कांहीं वर मागावयाचा असेल, तो तूं माझ्याकडून निःशंकपणें मागून घे ! तूं वरदानास सत्पात्र आहेस. अरे, त्या पद्मनाभ श्रीविष्णूचा तूं अत्यंत निकटवर्ती भक्त आहेस, असें आम्हीं ऐकलें आहे ॥ ७ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—याप्रमाणें त्या श्रेष्ठ भगवद्भक्त आणि बुद्धिमान् अशा ध्रुवाला 'वर माग !' म्हणून कुबेरानें सांगितलें असतां 'श्रीहरीचें आपल्याला अखंड स्मरण घडावें' असा वर त्यानें मागितला. कारण श्रीहरीचें स्मरण घडलें असतां दुस्तर अशा अज्ञानांधकाराला मनुष्य सहज तरून जातो ॥ ८ ॥ कुबेरानें ध्रुवाचा इष्ट वर त्याला मोठ्या संतुष्ट अंतःकरणानें दिला आणि ध्रुव पाहात असतांच तो अंतर्धान पावला. नंतर ध्रुवहि आपल्या नगराला निघून आला ॥ ९ ॥ नंतर त्यानें मोठमोठ्या दक्षणा देऊन यज्ञ केले आणि कर्मस्वरूपी व द्रव्य, विधि आणि देवता यांच्या साहाय्यानें केलेल्या कर्मांचें फळ देणारा असा जो यज्ञाधिपति परमेश्वर त्याची आराधना केली ॥ १० ॥

अशा रीतीनें सर्वांच्या अंतर्यामीं पण सर्वांहून वेगळा अशा परमेश्वराच्या ठिकाणीं त्याची तीव्र भक्ति जडल्यामुळें एकच सर्वव्यापी असा परमेश्वर स्वतःच्या हृदयांत

त्याचप्रमाणें सर्व भूतमात्रांत भरून राहिला आहे, असें त्याला दिसूं लागलें ॥ ११ ॥ अत्यंत गोड स्वभाव, ब्राह्मणांचा कैवारी, दीनांवर दया करणारा आणि धर्ममर्यादांचें पालन करणारा इत्यादि गुणांमुळें सर्व लोक ध्रुवराजाला आपला पिताच मानीत असत ॥ १२ ॥ त्यानें नाना प्रकारचे भोग भोगून आपलें पुण्य फेडून * घेतलें आणि यज्ञादि निष्काम कर्में करून पापाचाहि क्षय केला. अशा रीतीनें छत्तीस हजार वर्षें त्यानें या भूमंडळावर राज्य केलें ॥ १३ ॥ त्या महात्मा ध्रुवानें आपल्या इन्द्रियांना विषयांकडे वळूं न देतां अनेक यज्ञ केले व हा काळ म्हणजे धर्म, अर्थ आणि काम यांच्या प्राप्तीचा उपाय आहे अशा समजुतीनेंच तो घालविला. नंतर हें जग म्हणजे परमात्म्याच्या स्वरूपांत केवळ मायेनें उभारलेलें आहे व त्याची वास्तविक योग्यता अज्ञानामुळें स्वप्नांत दिसणाऱ्या देखाव्यापेक्षां किंवा आकाशांत फिरणाऱ्या मेघांच्या रांगांत कल्पनेला दिसणाऱ्या गंधर्वनगराहून अधिक नाहीं, असें त्याला समजून आल्यामुळें आपल्या पुत्राच्या हातीं राज्याचा अधिकार देऊन तो मोकळा झाला ॥ १४ ॥ १५ ॥ स्वतःचें शरीर, स्त्री, पुत्र, मित्र, सैन्य, द्रव्यानें भरलेलें भांडार, अंतःपुर, रमणीय क्रीडास्थानें, सारांश, समुद्रवलयांकित अशी सारी पृथ्वी कालचक्राच्या फेऱ्यांत सांपडलेली आहे, अशी त्याची समजूत पटल्यामुळें त्या सर्वांचा त्याग करून ध्रुवानें बदरिकाश्रमाचा मार्ग धरला ॥ १६ ॥ तेथें गेल्यावर तेथील पवित्र उदकांत स्नान करून त्यानें आपली इंद्रियशुद्धि करून घेतली. मग आसन घालून प्राणायामपूर्वक सर्व इंद्रियांना मनाच्या साहाय्यानें त्यानें विषयांपासून पराङ्मुख केलें आणि त्या मनाची भगवंताच्या विराट् स्वरूपावर धारणा केली. विराट् स्वरूपाचें ध्यान करीत समाधीच्या योगानें ध्याता, ध्येय व ध्यान इत्यादि भेदांचा त्यानें निरास केला आणि शेवटीं त्या स्थूल विराट्स्वरूपाचाहि त्याग केला ॥ १७ ॥ त्याची श्रीहरीच्या ठिकाणीं अतिउत्कट भक्ति जडल्यामुळें त्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं वारंवार भरून जाऊं लागले, हृदय प्रेमलहरींनीं ओलें होऊन उचंबळून येऊं लागलें, अंगावर रोमांच उभे राहूं लागले आणि सर्व बाह्यचिन्हांचा त्याग घडून आला. त्या वेळीं 'हा मी' असें त्याचें भान सर्वस्वीं नाहींसें झालें ॥ १८ ॥ अशा स्थितींत उगवणाऱ्या चंद्राप्रमाणें दाही दिशा तेजःपुंज करीत आकाशांतून खालीं येणारें एक श्रेष्ठ विमान त्याच्या दृष्टीस पडलें ॥ १९ ॥ त्या विमानांत चतुर्भुज, श्यामवर्ण, तरुणवयाचे, रक्तकमलाप्रमाणें सुंदर नेत्र असलेले, सुंदर वस्त्रें परिधान केलेले आणि मस्तकावर मुकुट, गळ्यांत हार, दंडांत बाहुभूषणें व कानांत सुंदर कुंडलें धारण केलेले सुनंद व नंद असे दोन श्रेष्ठ देव आपल्या गदेवर नेट देऊन उभे होते ॥ २० ॥ ते देव पुण्यश्लोक श्रीविष्णूचे सेवक होत असें जाणून ध्रुव त्यांना पाहतांक्षणीं उठून उभा राहिला; पण

---

* पुण्य किंवा पाप यांपैकीं कांहींहि शेष आहे, तोंवर मोक्षप्राप्ति नाहीं. यासाठीं तीं दोन्ही भोगून टाकणें अवश्य आहे, असा जो सिद्धान्त आहे, त्याला अनुलक्षून हा ध्रुवाचा उपक्रम होता.

घाईत पूजेचा क्रम विसरून गेल्यामुळें, हे मधुसूदनाचे मुख्य सेवक होत एवढेंच लक्षांत ठेवून त्यानें हात जोडले व त्यांचीं केवळ नांवें उच्चारूनच त्यांना नमस्कार केला ॥ २१ ॥ याप्रमाणें भगवंताच्या चरणकमलावर मन लावलेल्या त्या ध्रुवानें नम्रपणें मस्तक लववून हात जोडले असतां भगवंताला मान्य असलेले सुनंद आणि नंद नांवांचे ते दोघे पार्षद त्याच्याजवळ गेले आणि मंदहास्यपूर्वक त्याच्याशीं बोलूं लागले ॥ २२ ॥

ते म्हणाले, ' हे राजा ध्रुवा, तुझें अत्यंत कल्याण असो ! आमचें भाषण तूं लक्षपूर्वक ऐक. तूं पांच वर्षांचा असतांनाच आपल्या तपाच्या योगानें ज्या श्रीविष्णूला संतुष्ट केलें, त्या सर्व विश्वाला आधारभूत अशा भगवान् विष्णूचे आम्ही दोघे सेवक असून, तुला त्या भगवंताच्या स्थानीं घेऊन जाण्यासाठीं येथें आलों आहोंत ॥ २३-२४ ॥ ध्रुवा, ज्या श्रेष्ठ पदाची प्राप्ति सप्तर्षींसारख्या ज्ञानी पुरुषांनाहि न झाल्यामुळें ते नुसते त्याकडे पाहात असतात तें दुष्प्राप्य विष्णुपद तूं जिंकलें आहेस; त्याचा तूं आतां उपभोग घे ! त्या पदाभोंवतीं चंद्र, सूर्य, ग्रह, नक्षत्रें, तारा इत्यादि नित्य प्रदक्षिणा करीत असतात ॥२५॥ ध्रुवा, तुझे वाडवडील किंवा दुसरे कोणी यांनाहि ज्या पदाची प्राप्ति केव्हांहि झालेली नाहीं, अशा त्या सर्व त्रैलोक्याला वंदनीय असलेल्या सर्वश्रेष्ठ विष्णुपदाचा तूं उपभोग घे ! ॥ २६ ॥ पुण्यश्लोकांतहि श्रेष्ठ अशा श्रीहरीनें उत्तम विमान तुझ्यासाठींच पाठविलें आहे. हे चिरंजीव ध्रुवा, यावर तूं आतां आरोहण कर ! ' ॥ २७ ॥

मैत्रेय म्हणतात,—विदुरा, याप्रमाणें श्रीविष्णूच्या प्रमुख पार्षदाचें तें अमृतासारखें गोड भाषण श्रवण केल्यावर त्या महाभगवद्भक्त ध्रुवानें स्नान करून आपलें नित्याचें मंगल असें आन्हिक कर्म उरकलें आणि सप्तर्षींना नमस्कार करून त्यांचा आशीर्वाद त्यानें घेतला ॥ २८ ॥ मग त्यानें त्या तेजस्वी व सुवर्णमय अशा श्रेष्ठ विमानाला प्रदक्षिणा करून नमस्कार केला आणि त्या विष्णुपार्षदांनाहि अभिवंदन केल्यावर तो त्या विमानावर चढावयास सिद्ध झाला ॥ २९ ॥ इतक्यांत मृत्यु तेथें येऊन उभा राहिलेला ध्रुवाच्या दृष्टीस पडला. * पण त्याच्या मस्तकावर पाय देऊन ध्रुवानें त्या आश्चर्यकारक विमानावर आरोहण केलें ॥ ३० ॥ तेव्हां आकाशांत देवांनीं दुंदुभि, मृदंग, पणव इत्यादि वाद्यांचा आनंदानें घोष केला, गंधर्वश्रेष्ठ त्याचें यश गाऊं लागले व ध्रुवावर त्यांनीं पुष्पांचा वर्षाव केला ॥ ३१ ॥ अशा रीतीनें स्वर्गावर आरोहण करीत असतां ध्रुवाला आपल्या सुनीति-मातेचें स्मरण झालें आणि त्या आपल्या दीन मातेला घेतल्याशिवाय आपण एकट्यानेंच अढळ अशा विष्णुपदाला कसें जावें, असा विचार त्याच्या मनांत आला ॥ ३२ ॥ त्याच्या मनांत आलेला हा विचार विष्णुपार्षदांना

* ध्रुव सदेह विष्णुपदावर जावयास सिद्ध झाला; परंतु मृत्यूनें मर्त्य शरीर येथेंच ठेवून जाण्यास त्याला सांगितलें. तेव्हां ध्रुव त्याचें न ऐकतां त्याच्या मस्तकावर पाय देऊनच आपल्या मार्गाला लागला, असा टीकाकारांनीं भावार्थ दिला आहे.

तत्काळ समजला आणि त्याची ती चिंता दूर करावी म्हणून, आपल्या पुढें चालत असलेल्या विमानांतून सुनीति स्वर्गास जात आहे, असें त्यांनीं त्याला दाखविलें ॥ ३३ ॥ अशा रीतीनें तो जात असतां वाटेंत ठिकठिकाणीं विमानांत बसलेल्या देवांनीं त्याची स्तुति करून त्याच्यावर पुष्पवर्षाव केला. पुढें क्रमाक्रमानें त्याला बुध, शुक्र, मंगळ, गुरु इत्यादि ग्रहांचें दर्शन घडलें ॥ ३४ ॥ याप्रमाणें विमानांतून मार्ग आक्रमीत असतां तो तिन्ही लोक आणि सप्तर्षींचा प्रांत ओलांडून पलीकडे जें अढळ असें विष्णुपद आहे, त्या पदाला जाऊन पोंचला ॥ ३५ ॥ तें विष्णुपद स्वतःच्या तेजानें तळपत असल्यामुळें तिन्ही लोकांना प्रकाश मिळून त्याची शोभा अत्यंत उज्ज्वल दिसते. प्राणिमात्रावर ज्यांनीं दया केली नाहीं, अशांना या पदाची प्राप्ति केव्हांहि झालेली नाहीं. जे नित्य सत्कृत्यें करण्यांतच व्यग्र असतात, अशाच पुरुषांना तें प्राप्त होतें ॥ ३६ ॥ शांत वृत्तीचे, सर्वत्र समदृष्टि ठेवणारे, शुद्ध अन्तःकरणाचे, प्राणिमात्राला संतोष देणारे आणि परमेश्वर हाच काय तो आपला खरा आवडता बांधव होय असें मानणारे जे पुरुष असतात, त्यांना हें विष्णुपद सहज प्राप्त होणारें आहे ॥ ३७ ॥ असो. विदुरा, याप्रमाणें परमेश्वरावर पूर्ण निष्ठा ठेविल्यामुळें उत्तानपादराजाचा तो ध्रुवनामक पुत्र सर्व त्रैलोक्यामध्यें श्रेष्ठ अशा पदवीला पोंचला ॥ ३८ ॥ विदुरा, खळ्यांतील खांबाभोंवतीं बैलांचा तांडा जसा मोठ्या वेगानें मळणीच्या वेळीं फिरत असतो, त्याप्रमाणें ग्रह, तारे इत्यादि तेजोगोलांचें या ध्रुवाच्या स्थानाभोंवतीं सतत भ्रमण होत असतें ॥ ३९ ॥ ध्रुवाचा हा मोठा पराक्रम पाहून भगवान् नारदऋषीनें प्रचेत्यांच्या यज्ञप्रसंगीं आपली वीणा वाजवून ध्रुवाच्या माहात्म्याचें प्रतिपादन करणाऱ्या या तीन श्लोकांची स्तुति सुरावर गाऊन दाखविली ॥४०॥

नारद म्हणाले,—"पतिव्रता सुनीतीच्या पुत्रानें आपल्या तपःसामर्थ्यानें जी गति प्राप्त करून घेतली, तशी गति प्राप्त करून घेण्याचें ज्यांस ठाऊक आहे अशा वेदवेत्त्या पुरुषांना सुद्धां ती मिळवितां येत नाहीं; मग राज्योपभोगांत दंग झालेल्या राजेलोकांना ती कशी मिळवितां येईल ? ॥ ४१ ॥ हा सुनीतिपुत्र ध्रुव केवळ पांच वर्षांचा असतां सावत्र आईच्या कठोर शब्दांनीं हृदय भेदून गेल्यामुळें दुःखी झाला आणि वनांत जाऊन त्यानें माझ्या सांगण्याप्रमाणें, ज्या परमेश्वराला केवळ त्याच्या भक्तांनाच भक्तीच्या योगानें वश करतां येतें, अशा परमेश्वराला आपलासा करून घेतलें; ॥ ४२ ॥ ध्रुवानें पांच-सहा वर्षांच्या वयाचा असतांना थोड्याच दिवसांत श्रीविष्णूला प्रसन्न करून घेऊन जें पद मिळविलें, तें या भूतलावरील सामान्य क्षत्रियाला कित्येक वर्षांनीं तरी मिळवितां येईल काय ? ॥ ४३ ॥

मैत्रेयमुनि विदुराला म्हणाले,—विदुरा तूं मला अत्यंत कीर्तिमान् अशा ध्रुवाचें सज्जनांना मान्य असें जें चरित्र या ठिकाणीं विचारिलेंस, तें सर्व मी तुला याप्रमाणें सांगितलें आहे. हें ध्रुवाचें चरित्र मनुष्याला कृतकृत्य करून त्याची कीर्ति वाढविणारें आहे. त्याच्या श्रवणानें आयुष्याची वृद्धि होऊन पुण्यप्राप्ति होते. हें चरित्र अत्यंत

कल्याणकारक असून स्वर्गाचीच काय, पण ध्रुवपदाचीहि प्राप्ति करून देणारें आहे. तें पापनाशक असून देवलोकाची प्राप्ति करून देणारें असल्यामुळें त्याची प्रशंसा करावी तितकी थोडीच होईल ।। ४४ ।। ४५ ।। भगवंताला प्रिय झालेल्या ध्रुवाचें हें चरित्र जो कोणी श्रद्धापूर्वक श्रवण करील, त्याची परमेश्वराच्या ठिकाणीं भक्ति जडेल व तिच्या योगानें त्याचे सर्व क्लेश दूर होतील ।। ४६ ।। या चरित्राचें श्रवण केल्यानें मोठेपणाची इच्छा करणारांना पवित्र स्थानाचा लाभ होतो व स्वतः तें ऐकणाराच्या ठिकाणीं उत्तम शील आणि इतर गुण उत्पन्न होतात. तसेंच तेजस्वी होण्याची इच्छा करणारांस त्या श्रवणानें तेजाची प्राप्ति होते आणि थोर अंतःकरणाच्या पुरुषांना त्यामुळें सन्मान मिळतो ।। ४७ ।। प्रतिदिवशीं सकाळीं व संध्याकाळीं मनुष्यानें शुचिर्भूत होऊन पुण्यश्लोक ध्रुवाचें हें श्रेष्ठ चरित्र द्विजांच्या सभेंत वर्णन करावें ।। ४८ ।। तसेंच पौर्णिमा, अमावास्या, द्वादशी, श्रवणनक्षत्र, तिथिक्षयाचा दिवस, व्यतिपात, संक्रांति आणि रविवार अशा विशिष्ट योगावरहि त्याचें पठण करावें ।। ४९ ।। परमेश्वराच्या चरणकमलांचा आश्रय करून पुरुषानें श्रद्धायुक्त लोकांना हें ध्रुवचरित्र निष्कामबुद्धीनें सांगावें. अशा रीतीनें तें सांगितलें असतां तो पुरुष स्वतःच्याच ठिकाणीं स्वतःच्याच योगानें संतुष्ट होतो व त्याला मोक्षसिद्धि प्राप्त होते ।।५०।। परमेश्वरप्राप्तीच्या मार्गातील अमृतरूप ज्ञान या चरित्रांत असल्यामुळें, ज्ञानतत्त्व ज्याला कळलेलें नाहीं अशांना जो कोणी हें सांगेल, तो दीनांवर दया करणारा होय, असें जाणून देव त्याच्यावर कृपा करतात ।।५१।। विदुरा, जो ध्रुव केवळ बालवयांत असतां आपल्या आवडत्या खेळण्यांचा आणि मातृगृहाचा त्याग करून श्रीविष्णूला शरण गेला, अशा त्या अत्यंत शुद्ध वर्तनाच्या कीर्तिमान् ध्रुवाचें हें चरित्र मीं तुला सांगितलें ।। ५२ ।।

**बारावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १३ वा

सूत शौनकऋषींना म्हणतात, मैत्रेयानें सांगितलेला ध्रुवाच्या विष्णुपदारोहणाचा इतिहास ऐकून विदुराच्या मनांतील श्रीविष्णुविषयींची भक्ति अधिकच दृढ झाली आणि तो मैत्रेयाला आणखी प्रश्न विचारूं लागला ॥ १ ॥

विदुर म्हणाला—मैत्रेयमुने, प्रचेते म्हणून जे तुम्ही आतां सांगितले ते कोण होते, कोणाचे पुत्र होते, कोणत्या वंशांत ते प्रसिद्धीस आले आणि त्यांनीं यज्ञ केला तो कोठें, हें सर्व जाणण्याची इच्छा आहे ॥ २ ॥ महान् भगवद्भक्त नारदाचें दर्शन तर केवळ परमेश्वरासारखेंच मला वाटतें. त्यानें श्रीहरीच्या पूजनाचा विधि ज्यांत आहे असा भक्तियोग उत्तम रीतीनें सांगितला आहे ॥३॥ आपल्या धर्माचें उत्तम रीतीनें पालन करणाऱ्या त्या प्रचेत्यांनीं भगवान् यज्ञपुरुषाचें पूजन केलें, तेव्हां भगवद्भक्त नारदानें त्या भगवंताचें तेथें यशोगायन केलें, असें म्हणतात ॥ ४ ॥ त्या देवर्षीनें प्रचेत्यांच्या यज्ञांत जाऊन भगवंताच्या ज्या कथा गायिल्या, त्या ऐकण्याची माझी इच्छा आहे. मुने, यास्तव त्या सर्व कथा तुम्ही मला सांगा ! ॥ ५ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, ध्रुवाचा उत्कल नांवाचा जो पुत्र होता त्यानें आपला पिता वनांत गेल्यावर त्याची सार्वभौम राज्यलक्ष्मी व सिंहासन हीं स्वीकारण्याची इच्छा केली नाहीं ॥ ६ ॥ तो जन्मतःच शांतवृत्तीचा, वैराग्यशील आणि सर्वांठायीं समदृष्टि ठेवणारा होता. या सर्व विश्वामध्यें आत्मस्वरूप व्यापून राहिलें आहे आणि त्या आत्मस्वरूपांतच सर्व लोक पसरलेले आहेत अशी त्याची भावना झाली होती ॥ ७ ॥ ज्यामध्यें सर्व प्रकारच्या देहांचा लय होतो, तें सुखस्वरूप, ज्ञानरसमय, आनंदरूप, सर्वत्र व्यापून राहिलेलें, सर्वांचें मूलस्वरूप असें ब्रह्म आपणच आहों हें त्यानें जाणलें होतें. सतत योगाभ्यासानें आपले कर्मदोष आणि वासना यांना त्यानें दग्ध केलें होतें, त्यामुळें ब्रह्मस्वरूप आपल्याहून कांहीं निराळें नाहीं, अशी त्याची दृष्टि झाली होती ॥ ८ ॥ ९ ॥ सामान्य लोकांची व्यवहारासंबंधानें जशी बुद्धि असते तशी त्याची नसल्यामुळें तो बुद्धिहीन, दृष्टिहीन, बहिरा, मुका किंवा उन्मत्त आहे, असें अज्ञ लोकांच्या दृष्टीला दिसे; परंतु ज्वाळा नष्ट झालेल्या अग्नीप्रमाणें न दिसणारा असा तो ज्ञानी होता ॥ १० ॥ तो बुद्धिहीन किंवा उन्मत्त आहे असें वाटल्यामुळें कुलीन आणि वृद्ध पुरुषांनीं मंत्रिमंडळाच्या संमतीनें वत्सराला राज्याभिषेक केला. हा वत्स ध्रुवाच्या भ्रमिनामक पत्नीचा धाकटा पुत्र होय ॥ ११ ॥ या वत्सराची ' स्वर्वीथि ' नांवाची पत्नी होती. तिला पुष्पार्ण, तिग्मकेतु, इष, ऊर्ज, वसु आणि जय असे सहा पुत्र झाले ॥ १२ ॥ त्यांपैकीं पुष्पार्णाला प्रभा आणि दोषा अशा दोन स्त्रिया असून प्रभेच्या पोटीं त्याला प्रातर, मध्यंदिन आणि सायं असे तीन पुत्र झाले ॥ १३ ॥ आणि दोषेच्या पोटीं

प्रदोष, निशिथ आणि व्युष्ट असे तीन पुत्र झाले. त्यांत पुढें व्युष्टनामक पुत्राला त्याच्या पुष्करिणीनामक स्त्रीपासून सर्वतेजस् नांवाचा मुलगा झाला ॥ १४॥ सर्वतेजसाला आपल्या आकूतिनामक पत्नीपासून चक्षु नांवाचा मुलगा झाला. हा दुसरा मनु होय. मनूची नड्वला नांवाची पट्टराणी होती व तिला पुरु, कुत्स, त्रित, द्युम्न, सत्यवान्, ऋत, व्रत, अग्निष्टोम, अतिरात्र, प्रद्युम्न, शिबि व उल्मुक असे निष्पाप पुत्र झाले ॥ १५ ॥ १६ ॥ त्यांतील उल्मुकाला पुष्करिणीनामक पत्नीच्या ठिकाणीं अंग, सुमनस, ख्याति, क्रतु, अंगिरस आणि गय हे सहा पुत्र झाले ॥ १७ ॥ उल्मुकपुत्र अंगाची सुनीथा नांवाची पत्नी होती. तिला वेन नावाचा क्रूर स्वभावाचा मुलगा झाला. या वेनाच्या दुष्ट स्वभावामुळें अंगराजाला फार खेद झाला आणि राज्य सोडून तो आपल्या राजधानींतून निघून गेला ! ॥ १८ ॥ विदुरा, पुढें वज्राप्रमाणें तीक्ष्ण वाणी असलेल्या ऋषींना त्या वेनाचा राग येऊन त्यांनीं त्याला शाप दिला, त्यामुळें तो गतप्राण झाला. तेव्हां ऋषींनीं त्याच्या उजव्या हाताचें मंथन केलें ॥१९ ॥ कारण त्या वेळीं त्या राज्यांत राजा नाहींसा झाल्यामुळें चोरांपासून लोकांना त्रास होऊं लागला होता. त्या मंथनानें श्रीविष्णूच्या अंशापासून पृथु नांवाचा पहिला राजा उत्पन्न झाला ॥ २० ॥

विदुर म्हणाला,—हे मैत्रेयमुने, राजर्षि अंगराजा तर अत्यंत सुस्वभावाचा, सज्जन, ब्राह्मणांचें रक्षण करणारा आणि थोर मनाचा असतां, पुत्राच्या दुर्गुणामुळें खिन्नांन्तःकरणानें तो नगर सोडून कां गेला ? इतकी दुष्ट स्वभावाची संतति त्याला कशी झाली ? ॥ २१ ॥ तसेंच, धर्माचें उत्तम ज्ञान असलेल्या ऋषींनीं लोकशासनाचें व्रत धारण केलेल्या वेनराजावर शापाचा जो प्रयोग केला तो त्याच्या कोणत्या दुष्कर्मामुळें केला बरें ? ॥ २२ ॥ खरें पाहिलें तर राजा म्हणजे आपल्या तेजानें अष्ट दिग्पाळ देवांचें बळ धारण करणारा असल्यामुळें, त्यानें कांहीं पाप केलें तरी लोकांनीं त्याची अवहेलना करणें उचित नव्हे ॥ २३ ॥ तरी, हे मैत्रेयमुने, सुनीथापुत्र वेनाचें हें चरित्र तुम्हीं मला सांगा. भक्तिपूर्वक श्रद्धायुक्त मनानें मला तें ऐकण्याची इच्छा आहे; कारण तुम्हांला भूतभविष्य सर्व गोष्टींचें उत्तम ज्ञान आहे ॥ २४ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, राजर्षि अंगानें अश्वमेध नांवाचा मोठा यज्ञ आरंभिला. त्या वेळीं ब्रह्मवेत्त्या ऋत्विजांनीं देवतांचें आवाहन केलें असतां कोणीहि देवता तेथें आल्या नाहींत ॥ २५ ॥ तेव्हां ऋत्विजांना मोठें आश्चर्य वाटलें आणि ते यजमानाला म्हणाले, 'राजा, आम्हीं देवतांचें आवाहन करून त्यांना जीं हविर्द्रव्यें अर्पण करीत आहोंत, त्यांचा त्या देवता स्वीकारच करीत नाहींत ! ॥ २६ ॥ राजा, हीं हविर्द्रव्यें तूं मोठ्या श्रद्धेनें संपादन केलेलीं असून त्यांत दोष कांहीं दिसत नाहीं. तसेंच आम्हीं यज्ञकर्माचें व्रत घेऊन ज्या वेदमंत्रांचा विनियोग केला ते मंत्रहि तेजोहीन झालेले नाहींत ॥ २७ ॥ असें असतांहि यज्ञकर्माचे साक्षीभूत असे हे देव आपापले हविर्भाग घेत नाहींत, त्याचें कांहींच कारण आम्हांला समजत नाहीं. देवतांची अवहेलना तर मुळींच

कोठें झालेली दिसून येत नाहीं ' ॥ २८ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, ऋत्विज ब्राह्मणांचे हे शब्द ऐकून यज्ञाची दीक्षा घेतलेल्या अंगराजाचें मन खिन्न झालें व देवांनीं हविर्भाग न घेण्याचें कारण काय असावें, तें त्यांची अनुज्ञा घेऊन तो त्यांना विचारूं लागला ॥ २९ ॥ तो म्हणाला, ' हे सदस्यपति हो, देवतांचें आवाहन केलें असतां त्या येत नाहींत आणि सोमपात्राचा स्वीकार करीत नाहींत; तेव्हां त्यांनीं असें करण्यासारखें माझ्या हातून निंद्य कर्म तरी कोणतें घडलें ? ॥ ३० ॥ सदस्यपति ऋत्विज म्हणाले,—राजा, तुझें या जन्माचें तर पाप कांहीं दिसत नाहीं. तथापि तुला संतति नाहीं, हें एक पूर्वजन्मींचें पाप मात्र आहे ॥ ३१ ॥ यास्तव आपल्याला उत्तम संतति होईल असा कांहीं उपाय तूं कर ! संततीच्या इच्छेनें यज्ञभोक्त्या श्रीहरीचें तूं पूजन केल्यास तो तुला पुत्र देईल यांत संशय नाहीं ॥ ३२ ॥ तसें झालें म्हणजे यज्ञांत आपण दिलेल्या हविर्भागांचा देव स्वीकार करतील. संततीसाठीं प्रत्यक्ष श्रीहरीची प्रार्थना केली असतां देवहि कां अनुकूल होणार नाहींत ? ॥ ३३ ॥ मनुष्याला ज्या ज्या इच्छा असतील, त्या सर्व श्रीहरि पूर्ण करील. त्या हरीची ज्या ज्या मानानें आराधना करावी त्या त्याप्रमाणें मनुष्याला फलप्राप्ति होत असते ॥ ३४ ॥

याप्रमाणें राजाला संतति व्हावी म्हणून श्रीहरीची आराधना करण्याचा ब्राह्मणांनीं निश्चय केला आणि शिपिविष्ट अशा विष्णूला पुरोडाश अर्पण केला ॥ ३५ ॥ तेव्हां त्या पुरोडाशापासून सुवर्णाच्या माळा आणि स्वच्छ वस्त्र परिधान केलेला एक पुरुष उत्पन्न झाला. त्यांच्या हातांत सुवर्णाचें पात्र असून त्यांत दुधाची खीर शिजवून सिद्ध करून त्यानें आणिली होती ॥ ३६ ॥ त्या पुरुषाच्या हातांतील ती तांदुळांची खीर राजानें ब्राह्मणांच्य अनुमतीनें घेतली आणि आनंदित मानानें तिचा वास घेऊन ती त्या थोर मनाच्या राजानें आपल्या पत्नीला दिली ॥ ३७ ॥ पुरुषसंतति देणारी ती खीर त्या राणीनें प्राशन केली. आणि त्यामुळें योग्य काळीं तिला पतीपासून गर्भधारणा झाली. नंतर अवश्य तो काळ गेल्यावर तिला पुत्र झाला व अशा रीतीनें संततिहीन असलेली राणी पुत्रवती झाली ॥ ३८ ॥ तो पुत्र लहान असतांहि थोराड दिसे आणि अधर्माचा पुत्र जो मृत्यु, तो त्याचा आजोबा असल्यामुळें त्याच्याच वळणावर जाऊन तो अंगराजाचा पुत्र अगदीं धर्महीन झाला ॥ ३९ ॥ तो धनुष्यबाण घेऊन अरण्यांत फिरे आणि तेथें मृगया करीत दीनदुबळ्या पशूंचा क्रूरपणें वध करी. त्याचा क्रूरपणा पाहून, तो दिसतांच, ' आला रे आला वेन ! ' असें लोक भिऊन ओरडूं लागत ॥ ४० ॥ आपल्या समवयस्क मुलांशीं खेळत असतां तो क्रूर राजपुत्र त्यांनाहि अत्यंत दुष्टपणानें पशूंप्रमाणें मारीत असे * ॥ ४१ ॥ आपला पुत्र असा दुष्ट निघाला हें पाहून राजानें त्याला अनेक प्रकारच्या शिक्षा केल्या; पण कांहीं केलें तरी त्याला ताळ्यावर आणितां येत नाहीं

* रामायणांत सगरराजाचा असमंजस नांवाचा असाच दुष्ट पुत्र सांगितला आहे.

असें जेव्हां त्याला आढळून आलें तेव्हां त्याचें मन फारच कष्टी झालें ॥ ४२ ॥ तो मनांत म्हणूं लागला, " ज्या गृहस्थाश्रमी पुरुषांना संतति नाहीं, त्यांनीं खरोखरच देवाची आराधना केली असली पाहिजे ! कारण त्यांना दुष्ट संततीपासून होणारें दारुण दुःख प्राप्त होत नाहीं ॥ ४३ ॥ दुष्ट संततीमुळें पुरुषाची दुष्कीर्ति होते व त्याच्या हातून मोठा अधर्म घडतो. त्याला सर्वजण निरोध करूं लागतात आणि त्यामुळें त्याच्या दुःखाला पारच राहत नाहीं ॥ ४४ ॥ असें असल्यामुळें आपल्याला मोह घालून बंध उत्पन्न करणारें हें संततिरूप संकट कोणता सुज्ञ पुरुष चांगलें मानील ? अशा संततीमुळें घर म्हणजे क्लेशांचें स्थान होऊन बसतें ॥ ४५ ॥ पण दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें तर चांगल्या संततीपेक्षां दुःखाचें मूळ अशी दुष्ट संततीच श्रेष्ठ समजली पाहिजे. कारण क्लेशांचें आगर असलेलें घरदार अशा संततीमुळें सोडून देऊन मनुष्य वैराग्यशील होतो ॥ ४६ ॥ याप्रमाणें अंगराजाचें मन खिन्न झालें असतां त्याला झोपहि येईना. त्यामुळें एके दिवशीं रात्रौ तो उठला आणि मोठमोठ्या विभूतींचें जन्मस्थान अशा आपल्या घरांतून निघाला व कोणी मनुष्य आपल्याला पाहात नाहीं असें दिसल्यावर निद्रिस्त असलेल्या वेनमाता सुनीथाराणीला सोडून तो तेथून चालता झाला ॥ ४७ ॥ आपला राजा खिन्न होऊन निघून गेलेला पाहतांच पुरोहित, प्रधानमंडळ, दुसरे अधिकारी, मित्र इत्यादि सर्व लोकांनीं फार शोक केला आणि व्याकुळ होऊन,—चांगलें योगसाधन करतां न येणारे पुरुष जसे हृदयांत गुप्त असलेल्या परमात्म्याला व्यर्थ शोधीत असतात, त्याप्रमाणें—त्यांनीं त्या राजाचा सर्व पृथ्वीभर शोध केला ॥ ४८ ॥ विदुरा, पण त्या राजाचा मागमूस त्यांना कोठेंहि लागला नाहीं. तेव्हां निराश होऊन ते राजधानीस परत आले आणि तेथें जमलेल्या ऋषींना वंदन करून 'आमचे महाराज नष्ट झाले !' असें डोळ्यांत आसवें आणून त्यांनीं सांगितलें ॥ ४९ ॥

**तेरावा अध्याय समाप्त**

# अध्याय १४ वा

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, अंगराजा याप्रमाणें नाहींसा झाला असतां लोकांचें रक्षण करणारा कोणी नाहीं असें पाहून, लोकांचें कल्याण इच्छिणाऱ्या भृगु आदिकरून ऋषींना राष्ट्राला पशुसमाजासारखी स्थिति आली असें वाटलें ॥ १ ॥ तेव्हां त्या वेदमार्गानें जाणाऱ्या ऋषींनीं त्या शूर वेनाच्या सुनीथानामक मातेला बोलाविलें आणि प्रजांना जरी वेन प्रिय नव्हता तरी त्याला राज्याभिषेक केला ॥ २ ॥ वेनाला राज्यपद मिळाल्यावर तो फार कडक शासन करणारा आहे असें चोर आदिकरून दुष्टांना समजल्यामुळें, उंदीर सर्पाला भिऊन जसे लपून बसतात, तसे ते सारे लपून बसले ॥ ३ ॥ राज्यावर बसल्यामुळें आठ लोकपालांचें ऐश्वर्य वेनाला प्राप्त झालें व त्यामुळें तो अत्यंत गर्विष्ठ झाला व स्वतःला फार मोठा समजून तो थोर थोर ज्ञानी पुरुषांची अवहेलना करूं लागला ॥ ४ ॥ जसा एखादा मदोन्मत्त हत्ती मदानें सर्व मस्तक भरून गेल्यामुळें अंकुशाच्या टोंचणीलाहि जुमानीत नाहींसा होतो, तसा तो वेनराजा उन्मत्त झाला आणि रथांत बसून पृथ्वी व अंतराळ या दोन्ही ठिकाणांना जणूं कंप उत्पन्न करीत सर्वत्र फिरूं लागला ॥५॥ त्यानें जिकडे तिकडे नगाऱ्याच्या घोषांत सर्व ब्राह्मणांना धर्माचरण करण्याची प्रसिद्धपणें बंदी केली. ‘ हे ब्राह्मण हो, तुम्ही कोठेंहि यज्ञ करतां कामा नये, दान देतां कामा नये किंवा देवांना उद्देशून हविर्भागहि देतां कामा नये !’ अशी त्यानें सर्वत्र दंवडी पिटविली ॥ ६ ॥ याप्रमाणें त्या दुराचारी वेनराजाचें कृत्य पाहून लोकांवर मोठें संकट आलें असें ऋषींना वाटलें आणि त्यांना चिंता उत्पन्न झाली. ते सर्व एकत्र जमले आणि आपसांत विचार करूं लागले ॥ ७ ॥ ते म्हणाले, “ लोकांवर दोहोंकडून मोठें संकट ओढवलें आहे. लांकूड दोन्ही टोकांकडून पेटूं लागलें असतां मध्यें सांपडलेल्या किडी–मुंग्यांची जी अवस्था होते, तशी एकीकडून दुष्ट चोर आणि दुसरीकडून स्वतः राजा यांच्यामध्यें सांपडून लोकांची स्थिति बिकट झाली आहे ॥ ८ ॥ कोणी राजा नसला म्हणजे राष्ट्राला भय उत्पन्न होतें, हें जाणून आम्हीं या वेनाला, तो अयोग्य असतांहि राजा केलें आणि तोच तर आतां भय दाखवूं लागला. तेव्हां या लोकांना सुख कसें मिळावें ? ॥ ९ ॥ अहो, दूध पाजून सर्पाचें पोषण करणें जसें पोषकाला घातक होतें, त्याप्रमाणें स्वभावतःच दुष्ट असलेला हा सुनीथाराणीचा पुत्र वेन आम्हांला घातक झाला आहे ! ॥ १० ॥ याला आम्हीं राजा केलें तो हाच मुळीं प्रजेचा घात करण्यास प्रवृत्त झाला आहे. तथापि त्याच्या पापाचा संपर्क आम्हांला लागूं नये यासाठीं याला कांहीं सामोपचाराच्या गोष्टी सांगून पाहूं या ! ॥ ११ ॥ दुष्ट आचरणाचा आहे हें ठाऊक असतांहि आम्ही ज्या अर्थी या वेनाला राज्यावर बसविलें, त्या अर्थी प्रथम सामोपचाराचा उपयोग करून पाहूं आणि तसें केल्यावरहि अधर्माचीच कास धरून जर तो आमचें म्हणणें ऐकणार नाहीं, तर

आधींच लोकांच्या तळतळाटानें जळून गेलेल्या त्याला आपण आपल्या तेजानें जाळून टाकूं!" ॥ १२ ॥ याप्रमाणें त्या ऋषींनीं आपला राग आवरून ठराव केला आणि त्याप्रमाणें वेनाकडे जाऊन त्यांनीं त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला व सामोपचाराच्या चार गोष्टी सांगितल्या ॥ १३ ॥

ते ऋषि म्हणाले,—"महाराज, आम्ही आपल्याला विनंतिपूर्वक एक गोष्ट सांगणार आहों, ती आपण ऐकावी. महाराज, ती गोष्ट आपलें आयुष्य, संपत्ति, सामर्थ्य आणि कीर्ति यांची वृद्धि करणारी आहे ॥ १४ ॥ महाराज, मनुष्यांनीं धर्माचें आचरण जर काया, वाचा, मन आणि बुद्धि यांच्या योगानें खरोखर केलें, तर त्यामुळें त्यांना शोकरहित अशा लोकांची तशीच वैराग्यशील पुरुषांना प्राप्त होणाऱ्या अनंतसुखस्वरूपी मोक्षाचीहि प्राप्ति होते ॥ १५ ॥ हे शूर राजा, प्रजेचें कल्याण करणें हा जो तुझा धर्म, तो तूं नष्ट होऊं देऊं नकोस! कारण तो नष्ट झाला असतां राजा आपल्या ऐश्वर्यापासून च्युत होतो ॥ १६ ॥ राजा, दुष्ट अधिकाऱ्यांपासून, तसेंच चोरादिकांपासून प्रजेचें जो रक्षण करितो आणि लोकांच्या शक्तीप्रमाणेंच त्यांच्यापासून जो करभार घेतो, त्या राजाला या लोकीं तशीच परलोकींहि सुखाची प्राप्ति होते ॥ १७ ॥ हे भाग्यशाली राजा, वर्ण आणि आश्रम या व्यवस्थेनें बद्ध झालेले लोक ज्या राजाच्या राज्यामध्यें आपआपल्या धर्मानें वागून भगवान् यज्ञनारायणाची पूजा करितात, तो राजा आपण घालून दिलेल्या धर्ममर्यादांचें पालन करितो असें पाहून, त्याच्यावर सर्व प्राणिमात्रांचा हितकर्ता असा जो भगवान् श्रीहरि तो संतुष्ट होतो ॥ १८ ॥ १९ ॥ सर्व विश्वाचा स्वामी असा परमेश्वर संतुष्ट झाला असतां मनुष्याला प्राप्त होणार नाहीं असें काय आहे बरें? कारण अष्टदिग्पालांसह सर्व लोक त्या परमेश्वराला आदरपूर्वक पूजा अर्पण करीत असतात ॥ २० ॥ तेव्हां सर्व देव, सर्व लोक व सर्व यज्ञ यांचा संग्रहच असा जो वेदत्रयस्वरूपी, द्रव्यस्वरूपी आणि तपःस्वरूपी परमेश्वर त्याची नानाविध यज्ञांनीं पूजा करून तुझें कल्याण करणारे जे हे तुझ्या राज्यांतील द्विज आहेत त्यांना, हे राजा, तूं अनुकूल असावें हेंच योग्य आहे ॥ २१ ॥ हे शूर राजा, तुझ्या राज्यामध्यें द्विज लोक श्रीहरीचे अंशभूत जे देव त्यांची उत्तम रीतीनें पूजा करितात आणि तीमुळें ते देव संतुष्ट होऊन त्यांच्या इच्छा पूर्ण करितात. यास्तव त्यांची अवहेलना करणें अनुचित होय!" ॥ २२ ॥

ऋषींचें हें भाषण ऐकून वेनराजा म्हणाला,—'हे ऋषि हो, तुम्ही किती हो मूर्ख आहां! तुम्ही आपलें पालनपोषण करणाऱ्या राजाला सोडून व्यभिचारी अशा दुसऱ्या कोणाला तरी स्वामी समजून त्याची उपासना करतां, खरोखर अधर्मालाच धर्म समजतां! ॥ २३ ॥ हे मूर्ख लोक, राजरूपी परमेश्वराची अवज्ञा करीत आहेत, त्यामुळें या लोकीं तसेंच परलोकींहि त्यांचें मुळींच कल्याण होणार नाहीं! ॥ २४ ॥ पतीवर प्रेम करणें दूर ठेवून जारावर प्रेम करणाऱ्या व्यभिचारिणी स्त्रियांप्रमाणें तुम्ही ज्याची एवढी मोठी भक्ति करतां तो यज्ञपुरुष म्हणजे आहे तरी कोण? ॥ २५ ॥ कारण विष्णु, ब्रह्मदेव,

शंकर, इन्द्र, वायु, यम, सूर्य, पर्जन्य, कुबेर, सोम, पृथ्वी, अग्नि, वरुण हे आणि इतरहि वर देण्यास व शाप देण्यास समर्थ असलेले जे देव ते तर राजाच्याच शरिरांत असतात आणि म्हणूनच राजा सर्व देवांनीं युक्त असतो असें म्हणतात. ॥ २६ ॥ २७ ॥ यास्तव, हे ब्राह्मण हो, तुम्ही माझा द्वेष करण्याचें सोडून द्या आणि यज्ञादि कर्में करून माझेंच पूजन करा ! माझ्याशिवाय भोग स्वीकारण्याचा अग्रमान ज्याला मिळावा असा पुरुष आहे तरी कोण ? म्हणून तुम्ही मला करभार आणून द्या !' ॥ २८ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, त्या अत्यंत पापी व दुराचारी वेनाची ऋषींनीं प्रार्थना केली असतांहि त्याची बुद्धि अशी उलटी झाल्यामुळें व त्याचा उत्कर्षकालहि संपुष्टांत आला असल्यामुळें, त्यानें त्या प्रार्थनेकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. ॥ २९ ॥ विदुरा, असा जेव्हां स्वतःला विद्वान् समजणाऱ्या त्या वेनानें ऋषींचा अपमान केला, तेव्हां आपली कल्याणप्रद अशीहि मागणी त्यानें नाकारलेली पाहून ते त्याच्यावर संतापून गेले ॥ ३० ॥ ते म्हणूं लागले,—"हा पापी राजा स्वभावतःच दुष्ट आहे. तेव्हां याचा अवश्य वध केला पाहिजे; कारण याला जर जिवंत ठेवलें, तर हा लवकरच जगाला जाळून भस्म करील ! ॥ ३१ ॥ हा वेन अत्यंत निर्लज्ज असून यज्ञाधिपति श्रीविष्णूची ज्या अर्थी निंदा करतो, त्या अर्थी हा दुष्ट राजसिंहासनावर बसण्यास योग्य नाहीं ! ॥ ३२ ॥ ज्या भगवंताच्या कृपेनेंच अशा प्रकारचें ऐश्वर्य प्राप्त होतें त्याची या हतभागी वेनाशिवाय दुसरा कोण बरें निंदा करील ? ॥ ३३ ॥ याप्रमाणें ऋषींचा राग वाढून ते वेनाचा वध करण्यास सिद्ध झाले आणि विष्णूच्या निंदेमुळें आधींच मृतप्राय झालेल्या त्याला त्यांनीं हुंकारांनीं ठार केलें ॥ ३४ ॥ एवढें केल्यावर ते ऋषि आपआपल्या आश्रमांत निघून गेले असतां पुत्राच्या वधामुळें दुःखित झालेल्या सुनीथाराणीनें त्याचें मृत शरीर औषधींचा प्रयोग करून जपून ठेविलें ॥ ३५ ॥ नंतर एके दिवशीं सरस्वतीच्या पाण्यांत स्नान करून आणि अग्नीला हविर्भाग अर्पण करून ते ऋषि नदीकाठीं भगवंताच्या कथा सांगत बसले असतां ॥ ३६ ॥ लोकांना अत्यंत भीति उत्पन्न करणारे मोठमोठे उत्पात होत असलेले त्यांना दिसून आले. ते पाहून ते म्हणाले, "या पृथ्वीला कोणी रक्षक नसल्यामुळें चोरादिकांपासून तिला कांहीं संकट तर प्राप्त होणार नाहीं ना ? ॥ ३७ ॥ ते आपसांत असें बोलून विचार करीत आहेत, तों चोहोंकडून चोर चोऱ्या करीत धांवत येत आहेत व त्यांच्या धांवण्यामुळें जिकडे तिकडे पुष्कळच धूळ उडत आहे, असें त्यांना आढळलें ॥ ३८ ॥ लोकांचें द्रव्य चोरून चोर त्यांना उपद्रव देत आहेत आणि राजा नष्ट झाल्यामुळें दुर्जन एकमेकांना मारीत आहेत असें त्यांना दिसलें ॥ ३९ ॥ अशा रीतीनें राजाच्या अभावीं तें राष्ट्र चोरांचा सुळसुळाट होऊन दुर्बळ झालें. तथापि ती भयंकर स्थिति पाहूनहि चोर आदिकरून दुर्जन लोकांचें निवारण करण्यास समर्थ असलेले पुरुष ते निवारण करण्यास पुढें येत ना ॥ ४० ॥ पण समदृष्टि आणि शांतचित्त असा ब्राह्मण जर दीनदुबळ्या लोकांना पीडा होत असतां त्यांची उपेक्षा करील, तर फुटक्या भांड्यांतून जसें पाणी निचरून जातें, तसें त्या ब्राह्मणाचें ब्रह्मतेजहि नष्ट होतें, ही गोष्ट

ऋषींच्या लक्षांत आली आणि ‘ अंगराजाचा हा वंश नष्ट होणें उचित नाहीं. या वंशांतील राजे परमेश्वराचा आश्रय करणारे असल्यामुळें त्यांचें वीर्य कधींहि वृथा जाणारें नाहीं ’ असा निश्चित विचार करून त्यांनीं वेनराजाच्या मृत शरिराच्या मांडीचें वेगानें मंथन केलें व त्या मंथनाच्या योगानें एक ठेंगू पुरुष उत्पन्न झाला ॥ ४१ ॥ ४२ ॥ ॥ ४३ ॥

तो पुरुष कावळ्याप्रमाणें काळ्या वर्णाचा, अतिशय आंखूड अवयवांचा, आंखूड हातांचा आणि तशाच आंखूड पायांचा असून त्याची हनुवटी लांब होती, नाक चपटें होतें आणि डोळे लाल असून, केंसहि तांबूस रंगाचे होते ॥ ४४ ॥ तो ठेंगू पुरुष ऋषींपुढें नम्र होऊन दीनपणें ‘ मीं काय करूं ? ’ असें म्हणाला असतां ऋषींनीं त्याला ‘ बा वत्सा, निषीद (बस) ! ’ असें सांगितलें. विदुरा, ‘ निषीद ’ असें म्हटल्यामुळें तो निषाद या नांवानें पुढें प्रसिद्ध झाला ॥४५॥ या ठेंगू पुरुषानें जन्मास येत असतां भयंकर असें वेनाचें पाप हरण केलें होतें, त्यामुळें तो पापरूप झाला होता. त्याच्या वंशांत उत्पन्न झालेले पुरुष नैषाद या नांवानें प्रसिद्ध असून ते पर्वत व अरण्यें यांत राहतात ॥ ४६ ॥

**चौदावा अध्याय समाप्त**

# अध्याय १५ वा

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, मग ऋषींनीं पुनः त्या निपुत्रिक वेनराजाच्या बाहूंचें मंथन केलें, तेव्हां त्यांच्यापासून एक पुरुष आणि एक स्त्री असा जोडा उत्पन्न झाला ॥ १ ॥ त्या स्त्रीपुरुषांना उत्पन्न झालेलीं पाहून ते वेदवेत्ते ऋषि फार आनंदित झाले आणि हीं स्त्रीपुरुष म्हणजे भगवंताचे अंशावतार होत हें जाणून ते त्यांचें वर्णन करूं लागले ॥ २ ॥

ऋषि म्हणाले,—" हा पुरुष म्हणजे जगाचें संरक्षण करणारा भगवान् विष्णूचा अंश असून ही स्त्री म्हणजे विष्णूपासून कधींहि वेगळी न राहणाऱ्या लक्ष्मीचा अंश होय ॥ ३ ॥ यांपैकीं हा पुरुष जो आहे, तो अत्यंत कीर्तिमान् असा पृथु नांवाचा पहिला श्रेष्ठ राजा होईल व आपलें यश दिगंत पसरील ॥ ४ ॥ आणि ही जी सुंदर व रमणीय स्त्री आहे, ती गुण आणि अलंकार यांना भूषणभूत अशी अर्चि नांवानें त्या पृथूची सेवा करणारी पत्नी होईल ॥ ५ ॥ हा पुरुष प्रत्यक्ष श्रीहरीचा अंश असून जगाचें संरक्षण करण्यासाठीं अवतरला आहे आणि ही स्त्री त्याची नित्य सेवा करणारी व त्यापासून कधींहि वेगळी न राहणारी अशी लक्ष्मीच त्याच्या मागोमाग अवतरली आहे ॥ ६ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—ऋषींचें हें भाषण ऐकून ब्राह्मण पृथूची स्तुति करूं लागले, गंधर्वांतील उत्तम गायक गाऊं लागले, आकाशांतून सिद्धांनीं त्याच्यावर पुष्पवृष्टि केली आणि अप्सरा नाचूं लागल्या ॥ ७ ॥ स्वर्गांत शंख, तुताऱ्या, मृदंग, नगारे इत्यादि वाद्यें वाजूं लागलीं आणि देव, ऋषी आणि पितर यांचे थव्यांच्या थवे पृथूच्या दर्शनासाठीं तेथें गोळा झाले ॥ ८ ॥

त्या वेळीं जगाचा पिता जो ब्रह्मदेव तोहि इंद्रादि देवांसह तेथें आला आणि वेनपुत्र पृथूच्या उजव्या हातावर गदाधारी श्रीविष्णूचें चिन्ह जें चक्र तें आहे आणि पायांवर कमळ आहे, असें पाहून तो भगवान् श्रीविष्णूचाच अंश आहे असा त्यानें निश्चय केला' कारण ज्याच्या हातावर इतर रेषांनीं अस्पष्ट न झालेलें असें चक्राचें स्पष्ट चिन्ह असतें, तो परमात्म्याचा अंश होय, असा शास्त्राचा सिद्धांत आहे ॥ ९ ॥ १० ॥ नंतर वेदवेत्त्या ब्राह्मणांनीं त्याला राज्याभिषेक करण्याची सिद्धता केली आणि त्यासाठीं सर्व लोकांनीं अभिषेकाचें साहित्य तेथें आणिलें ॥ ११ ॥ नद्या, समुद्र, पर्वत, हत्ती, गाई, पक्षी, पशु, आकाश, पृथ्वी आणि इतर सर्व प्राणी यांनींहि आपआपल्या भेटी आणून दिल्या ॥ १२ ॥ याप्रमाणें उत्तम वस्त्रें परिधान करून तशाच सुंदर रीतीनें सुशोभित केलेल्या त्या राजश्रेष्ठाला राज्याभिषेक झाला असतां, अलंकारांनीं भूषित झालेल्या आपल्या अर्चिनामक

पत्नीसह जणूं दुसरा अग्निच कीं काय, असा तो तळपूं लागला ॥ १३ ॥ विदुरा, त्या प्रसंगीं कुबेरानें पृथूला सोन्याचें सिंहासन दिलें आणि वरुणानें उदकाचा स्राव करणारें चंद्रासारखें तेजस्वी छत्र दिलें ॥ १४ ॥ वायूनें त्याला दोन चवऱ्या दिल्या, धर्मानें मूर्तिमंत कीर्तिच अशी गळ्यांत घालावयाची माळ दिली, इंद्रानें उत्तम प्रकारचा मुकुट दिला आणि यमानें राज्याचें नियंत्रण करण्यासाठीं दंड दिला ॥ १५ ॥ त्याप्रमाणेंच ब्रह्मदेवानें वेदस्वरूपी कवच त्याला अर्पण केलें, सरस्वतीनें सुंदर हार दिला, भगवान् विष्णूनें सुदर्शन चक्र दिलें आणि विष्णुपत्नी लक्ष्मीनें अखंड असें ऐश्वर्य त्याला अर्पण केलें ॥ १६ ॥ रुद्रानें दहा चंद्रबिंबें काढिलेली तरवार त्याला दिली आणि रुद्रपत्नी पार्वतीनें शंभर चंद्रबिंबयुक्त अशी ढाल दिली. सोमानें अमृतस्वरूपी घोडे त्याला दिले व त्वष्ट्यानें सुंदर रथ दिला ॥ १७ ॥ अग्नीनें त्याला मेंढा व बैल यांच्या शिंगांचें धनुष्य दिलें, सूर्यानें किरणरूप बाण दिले, पृथ्वीनें इष्ट स्थलीं नेणाऱ्या योगयुक्त पादुका दिल्या आणि आकाशांतील देवतेनें नित्यशः पुष्पवृष्टी करीन असें सांगितलें. ॥१८॥ विद्याधरांनीं नाट्य, गायन, वादन आणि गुप्त होण्याची विद्या हीं दिलीं, ऋषींनीं उत्तम प्रकारचे आशीर्वाद दिले आणि समुद्रानें स्वतःपासून निर्माण झालेला शंख त्याला अर्पण केला ॥१९॥ समुद्र, पर्वत व नद्या यांनीं त्या महात्मा पृथूच्या रथाला मार्ग करून दिले आणि एवढें झाल्यावर सूत, मागध आणि भाट हे त्याचें स्तवन करण्यासाठीं त्याच्या भोंवतीं येऊन उभे राहिले ॥ २० ॥ ते आपली स्तुति करण्यास प्रवृत्त झालेले पाहून तो प्रतापशाली वेनपुत्र पृथुराजा, मेघासारख्या गंभीर शब्दांनीं त्यांच्याशीं हंसत हंसत बोलूं लागला ॥२१॥

तो म्हणाला,—' हे सूत, मागध आणि भाट हो, माझी स्तुति करणें, ती लोकांमध्यें माझे गुण जेव्हां स्पष्ट दिसून येतील तेव्हांच करणें उचित होईल. आज ते गुण प्रगट झालेले नसल्यामुळें माझी स्तुति कोणत्या आधारावर तुम्हीं करणार ? माझ्यासंबंधानें तुमचे शब्द व्यर्थ होऊं नयेत, म्हणून तुम्हीं माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाचीहि स्तुति करा ॥ २२ ॥ हे सुंदर भाषण करणारे मागध हो, कांहीं काळ जाऊं द्या आणि मग आमच्या कीर्तीला अनुरूप असें वाटेल तितकें स्तवन तुम्ही करा ! पुण्यश्लोक भगवंताचे गुण वर्णन करावयाचे तें सोडून, सभ्य पुरुष, निंदास्पद असणाऱ्या आधुनिक व्यक्तीचे गुण वर्णन करीत नसतात ॥ २३ ॥ आपल्या ठायीं मोठे गुण आणण्याची ज्याला शक्ति आहे, असा कोणता पुरुष ते गुण नसतांनाच स्तुतिपाठकांकडून स्तुति करून घेईल बरें ? आतांच गुण नसतील व पुढें येतीलच, अशा खोट्या स्तुतीनें फसलेला जो कोणी अल्पबुद्धि मनुष्य असेल तो मात्र अशी स्तुति करून घेईल. कारण

त्यामुळें लोक आपला उपहास करितात हेंहि त्याला कळत नसतें ॥ २४ ॥ जे समर्थ असतात ते प्रसिद्ध असले तरी त्यांना नम्रपणामुळें स्वतःच्या स्तुतीचा किळस वाटतो आणि त्यांच्या अत्यंत उदार स्वभावामुळें निंदेस पात्र होईल असला पराक्रम गाजविणेंहि त्यांस आवडत नाहीं ॥२५॥ हे सूत हो, आमची तर उत्तम कार्यें करणारे अशी लोकांत अद्यापि मुळींच माहिती नाहीं. तरी एखाद्या मुलाप्रमाणें आम्हीं आपली स्तुति तुमच्याकडून कशी करवून घ्यावी बरें ? ॥२६॥

**पंधरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १६ वा

पृथुराजानें याप्रमाणें भाषण केलें असतां त्याचे अमृतासारखे ते गोड शब्द ऐकून त्याची स्तुति गाणाऱ्या त्या सूतमागधादिकांच्या मनाला संतोष झाला आणि ऋषींनीं प्रोत्साहन दिल्यामुळें ते त्याची स्तुति करूं लागले ॥ १ ॥ ते म्हणाले,–'हे राजा, आम्ही तुझ्या मोठेपणाचें वर्णन करण्यास समर्थ नाहीं. तूं प्रत्यक्ष देवश्रेष्ठ असून मायेच्या योगानें हा अवतार धारण केला आहेस. वेनापासून तुझा जन्म असल्यामुळें तुझ्या पराक्रमाचें वर्णन करण्याच्या कामीं बृहस्पतीसारख्यांच्याहि बुद्धीला भ्रम पडेल ॥ २ ॥ तथापि श्रीहरीचा अंशावतारच अशा श्रेष्ठ कीर्तीच्या या पृथुराजाच्या कथांविषयीं आम्हांला आदर वाटत असल्यामुळें ऋषींच्या प्रोत्साहनानें व त्यांनीं उपदेशिल्याप्रमाणें त्याच्या स्तुत्य पराक्रमांचें वर्णन आम्हीं करीत आहों ॥ ३ ॥ हा पृथुराजा धर्माचें रक्षण करणाऱ्या पुरुषांत श्रेष्ठ असून लोकांना धर्मानें वागावयास लावणारा होईल. धर्ममर्यादांचें तो पालन करील आणि त्या मोडणाऱ्यांचें शासन करील ॥ ४ ॥ अष्ट लोकपालांचीं शरीरें हा एकटाच आपल्या शरिरानें धारण करील आणि त्या लोकपालांचीं यथोचित कार्यें योग्य वेळीं करून दोन्ही लोकांचें कल्याण करील ॥ ५ ॥ लोकांपासून करभार घेणें तो योग्य वेळींच तो घेईल आणि त्याचा योग्य वेळीं तो प्रजाहितासाठीं विनियोग करील. हा सर्व भूतांविषयीं समदृष्टि ठेवील आणि सर्वव्यापी सूर्याप्रमाणें आपलें तेज सर्वत्र प्रगट करील ॥ ६ ॥ हा वेनपुत्र पृथुराजा पृथ्वीप्रमाणें शांतवृत्ति धारण करील व दुःखित प्राण्यांनीं दुःखनिवारणार्थ आपल्यावर वरचढपणा दाखवून अपराध केले तरी कृपाळूपणें ते नित्य सहन करील ॥ ७ ॥ हा प्रत्यक्ष श्रीहरिच राजदेह धारण करून आलेला असल्यामुळें जर इंद्रानें केव्हां पाऊस पाडिला नाहीं, तर त्यायोगें, संकटांत सांपडलेल्या प्रजेचें तो इंद्राप्रमाणेंच तत्काळ रक्षण करील ॥ ८ ॥ आपल्या चंद्रासारख्या आल्हाददायक मुखानें हा राजा प्रजेकडे प्रेमपूर्वक दृष्टि ठेवून पाहील आणि स्पष्ट सुंदर असें स्मितहास्य करील व त्यामुळें प्रजेला आपण पुष्ट झालों असें वाटेल ॥ ९ ॥ याचे मार्ग कोणाला कळणार नाहींत आणि हा आपलें कार्य गुप्तपणें करील. आपल्या कार्यसाधनांचा थांग हा कोणाला लागूं देणार नाहीं व आपल्या संपत्तीचें हा उत्तम संरक्षण करील. अत्यंत महत्त्वाच्या गुणांचें तर हा पृथुराजा केवळ आगर होईल. आपल्या देहाला नित्य सुरक्षित ठेवून वरुणाचीच प्रतिमा दाखवील ॥ १० ॥

वेनाच्या शरिरापासून उत्पन्न झालेला हा पृथुराजा अग्न्युत्पादक काष्ठांतून निर्माण झालेल्या अग्नीप्रमाणें तेजस्वी असून कोणाच्या कह्यांत जाणार नाहीं व त्याचा पराक्रमहि कोणाला सहन होण्यासारखा नसेल. त्यामुळें तो जवळ असूनहि दूर असल्यासारखा राहून कोणालाहि जिंकितां येणार नाहीं ॥ ११ ॥ आपल्या गुप्त हेरांच्या साहाय्यानें हा सर्व

लोकांच्या अंतर्बाह्य चाललेल्या कृत्यांचें निरीक्षण करील आणि प्राणिमात्रांना व्यापून असणाऱ्या चालक वायूप्रमाणें स्वतः निरपेक्षच राहील ॥ १२ ॥ आपला द्वेष करणाऱ्या शत्रूंचीं मुलेंहि जर अपराधी नसतील तर त्यांना हा दंड करणार नाहीं आणि स्वतःचीं मुलें जर अपराध करतील, तर त्यांनाहि दंड केल्याशिवाय हा राहणार नाहीं. अशा रीतीनें हा नित्य धर्माच्या मार्गाचेंच अवलंबन करील ॥ १३ ॥ या पृथुराजाचें सैन्य मानसपर्वतापर्यंत अकुंठित संचार करील आणि सूर्यनारायण आपल्या किरणांचा प्रकाश ज्या प्रदेशावर पाडितो त्या सर्व प्रदेशावर त्याचा अधिकार चालेल ॥ १४ ॥ हा सर्व लोकांचें आपल्या सत्कृत्यांनीं रंजन करील आणि म्हणून मनोरंजन करण्याच्या या गुणामुळें प्रजा त्याला 'राजा' असें अन्वर्थक नांव देतील ॥ १५ ॥ हा पृथुराजा आपल्या लोकसंरक्षणात्मक व्रताचें पालन एकनिष्ठेनें करील, आपल्या वचनाला नित्य जागेल, ब्राह्मणांचें संरक्षण करील, वृद्धांची सेवा करील, सर्व भूतांना आश्रय देईल, सर्वांचा मान राखील आणि दुर्बळांवर दया करील ॥ १६ ॥ परस्त्रियांच्याविषयीं तो मातृबुद्धि धारण करील आणि स्वतःच्या पत्नीला आपलें अर्धें अंगच मानील. तसेंच तो प्रजांवर पित्याप्रमाणें प्रेम करील आणि वेदवेत्त्या पुरुषांचा तो दास होईल ॥ १७ ॥ सर्व प्राण्यांना तो अंतर्यामीं आत्म्याप्रमाणें अत्यंत प्रिय असेल आणि मित्रांना अत्यंत आनंद देईल. तसेंच विषयांसंबंधाची आसक्ति तो सोडून देईल आणि दुष्ट लोकांना दंडधारी यमाप्रमाणें भासेल ॥ १८ ॥ तिन्ही लोकांचा स्वामी असा जो अधिकारी परमात्मा तोच प्रत्यक्ष येथें आपल्या एका अंशानें अवतरला आहे. अविद्येच्या योगानें भासमान होणारें अनेकपण जरी अनुभवास येतेंसें वाटलें तरी तें त्या परमात्म्याच्या ठिकाणीं सर्वथैव खोटेंच असतें ॥ १९ ॥ हा अद्वितीय वीर पृथु चक्रवर्ती होऊन उदयगिरीपासून सर्व पृथ्वीचें रक्षण करील आणि आपल्या विजयशाली रथावर आरूढ होऊन आणि धनुष्यबाण घेऊन तो सूर्याप्रमाणें सर्व भूमंडळावर जणूं काय प्रदक्षिणा करीत संचार करील ॥ २० ॥ त्या वेळीं त्याला ठिकठिकाणचे राजे आणि लोकरक्षक अधिकारी करभार देतील आणि त्यांच्या स्त्रिया या आदिराज पृथूचें यशोगायन करून त्याला चक्रपाणि असा श्रीविष्णुच मानितील ॥ २१ ॥ हा सार्वभौम राजा लोकांचें रक्षण करून त्यांना निर्वाहाचीं साधनें उपलब्ध करून देईल आणि त्याप्रीत्यर्थ गोरूप धारण करणाऱ्या पृथ्वीचें दोहन करण्यासाठीं आपल्या धनुष्याच्या टोंकानें पर्वत फोडून इंद्रानें केल्याप्रमाणें तो तिला सपाट करील ॥ २२ ॥ आपलें आजगव नांवाचें शत्रूंना असह्य होणारें धनुष्य घेऊन जेव्हां तो त्याचा टणत्कार करीत स्वतः समरांगणावर येईल त्या वेळीं, सिंह जसा पुच्छ वर करून धांवतो, त्याप्रमाणें सर्व दुष्ट लोक दाही दिशांना पळून जातील ॥ २३ ॥ सरस्वती नदी ज्या ठिकाणीं प्रकट होते, त्या ठिकाणीं हा शंभर अश्वमेध करील आणि त्यांचा शेवटचा अश्वमेध चालला असतां शंभर यज्ञांचा स्वामी म्हणविणारा इंद्र त्याचा अश्व पळवून नेईल ॥ २४ ॥ हा आपल्या राजवाड्याच्या क्रीडोद्यानांत भगवान् सनत्कुमाराची एकान्तीं भेट घेऊन त्याची भक्तिपूर्वक आराधना

करील आणि ज्यांच्या योगानें परब्रह्माची प्राप्ति होते तें संपूर्ण ज्ञान त्याच्यापासून प्राप्त करून त्याच्या पराक्रमाच्या स्तुतिपर कथा सर्वत्र प्रसिद्ध झाल्या, म्हणजे महाप्रतापशाली अशा या पृथूला स्वतःलाहि त्या ऐकावयास सांपडतील ॥ २६ ॥ त्याच्या सैन्याला कोठेंहि प्रतिबंध न होतां तो आपल्या पराक्रमाच्या योगानें सर्व दिशा जिंकील आणि लोकांची सर्व प्रकारची पीडा दूर करून तो पृथ्वीचा अधिपति होईल. त्या वेळीं मोठमोठे देव आणि दैत्य हेहि त्याच्या थोर पराक्रमाचें वर्णन करितील ॥ २७ ॥

## सोळावा अध्याय समाप्त

# अध्याय १७ वा

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें स्तुतिपाठकांनीं गुण व कर्मे यांना अनुलक्षून महापराक्रमी अशा पृथुराजाची स्तुति केली असतां पृथुराजानें त्यांना इष्ट असलेल्या वस्तु देऊन त्यांचा सत्कार केला आणि त्यांस संतुष्ट केलें ॥ १ ॥ तसेंच ब्राह्मणादि चार वर्णांतील लोक, सेवकवर्ग, प्रधानमंडळ, पुरोहित, नगरांतील आणि खेड्यांतील लोक तसेंच व्यापारी, कारागीर आणि इतर सर्व प्रजा यांचाहि त्यानें यथाधिकार सत्कार केला ॥ २ ॥

विदुर म्हणाला,—हे मैत्रेयमुने, पृथुराजानें ज्या गोरूपी पृथ्वीचें दोहन केलें तीं अनेक रूपें धारण करण्यास समर्थ असतां तिनें गोरूपच काय कारणास्तव घेतलें ? त्या वेळीं वत्स कोण झाला होता ? आणि दोहन तरी कशाचें केलें ? ॥ ३ ॥ तसेंच पृथ्वी स्वभावतः उंचसखल असतां त्यानें ती सारखी कशी केली व त्याचा यज्ञीय घोडा इंद्रानें कशाकरितां हरण करून नेला ? ॥ ४ ॥ त्याचप्रमाणें मैत्रेयमुने, ब्रह्मज्ञान्यांत श्रेष्ठ अशा भगवान् सनत्कुमारापासून अपरोक्षज्ञानासहित ब्रह्मज्ञानाची प्राप्ति करून घेऊन तो राजर्षि पृथुराजा कोणत्या गतीला गेला ? ॥ ५ ॥ विदुर म्हणाला,—मैत्रेया, हें जें कांहीं मीं आपणांस विचारिलें आहे, तें सर्व कथानक मला सांगा आणि ह्याशिवाय पृथुरूप घेऊन ज्यानें गोरूपी पृथ्वीचें दोहन केलें, अशा सर्वसमर्थ भगवान् श्रीकृष्णाच्या त्या पूर्व अवतारांतील चरित्रासंबंधीं ज्या दुसऱ्याहि पवित्र कथा असतील त्या मला सांगा. मी आपला व भगवंताचा भक्त असून त्यांचें यश ऐकण्यास उत्सुक झालों आहें. ॥ ६ ॥ ७ ॥

सूत म्हणाला,—हे शौनका, याप्रमाणें विदुरानें श्रीकृष्णाच्या कथांसंबंधीं प्रश्न केला असतां मैत्रेयाला फारच आनंद वाटला आणि विदुराची प्रशंसा करून तो बोलूं लागला ॥ ८ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, जेव्हां ब्राह्मणांनीं पृथूला राज्याभिषेक केला व तूं सर्व प्रजांचा रक्षणकर्ता आहेस असें सांगितलें, त्या वेळीं सर्व पृथ्वी अन्नरहित झाली असून त्यामुळें सर्व लोक क्षुधेनें व्याकुळ होऊन कृश झाले होते. ते सर्वजण राजाजवळ येऊन त्याला म्हणाले ॥ ९ ॥ हे राजा, ढोलींतील अग्नीनें ज्याप्रमाणें वृक्ष सुकून जावा त्याप्रमाणें आम्ही सर्व प्रजा जठराग्नीनें तप्त होऊन व्याकुळ झालों आहों. आमच्या पोषणासाठीं ब्राह्मणांनीं तुला राजा म्हणून नेमिलें आहे. तेव्हां शरण जाण्यास योग्य व प्रजारक्षक अशा तुला आम्ही शरण आलों आहों ॥ १० ॥ हे राजाधिराजा, तूंच सर्व प्रजांचा पालन करणारा व उपजीविकासाधन मिळवून देणारा आहेस. ह्याकरितां क्षुधेनें व्याकुळ झालेले आम्ही, अन्नान्न करून नाश पावलों नाहीं, तोंच आम्हांला अन्न देऊन आमचें रक्षण करण्याचा तूं प्रयत्न कर ॥ ११ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, पृथुराजानें याप्रमाणें प्रजांचे दीनवाणे विलाप ऐकून बराच वेळपर्यंत चिंतन केलें. त्यायोगें पृथ्वी अन्नरहित होण्याचें कारण त्यास आढळून आलें ॥ १२ ॥ पृथ्वीनें औषधि व बीजें गिळून टाकिलीं आहेत, असें त्या राजानें आपल्या बुद्धीशीं ठरविलें व त्रिपुरासुराला मारणाऱ्या शंकराप्रमाणें क्रुद्ध होऊन त्यानें हातांत धनुष्य घेतलें, आणि पृथ्वीकडे रोंख धरून त्यावर बाण चढविला ॥१३॥ त्या वेळीं धनुष्य बाण धारण केलेल्या त्या राजाला पाहून पृथ्वी थरथर कांपूं लागली, व ज्याप्रमाणें व्याधाच्या भीतीनें हरिणी पळत सुटते, त्याप्रमाणें भ्यालेली ती पृथ्वी गोरूप धारण करून सैरावैरा पळत सुटली ॥ १४ ॥ तेव्हां क्रोधायमान व अतिआरक्त नेत्र झालेला तो पृथुराजा धनुष्याला बाण जोडून पृथ्वी जिकडे जिकडे पळत जाई तिकडे तिकडे तिच्या मागोमाग धावूं लागला ॥ १५ ॥ पूर्वादि मुख्य चार दिशा, आग्नेयादि चार उपदिशा, स्वर्ग आणि अंतरिक्ष इतक्या ठिकाणीं ती एकसारखी पळत होती, तरी प्रत्येक ठिकाणीं आपल्या मागोमाग धनुष्य सज्ज केलेला पृथुराजा येतोच आहे असें तिच्या दृष्टीस पडलें ॥ १६ ॥ ज्याप्रमाणें मृत्यूपासून प्राण्यांचें रक्षण कोणीहि करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें पृथुराजापासून आपलें रक्षण करणारा त्रैलोक्यांत कोणीहि नाहीं, असें जेव्हां पृथ्वीला आढळून आलें, तेव्हां ती त्रासून खिन्न अन्तःकरणानें परत फिरली ॥ १७ ॥ आणि त्या महाभाग्यशाली पृथुराजाला म्हणाली,—हे धर्मज्ञा, तूं शरणागतांवर प्रेम करणारा आहेस, तसेंच सर्व प्राण्यांचें रक्षण करण्यास प्रवृत्त झालेला आहेस, ह्याकरितां तूं माझें रक्षण कर ! ॥ १८ ॥ हे राजा, दीन व निरपराधी अशा मला तूं कशाकरितां मारितोस ? ज्याला सर्व लोक धर्मज्ञ असें समजतात असा तूं स्त्रीहत्या करण्यास कसा प्रवृत्त झालास ? ॥ १९ ॥ हे राजा, स्त्रियांनीं अपराध केला, तरी साधारण लोकहि त्यांच्यावर प्रहार करीत नाहींत. मग तुझ्यासारखे दयाळू व दीनावर प्रेम करणारे सत्पुरुष कसा बरें करितील ? ॥२०॥ माझ्या आधारानें सर्व जग राहिलें असून कधींहि क्षीण न होणारी अशी नौकाच मी आहें. तेव्हां माझे तुकडे केल्यावर तूं स्वतःला व प्रजेला उदकांत कसें धारण करिशील ? ॥ २१ ॥

पृथु म्हणाला,—हे पृथ्वी, तूं माझी आज्ञा उल्लंघिली असल्यामुळें मी तुला ठार मारणार ! कारण, तूं यज्ञांतील आपला भाग मात्र घेतेस; परंतु आमचीं धान्यादि द्रव्यें आम्हांला देत नाहींस ॥ २२ ॥ तुला गवत मात्र दररोज खायला पाहिजे, पण दूध द्यायला नको, अशी तूं दुष्ट आहेस, तेव्हां या अपराधाबद्दल तुला शिक्षा करणें मुळींच अयोग्य नाहीं ! ॥ २३ ॥ पूर्वीं ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेलीं औषधिबीजें तूं खरोखर आपल्या अंगामध्यें गडप करून टाकिलीं आहेस व एखाद्या अल्पबुद्धीच्या माणसाप्रमाणें माझा अपमान करून अजूनहि तीं तूं परत देत नाहींस ! ॥ २४ ॥ म्हणून मी आपल्या बाणांनीं आतां तुझें शरीर विदारण करितों आणि भुकेलेल्या व दीनदुबळ्या अशा या प्रजेचा शोक तुझ्या मांसानें शान्त करितों ॥२५॥ पुरुष असो, स्त्री असो, कीं नपुंसक असो जो, कोणी

आपलीच प्रशंसा करून नीचपणें प्राण्यांशीं निर्दयपणानें वागेल त्याचा राजानें वध केला, तर तो वधाच्या दोषास पात्र होत नाहीं ॥ २६ ॥ तूं गर्विष्ठ व उन्मत्त झाली असून कपटानें हें गोस्वरूप धारण केलें आहेस; तेव्हां मी आपल्या बाणांनीं अशा तऱ्हेनें तुझे तिळाएवढे तुकडे करून टाकीन व योगसामर्थ्यानें ह्या प्रजेला उदकावर धारण करीन ॥ २७ ॥ याप्रमाणें यमासारखें अत्यंत कोपयुक्त स्वरूप धारण करणाऱ्या पृथुराजाला पाहून पृथ्वी थरथर कांपूं लागली आणि त्याला नम्रपणानें हात जोडून म्हणाली ॥ २८ ॥

पृथ्वी म्हणाली,—हे पृथुराजा, तूं सर्वान्तर्यामीं राहणारा परमात्माच असून मायेच्या साहाय्यानें अनेक रूपें धारण करतोस आणि सत्त्व, रज व तम या गुणांच्या योगानेंच प्रचीतीस येतोस. तुला नमस्कार असो. सच्चिदानंदस्वरूपाचा पूर्ण अनुभव घेत असल्यामुळें पंचमहाभूतें, इंद्रियें व देवता यांचे खेळ तुझ्या ठिकाणीं सर्वथैव जेयून नष्ट होतात, अशा तुला, माझा नमस्कार असो ! ॥२९॥ सर्व प्राण्यांचें वसतिस्थान म्हणून ज्या परमेश्वरानें मला निर्माण केलें आणि त्रिगुणांपासून उत्पन्न केलेल्या सर्व सृष्टीची माझ्या ठिकाणीं स्थापना केली, तोच ईश्वर हातांत शस्त्र घेऊन मला ठार मारण्यास जर उद्युक्त झाला, तर मी शरण कोणाला जावें ? ॥ ३० ॥ प्राण्यांना आश्रयभूत असलेली जी अचिन्त्य माया, तिच्या योगानें प्रथम स्थावरजङ्गमात्मक सृष्टि ज्यानें उत्पन्न केली व सांप्रत त्याच मायेच्या योगानें जो तिचें पालन करण्यास तत्पर झाला आहे, तो तूं धर्मतत्पर असूनहि मला मारण्यास कसा प्रवृत्त झालास ? ॥३१॥ वस्तुतः एक असून मायेनें अनेक रूपें धारण करणारा आणि स्वतः सृष्टिकार्य करून ब्रह्मदेवादि दुसऱ्याकडूनहि करविणारा असा जो तूं परमेश्वर, त्याचें उद्दिष्ट काय आहे हें खरोखरच अज्ञानी लोकांना त्याच्या अजिंक्य अशा मायेमुळें कळत नाहीं ॥ ३२ ॥ हे पृथुस्वरूपी ईश्वरा, पंचमहाभूतें, इंद्रियें आणि देवता या ज्या तुझ्या शक्ति त्यांच्या योगानें तूं या जगाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं क्रमानें घडवून आणितोस. तुझी शक्ति जगाची उत्पत्ति करण्यास तशीच त्याला आवरून घेण्यास समर्थ आहे. असा जो तूं सृष्टिकर्ता श्रेष्ठ पुरुष त्या तुला माझा नमस्कार असो ॥ ३३ ॥ हे जन्मरहित सर्वव्यापी परमेश्वरा, भूतें, इंद्रियें व अंतःकरण ह्यांनीं सिद्ध झालेलें हें जग स्वतः निर्माण करून ह्याची योग्य रीतीनें स्थापना करण्याकरितां यज्ञवराहरूपानें तूं मला पाताळाच्या तळापासून पाण्यांतून वर काढिलेंस ॥ ३४ ॥ पाण्याच्या पृष्ठभागावर नौकेप्रमाणें तरंगणाऱ्या माझ्या पृष्ठावर राहणाऱ्या ज्या ह्या प्रजा, त्यांचें रक्षण करण्याच्या इच्छेनेंच, पराक्रमी असा जो तूं सांप्रत पृथ्वीपति झाला आहेस व तोच तूं या उदकांत माझा नाश करूं इच्छीत आहेस ! ॥ ३५ ॥ परमेश्वराच्या त्रिगुणात्मक मायेनें आमच्यासारख्या लोकांची चित्तवृत्ति मोहित झाल्यामुळें त्याच्या हेतूंचें आमच्यासारख्यांना मुळींच ज्ञान होत नाहीं; अशा त्या भक्तांचें यश वाढविणाऱ्या ईश्वरी अवतारांना नमस्कार असो ॥ ३६ ॥

**सतरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १८ वा

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, रागामुळें ज्याचे ओंठ थरथरत आहेत अशा त्या पृथूची पृथ्वीनें याप्रमाणें स्तुति केली; आणि भीतीनें ग्रस्त झाली असतांहि स्वतःला थोडा धीर देऊन ती त्याला पुनः म्हणाली ॥ १ ॥ हे राजा, तूं आपला क्रोध आवर आणि मी सांगल्यें तें ऐकून घे. जसा भ्रमर प्रत्येक पुष्पांतील मध काढून घेतो, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुष सर्व गोष्टींतील सारांश ग्रहण करीत असतो ॥ २ ॥ हे राजा, तत्त्ववेत्त्या ऋषींनीं ह्या लोकीं किंवा परलोकीं मनुष्यांचें कल्याण व्हावें यासाठीं अनेक प्रकारचे उपाय योजून ठेविले आहेत व त्यांचे प्रयोगहि करून पाहिले आहेत ॥ ३ ॥ पूर्वीच्या पुरुषांनीं दाखवून दिलेल्या त्या उपायांचें जो कोणी आधुनिक पुरुष श्रद्धापूर्वक उत्तमप्रकारें अवलंबन करितो, त्याला त्याचें इच्छित फल अनायासें प्राप्त होतें ॥ ४ ॥ परंतु जो अज्ञानी पुरुष ऋषींनीं सांगितलेल्या उपायांचा अनादर करून आपणच आपल्या कल्पनेनें कल्पित उपायांची योजना करितो त्याचे पुनःपुनः केलेले उद्योगहि सफल होत नाहींत ॥ ५ ॥ हे राजा, पूर्वी ब्रह्मदेवानें ज्या औषधि उत्पन्न केल्या होत्या, त्या औषधि आचारभ्रष्ट दुराचारी लोक भक्षण करूं लागले असें माझ्या दृष्टीस पडलें ॥ ६ ॥ लोकांचें पालन करणाऱ्या तुम्हीं राजांनीं माझें रक्षण तर केलें नाहींच, पण उलट माझा अनादर केला. तेव्हां सर्वत्र चोरांचा सुळसुळाट झालेला पाहून त्या औषधि मी ग्रासून टाकिल्या आहेत ॥ ७ ॥ औषधी पुष्कळ काळ गेल्यामुळें माझ्या शरिरांत खरोखर नष्टप्राय झाल्या आहेत; तरी सुप्रसिद्ध अशा दोहन-रूप उपायाचें अवलंबन करूनच त्या माझ्यापासून काढून घेणें तुला अवश्य आहे ॥ ८ ॥

हे वीरा, यास्तव तूं माझ्यासाठीं वत्साची योजना कर ! आणि दोहनासाठीं योग्य असें भांडेंहि सिद्ध कर, म्हणजे तुझ्या इष्ट वस्तू मी तुला दुग्धरूपानें अर्पण करीन ॥ ९ ॥ तसेंच दूध काढण्यासाठीं योग्य पात्रहि सिद्ध करून दोहन करणाऱ्या गवळ्याची योजना कर, म्हणजे त्यांच्या योगानें मी परम प्रेमयुक्त होऊन तुला क्षीरस्थानापन्न अन्नादि पदार्थांचें पुष्कळ दोहन करीन ॥ १० ॥ हे राजा, इंद्रानें वृष्टि केलेलें उदक वर्षाऋतु गेला असतांहि जेणेंकरून माझ्यावर सर्व ठिकाणीं राहील अशा रीतीनें तूं मला सारखी कर, म्हणजे प्रजेचा मनोरथ पूर्ण होऊन तुझें कल्याण होईल ॥ ११ ॥ हे विदुरा, या प्रकारचें संतोषकारक व इष्टसाधक असें भूमीचें वाक्य ऐकून पृथुराजानें स्वार्य स्वायंभुवमनूला वत्स करून आपल्या हस्तरूप पात्राचे ठिकाणीं व्रीहियवादि सर्व औषधिरूप दुधाचें दोहन केलें ॥ १२ ॥

ज्याप्रमाणें पृथूनें पृथिवीच्या वाक्यापासून सार ग्रहण केलें त्याप्रमाणें दुसरेहि जे विद्वान् लोक आहेत ते सर्व ठिकाणीं दुसऱ्याच्या वाक्यांतून आपला कार्यानुरूप

सारांश काढून घेतात; म्हणून पृथूनें दोहन केल्यानंतर पृथूनें वश केलेल्या त्या भूमीचें दुसऱ्या ऋष्यादिकांनींहि यथेच्छपणें दोहन करून इच्छित वस्तूंची प्राप्ति करून घेतली ॥ १३ ॥ हे साधुश्रेष्ठा विदुरा, पृथूच्या दोहनानंतर सर्व ऋषींनीं बृहस्पतीला वत्स करून भूमिदेवीचें इन्द्रियरूप पात्राच्या ठिकाणीं पवित्र असें वेदरूपी दूध काढिलें ॥ १४ ॥ देवगणांनीं इन्द्राला वत्स करून सुवर्णमय पात्राच्या ठिकाणीं अमृत, मनाची शक्ति. इन्द्रियांची शक्ति आणि शारीरबल हें दूध काढिलें ॥ १५ ॥ दैत्य व दानव यांनीं, असुरश्रेष्ठ जो प्रल्हाद त्याला वत्स करून लोखंडाच्या पात्रांत सुरेचें व ताडी वगैरे मद्याचें दोहन केलें ॥ १६ ॥ गंधर्व व अप्सरा यांनीं विश्वावसूला वत्स करून कमलमय पात्राचे ठिकाणीं वाणीचें माधुर्य ( गायन ) व सौंदर्य हें दूध काढिलें ॥ १७ ॥ श्राद्धांतील देवता असे महाभाग्यशाली जे पितर त्यांनीं अर्यम्याला वत्स करून मातीच्या कच्च्या भांड्यांत श्रद्धेनें काव्यरूपी दूध काढिलें ॥ १८ ॥ सिद्धपुरुषांनीं कपिलमुनीला वत्स कल्पून आकाशरूप पात्रामध्यें संकल्पमात्रेंकरून उत्पन्न होणारी जी अणिमादि अष्टसिद्धि हें दूध काढिलें, तसेंच जे विद्याधरादिक देव त्यांनींहि कपिलमुनीलाच वत्स कल्पून आकाशपात्रामध्यें गुप्त होऊन फिरणें इत्यादि विद्येचें दोहन केलें ॥ १९ ॥ त्याचप्रमाणें इतरहि मायावी किंपुरुषादिकांनीं मयासुराला वत्स करून आकाशपात्रामध्येंच स्वतःचें शरीर गुप्त करून अद्भुत रूपें धारण करणाऱ्या पुरुषांच्या अन्तर्धानशक्तिरूप मायेचें दोहन केलें ॥ २० ॥ यक्ष, राक्षस, भूतें व पिशाच ह्या रक्त भक्षण करणाऱ्या सर्व देवयोनींनीं भूतपति रुद्राला वत्स करून कपालरूपी पात्रांत रक्तरूपी मादक दुधाचें दोहन केलें ॥ २१ ॥ तसेंच फडा असलेले व फडा नसलेले साप, कद्रूचे पुत्र नाग आणि विंचू वगैरे प्राणी यांनीं तक्षकाला वत्स करून आपल्या मुखादिरूप पात्रांच्या ठिकाणीं विषरूप दूध काढिलें ॥ २२ ॥ सर्व पशूंनीं नंदिकेश्वराला वत्स करून अरण्यरूप पात्रामध्यें तृणरूप दुधाचें दोहन केलें आणि मांस भक्षण करणाऱ्या दाढांच्या पशूंनीं सिंहाला वत्स करून आपल्या शरीररूपी पात्रांत मांसरूप दूध काढून घेतलें. पक्ष्यांनीं गरुडाला वत्स करून स्वतःच्या शरिरांत जंगम ( किडे वगैरे ) आणि स्थावर ( फळें वगैरे ) भक्ष्यपदार्थरूप दूध मिळविलें ॥ २३ ॥ २४ ॥ सर्व वृक्षांनीं वटवृक्षाला वत्स करून स्वतःच्या शरिरांत प्रत्येकाला वेगवेगळा रस हें दूध प्राप्त करून घेतलें. पर्वतांनीं हिमालयाला वत्स करून आपआपल्या शिखरादि प्रदेशाच्या ठायीं अनेक प्रकारच्या गेरू, पिवडी वगैरे धातू, हें संपादन केलें ॥ २५ ॥ याप्रमाणें सर्वांनीं पृथुराजानें वश केलेल्या व इच्छित वस्तु प्राप्त करून देणाऱ्या त्या पृथ्वीचें आपआपल्यांतील मुख्याला वत्स करून आपआपल्या पात्रामध्यें निरनिराळें दूध काढून घेतलें ॥ २६ ॥ हे विदुरा, याप्रमाणें अन्न भक्षण करणाऱ्या पृथु आदिकरून पुरुषांनीं पृथ्वीचें, वत्स व दोहनपात्र इत्यादिकांच्या भेदेंकरून दोहन करून निरनिराळ्या दुधाच्या रूपानें आपल्याला इष्ट असलेले अन्नादि पदार्थ मिळविले ॥ २७ ॥ नंतर संतुष्ट झालेल्या व आपणांस कन्या असावी अशी इच्छा करणाऱ्या त्या राजानें सर्व मनोरथ पूर्ण करणाऱ्या त्या पृथ्वीचा, कन्येच्या नात्यानें प्रेमानें

स्वीकार केला ॥ २८ ॥ नंतर त्या समर्थ राजाधिराज पृथुराजानें आपल्या धनुष्याच्या टोंकानें पर्वतांच्या शिखरांचें चूर्ण करून हें भूमंडळ बहुतेक सारखें करून सोडिलें ॥ २९ ॥ नंतर प्रजांचें रक्षण करून उपजीविका चालविणारा जो भगवान् पृथुराजा त्यानें ह्या भूमंडळावर लोकांकरितां ठिकठिकाणीं यथायोग्य रीतीनें गांव, पुरें, नगरें, नाना प्रकारचे किल्ले, गुरांचे गोठे, गौळवाडे, सैन्याच्या तळांच्या जागा, खाणी, शेतकऱ्यांचीं खेडीं, डोंगरपठाराचे गांव इत्यादि वसतिस्थानांची योजना केली ॥ ३० ॥ ३१ ॥ हे विदुरा, या भूमंडळावर पृथुराजाच्या पूर्वीं ही नगरग्रामादिकांची रचना नव्हती; ती पृथुराजानें केल्यापासून सर्व प्रजा सुखानें वास करूं लागल्या ॥ ३२ ॥

## अठरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १९ वा

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, नंतर जेथें पूर्ववाहिनी सरस्वतीनदी आहे, तेथें मनूच्या ब्रह्मावर्तनामक क्षेत्रामध्यें त्या पृथुराजानें शंभर अश्वमेध यज्ञ करण्यासाठीं दीक्षा घेतली ॥ १ ॥ तेव्हां भगवंताचाच अवतार अशा यज्ञनामक इंद्रानें, त्या पृथुरूपी भगवदवताराचें तें शंभर अश्वमेधरूपी यज्ञमहोत्सवरूप कर्म आपल्या इंद्रपदाचें हरण करणारें आहे असें जाणून सहन केलें नाहीं ॥ २ ॥ ज्या पृथूच्या यज्ञमहोत्साहामध्यें सर्वांतर्यामी, सर्व लोकांचा गुरु, कर्तुं अकर्तुं अन्यथाकर्तुं समर्थ, भक्तांचीं दुःखें हरण करणारा व षड्गुणैश्वर्यसंपन्न असा साक्षात् यज्ञपति ईश्वर, प्रत्यक्ष दर्शन देत असे ॥ ३ ॥ त्याच्याबरोबर, ब्रह्मदेव, शंकर व अनुचरांसहवर्तमान इंद्रादि लोकपाल येत असत आणि गंधर्व, ऋषि व अप्सरांचे समुदाय समोर उभे राहून त्याची कीर्ति गात असत ॥ ४ ॥ सिद्ध, विद्याधर, दैत्य, दानव, गुह्यकादिक लोक, तसेंच नंद, सुनंद इत्यादिक विष्णूचे मुख्य मुख्य पार्षद, कपिल, नारद, दत्तात्रेय, सनकादिक महायोगी व इतर त्या विष्णूच्या सेवेकरितां उत्सुक असे भगवद्भक्तहि त्यांच्याबरोबर येत असत ॥ ५ ॥ ६ ॥

हे भरतकुलोत्पन्ना विदुरा, ज्या यज्ञांत होमद्रव्यें प्राप्त करून देणारी पृथ्वी सर्व इच्छा पूर्ण करणाऱ्या कामधेनूच्या स्वरूपानें यजमानाचे इष्ट मनोरथ परिपूर्ण करीत होती ॥ ७ ॥ नद्या, उंसाचे, द्राक्षाचे वगैरे रस, दूध, दहीं, पेय पदार्थ ( सरबतें ), तूप, ताक वगैरे गोरस वाहून आणीत होत्या. मोठमोठे वृक्ष आपल्या ढालींतून मधाचा स्राव करीत असून पुष्कळ फुलें, फळें यांनीं युक्त होत असत ॥ ८ ॥ समुद्र अनेक रत्नें आणून देत असत, पर्वत चार प्रकारचें अन्न आणून देत असत व पालकांसहवर्तमान सर्व लोक नाना प्रकारच्या भेटी आणून देत असत ॥ ९ ॥ ज्याचा नाथ अधोक्षज भगवान् आहे अशा पृथुराजाचें पूर्वोक्त प्रकारचें मोठ्या अभ्युदयानें युक्त असें तें यज्ञकर्म पाहून तें इन्द्राला सहन झालें नाहीं व त्यामुळें त्यानें त्या यज्ञांत विघ्न उत्पन्न केलें ॥ १० ॥ तें असें कीं, शंभराव्या अश्वमेधानें यज्ञपति भगवंताचें यजन करण्यास पृथुराजा प्रवृत्त झाला असतां, स्पर्धा उत्पन्न झालेल्या इंद्रानें, गुप्तरूपानें त्याचा अश्वरूप यज्ञपशु हरण केला ॥ ११ ॥ तेव्हां भगवान् अत्रीनें, आकाशमार्गानें घोडा घेऊन धांवत जाणाऱ्या व ज्याच्या योगानें लोकांना अधर्माच्या ठिकाणीं 'हा धर्म आहे' अशी भ्रांति उत्पन्न होत्ये अशा पाखंड वेषाला, बरकर्मी कवचाप्रमाणें धारण करणाऱ्या त्या इंद्रास पाहिलें ॥ १२ ॥

तेव्हां अत्रिऋषीनें त्या इंद्राला मारण्याकरितां प्रेरणा केलेला पृथुराजाचा पुत्र क्रुद्ध होऊन त्या धांवणाऱ्या इंद्राच्या मागें लागला आणि त्याला 'उभा राहा !' असें म्हणाला ॥ १३ ॥ परंतु कापालिक वेषधारी अशा त्या इंद्राला पाहून हा केवळ धर्मात्मा आहे असें त्या पृथुपुत्राला वाटलें व म्हणून त्याला मारण्याकरितां त्याच्यावर

त्यानें बाण सोडला नाहीं ॥ १४ ॥ याप्रमाणें इंद्राला धर्मात्मा समजून त्याच्या वधापासून पृथुपुत्र निवृत्त झाला असतां, इंद्रास मारण्याकरितां पुनः अत्रिऋषि त्याला म्हणाला, ' बाळा, अश्वाचा अपहार करून यज्ञामध्यें विघ्न करणाऱ्या या देवाधम इंद्राला तूं मारून टाक ! ॥ १५ ॥ अशी प्रेरणा अत्रीनें केली असतां पृथूचा पुत्र अत्यंत क्रुद्ध झाला आणि जसा पूर्वीं रावण सीतेला घेऊन चालला असतां त्याच्यावर जटायु धांवून गेला, त्याप्रमाणें आकाशमार्गानें त्वरेनें जाणाऱ्या त्या इंद्राच्या मागोमाग तो पृथुपुत्र धांवत गेला ॥ १६ ॥ तेव्हां तो स्वर्गाधिपति इंद्र, त्या अश्वाचा व आपल्या कापालिक वेषाचा त्याग करून गुप्त झाला आणि तो वीरपुत्र आपला घोडा घेऊन पित्याच्या यज्ञमंडपांत आला ॥ १७ ॥ मैत्रेय म्हणतात,–विदुरा, तेव्हां त्या ठिकाणीं जमलेल्या महान् महान् ऋषींनीं तें त्या पुत्राचें अद्‌भुत कर्म पाहून त्याला 'विजिताश्व' असें नांव दिलें ॥ १८ ॥

नंतर त्या समर्थ इंद्रानें, निबिड अंधकार उत्पन्न करून त्याच्या योगानें आपलें शरीर आच्छादित केलें आणि बसवी घातलेल्या यज्ञस्तंभाला सुवर्णाच्या दोरीनें बांधून ठेविलेला घोडा घेऊन तो दोरीसुद्धां तेथून पळून गेला ॥ १९ ॥ घोडा घेऊन इंद्र आकाशमार्गानें पळत असतां त्याला अत्रिऋषीनें पुनरपि पृथुपुत्राच्या दृष्टीस आणून दिलें. त्या वेळीं इंद्रानें कपाल व खट्वांग हीं आयुधें धारण केलीं होतीं; म्हणून हा धर्मात्मा आहे असें समजून, तो वीर त्याला मारण्यास प्रवृत्त होईना ॥ २० ॥ तेव्हां अत्रीनें पुनः सांगितल्यावरून राजपुत्रानें त्या इंद्रावर क्रोधानें शरसंधान केलें असतां तो स्वर्गपति इंद्र, अश्वाचा व त्या रूपाचा त्याग करून गुप्त होऊन राहिला ॥ २१ ॥ नंतर तो वीर पृथुपुत्र विजिताश्व आपला अश्व घेऊन पित्याच्या यज्ञमंडपांत आला. परंतु इंद्राचें तें निंद्य पाखंड रूप, मूढबुद्धि लोकांनीं मात्र 'हें चांगलें आहे' अशा बुद्धीनें स्वीकारिलें ॥ २२॥ याप्रमाणें घोडा हरण करण्याच्या इच्छेनें इंद्रानें जीं जीं रूपें धारण केलीं, तीं तीं सर्व पापाचीं चिन्हें म्हणून पाखंडें होत. कारण खंड शब्दाचा चिन्ह असा अर्थ आहे ॥ २३ ॥ असो. तात्पर्य एवढेंच कीं, इंद्र पृथुराजाच्या यज्ञाचा घात करण्याच्या इच्छेनें पाखंड वेष धारण करून वारंवार घोडा हरण करीत असतां, त्यानें एकएकदां घेऊन टाकलेले जे धर्मासारखे भासणारे, अविचारी पुरुषांस सुंदर वाटणारे व बोलण्यांत कुशल असे नग्न ( जैन ) रक्तवस्त्र ( बौद्ध, कालिभक्त ) वगैरे पाखंड वेष, त्याच्या ठिकाणीं भ्रांतीनें 'हाच धर्म आहे' अशा समजुतीनें मनुष्यांची बुद्धि पुष्कळ अंशीं आसक्त होऊं लागली ॥ २४ ॥ २५ ॥ तें इंद्राचें निंद्य कर्म जाणून क्रुद्ध झालेल्या त्या महापराक्रमी भगवान् पृथुराजानें, आपलें धनुष्य सज्ज करून इंद्राला मारण्यासाठीं हातामध्यें बाण घेतला ॥ २६ ॥ हे विदुरा, इंद्राच्या वधाची इच्छा करणारा, क्रोधाविष्ट झाल्यामुळें ज्याच्याकडे पाहणें सुद्धां अशक्य व ज्याचा वेग शत्रूंना दुःसह आहे, अशा त्या पृथुराजाला पाहून ऋत्विजांनीं त्याचें निवारण केलें. ते म्हणाले,–हे महामते पृथुराजा, ह्या यज्ञकर्मामध्यें शास्त्रांत सांगितलेल्या पशुवधाखेरीज इतरांचा वध करणें तुला योग्य नाहीं ॥ २७ ॥ वास्तव तुझ्या कीर्तीनें निस्तेज झालेला, यज्ञामध्यें विघ्न करणारा व

तुझा शत्रु अशा ह्या इंद्राला आम्ही नित्यसिद्ध अशा आपल्या मंत्रांनीं येथें बोलावून आणितों; आणि नंतर, हे राजा, त्या तुझ्या शत्रूचा आम्ही बलात्कारानें अग्नीमध्यें होम करून टाकितों ॥ २८ ॥ हे विदुरा, याप्रमाणें यजमानाला सांगून त्या ऋत्विजांनीं क्रोधानें हातांत स्रुच् आदिकरून पात्रें घेतलीं आणि इंद्राचा होम करण्यासाठीं त्याचें आवाहन करण्यास ते प्रवृत्त झाले. त्या वेळीं पृथुराजाच्या त्या ऋत्विजांचा, ब्रह्मदेवानें पुढें होऊन निषेध केला ॥२९॥ ब्रह्मदेव म्हणाला,–हे ऋत्विज हो, यज्ञाच्या योगानें ज्यांची आराधना करावयाची ते सर्व देव म्हणजे ह्या इंद्राचे करचरणादिक अवयव होत. अर्थात् यज्ञाच्या रक्षणाकरितां तुम्ही ज्याला मारण्याची इच्छा करितां तो इंद्र तुम्हांपासून वध पावण्यास योग्य नाहीं. कारण, हा यज्ञनामक इंद्र प्रत्यक्ष भगवंताचा अवतार आहे ॥ ३० ॥ तेव्हां हे ब्राह्मण हो, पृथुराजाच्या यज्ञकर्मामध्यें विघ्न करण्याची इच्छा करणाऱ्या इंद्रानें धर्मनाशक पाखंड मार्ग उत्पन्न करून केवढा मोठा हा अनर्थ उत्पन्न केला आहे पाहा ! ह्यास्तव आतां ह्या बलाढ्य इंद्राशीं तुम्ही सख्यच करावें, नाहीं तर तो आणखीहि पाखंड मार्ग उत्पन्न करील व त्याच्या योगानें लोकांमध्यें अनर्थ होईल ॥ ३१ ॥ यास्तव तुम्हीं आतां पुनः यज्ञकर्म चालविण्याच्या भरीस पडूं नका. ह्या महाकीर्तिमान् पृथुराजाचें हें अनुष्ठान, नव्याण्णव यज्ञांनींच पुरें होवो, असें ऋत्विजांस सांगून तो नंतर पृथुराजास म्हणाला,–हे राजा, तूं मोक्षधर्म जाणणारा आहेस; ह्याकरितां उत्तमप्रकारें केलेले हे नव्याण्णव क्रतुच तुला आतां पुरेसे झाले आहेत ॥ ३२ ॥ हे राजा, तूं आणि इंद्र हे उभयतांहि सुकीर्तिमान् परमेश्वराचेच अवतार आहां. म्हणून त्या आत्मस्वरूपी इंद्रावर रोष करणें तुला योग्य नाहीं. राजा, तुझें कल्याण असो ॥ ३३ ॥ हे राजाधिराजा, ' आरंभिलेलें यज्ञकर्म समाप्त कसें होईल ' अशी आतां तूं चिंता करूं नकोस. तूं आदरयुक्त होऊन आमचें वचन श्रवण कर. अरे, जें कार्य दैवानेंच मोडून टाकिलेलें असतें, तें सिद्ध करण्याबद्दल मनुष्य विचार करूं लागला, तर त्याचें मन अतिशय क्रोधाविष्ट होऊन घोर मोहांत मात्र पडतें ॥ ३४ ॥ हे राजा, यास्तव इंद्रानें निर्माण केलेल्या पाखंडाच्या योगानें ह्या तुझ्या यज्ञामध्यें धर्माचा विनाश झाला आहे; आणि यापुढें अनुष्ठान बंद केलें नाहीं, तर आणखीहि धर्माचा नाश होईल, यास्तव हा यज्ञ आतां राहूं दे. हें तुला सांगण्याचें कारण इतकेंच कीं, देवांच्या ठिकाणीं रजोगुणांचा उत्कर्ष असल्यामुळें ते अतिशय दुराग्रही आहेत, म्हणून त्यांस कांहीं सांगून उपयोग होणार नाहीं ॥ ३५ ॥ हे राजा, जो तुझ्या यज्ञाचा द्रोह करणारा व अश्व चोरणारा इंद्र त्यानें उत्पन्न केलेल्या ह्या मनोहर पाखंडांनीं ह्या लोकांचें मन किती बरें आकर्षण केलें आहे पाहा ! ॥३६॥ हे पृथुराजा, शास्त्राप्रमाणें चाललेला लोकांचा धर्म वेनराजाच्या दुराचरणानें लुप्त होऊं लागला, म्हणून त्याचें रक्षण करण्याकरितां त्या वेनाच्याच देहापासून सांप्रत ह्या भूमीवर विष्णूचा अवतार असा तूं उत्पन्न झाला आहेस ॥ ३७ ॥ हे प्रजापालक प्रभो, यास्तव तूं ह्या जगाच्या रक्षणाबद्दल विचार करून ज्या विश्वसृष्ट्या भृग्वादि ऋषींनीं तुला वेनाच्या शरीराचें मंथन करून उत्पन्न केलें आहे, त्याचा

प्रजापालनरूप संकल्प पूर्ण कर आणि अधर्माला प्रसवणारी जी प्रचंड पाखंड मार्गरूप इंद्राची माया तिचें निवारण कर ! ॥ ३८ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें ब्रह्मदेवानें त्या पृथुराजाला उपदेश केला असतां पृथूनें यज्ञ पुढें चालविण्याचा आग्रह सोडून इंद्राशीं संधि केला ॥ ३९ ॥ नंतर त्या पृथूच्या यज्ञामध्यें हविर्भाग देऊन ज्या वर देणाऱ्या देवांना संतुष्ट केलें होतें, त्या देवांनीं, अवभृथस्नान केलेल्या त्या महापराक्रमी पृथुराजाला वर दिले ॥ ४० ॥ हे विदुरा, तसेच ज्यांचे आशीर्वाद यथार्थ आहेत व ज्यांस त्या राजाकडून श्रद्धापूर्वक दक्षिणा व सत्कार प्राप्त होत आहे, अशा त्या ब्राह्मणांनींहि संतुष्ट होऊन त्या आदिराजाला आशीर्वाद दिले ॥ ४१ ॥ ते म्हणाले, – हे महापराक्रमी राजा, तूं बोलाविलेले पितर, देव, ऋषि व मानव हे सर्व येथें आले व तूंहि दान आणि मान यांच्या योगानें त्या सर्वांचें यथायोग्य पूजन केलें आहेस ॥ ४२ ॥

## एकोणिसावा अध्याय समाप्त

# अध्याय २० वा

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, केवळ देवांनींच त्या पृथुराजाला वर दिले असें नाहीं, तर वैकुंठाधिपति, यज्ञभोक्ता, यज्ञाचा अधिपति व सर्वव्यापक असा भगवान् विष्णुहि पृथुराजाच्या यज्ञानें इंद्रासहवर्तमान संतुष्ट होऊन, वर देण्याच्या इच्छेनें त्या राजाला म्हणाला ॥ १ ॥

श्रीभगवान् म्हणाले—हे राजा, ज्या अर्थी ह्या इंद्रानें तुझ्या शंभराव्या अश्वमेधाचा भंग केला, त्या अर्थी आतां लज्जित होऊन 'तुम्ही दोघेहि माझेच अवतार आहां' म्हणून आपल्याच स्वरूपभूत अशा तुझ्याजवळ हा क्षमा मागत आहे. वरितां ह्याच्या अपराधांची क्षमा करणें तुला योग्य आहे ॥ २ ॥ हे राजा, ज्या अर्थी शरीर हा आत्मा नव्हे, त्या अर्थी ह्या लोकीं पुरुषांमध्यें श्रेष्ठ असे जे विचारशील साधु आहेत, ते कोणत्याहि प्राणिमात्राचा द्रोह करीत नाहींत ॥ ३ ॥ जर तुझ्यासारखे विवेकी पुरुष देवाच्या मायेनें देहादिकांच्या ठिकाणीं अभिमान धरून द्रोह करण्यास प्रवृत्त होतील, तर त्यांना बहुतकालपर्यंत केलेल्या वृद्धांच्या सेवेचें कांहींच फळ न मिळतां केवळ श्रमच झाला असें समजलें पाहिजे ॥ ४ ॥ म्हणून हे राजा, अज्ञान, विषयवासना व कर्मे ह्यांच्या योगानें हा देह उत्पन्न झाला आहे, असें जाणणारा ज्ञानी पुरुष ह्या देहाच्या ठिकाणीं कधींहि आसक्त होत नाहीं ॥ ५ ॥ ज्ञानी पुरुष ह्या शरिरावर देखील प्रेम ठेवीत नाहीं, तो ह्या शरिरानें निर्माण केलेल्या घरावर, मुलाबाळांवर किंवा द्रव्यावर ममता कसा करील ? ॥ ६ ॥ आत्मा देहाहून अगदीं भिन्न आहे. कारण, तो एक, शुद्ध, स्वप्रकाश, निर्गुण, गुणांचा आधार, सर्वव्यापक, आवरणरहित व दुसऱ्या आधारभूत आत्म्यानें रहित असा आहे आणि देह अनेक प्रकारचा, मलिन, जड, सगुण, गुणांच्या आश्रयानें राहणारा, मर्यादित स्वरूपाचा, वस्त्रादिकांनीं आच्छादिलेला, दृश्य व चलनवलनादि करणाऱ्या प्रेरक आत्म्यानें युक्त असा आहे ॥ ७ ॥ या प्रकारें आपल्या ठिकाणीं असणाऱ्या आत्म्याला जो पुरुष जाणतो तो जरी देहामध्यें वास करीत असला, तथापि त्या देहाच्या सुखदुःखादि विकारांनीं लिप्त होत नाहीं. कारण, त्याचा लय माझ्या स्वरूपीं लागलेला असतो ॥ ८ ॥ हे राजा, जो पुरुष निष्काम बुद्धीनें व श्रद्धायुक्त अंतःकरणानें आपल्या धर्मानुसार माझी नित्य आराधना करितो, त्याचें मन हळूहळू प्रसन्न होत जातें ॥ ९ ॥

मन शुद्ध झालें, म्हणजे तो पुरुष विषयांपासून विरक्त होऊन उत्तम ज्ञानसंपन्न होतो व त्यामुळें त्याला शान्तिसुख प्राप्त होतें आणि 'साम्यावस्थारूप जें ब्रह्मस्वरूप त्याला जाऊन तो पोंचतो ॥ १० ॥ देह, ज्ञानेन्द्रियें, कर्मेन्द्रियें व मन ह्यांस पाहणारा असूनहि

त्याच्या ठिकाणीं उदासीन असणाऱ्या अशा ह्या निर्विकारी आत्म्याला जो जाणतो, त्याला ब्रह्मस्वरूप प्राप्त होतें ॥ ११ ॥ हे राजा, पंचमहाभूतें, ज्ञानेंद्रियें, कर्मेन्द्रियें, त्यांच्या अभिमानी देवता व चैतन्याभासरूप अन्तःकरण ह्यांनीं युक्त व आत्म्याहून भिन्न अशा लिंगदेहाला जन्ममरण, सुखःदुख इत्यादि रूप संसार लागू आहे, आत्म्याला नाहीं असें जाणून माझ्या ठिकाणीं दृढ प्रेम ठेवणारे विचारी पुरुष, संपत्ति किंवा विपत्ति प्राप्त झाली असतांहि हर्षशोकादि विकार पावत नाहींत ॥ १२ ॥ यास्तव हे वीरा, तूं सुख आणि दुःख हीं सारखींच आहेत असें मानून उत्तम, मध्यम व अधम अशा त्रिविध जनांवर समदृष्टि ठेव आणि इंद्रियें व मन यांचा जय कर. तसेंच मी जो ईश्वर त्यानें प्राप्त करून दिलेल्या अमात्यादि सर्व लोकांच्या साहाय्यानें सर्व प्रजेचें रक्षण कर ॥१३॥ हे राजा, प्रजापालन करणें हेंच राजाला कल्याणकारक आहे. कारण, प्रजारक्षण करणाऱ्या राजाला परलोकाच्या ठिकाणीं प्रजांनीं केलेल्या पुण्याचा सहावा भाग प्राप्त होतो आणि ह्याच्या विरुद्ध वागून जर तो प्रजेचें रक्षण न करतां तिच्यापासून कर मात्र घेऊं लागला, तर, प्रजा त्याचें पुण्यहरण करतात व प्रजांनीं केलेल्या पापांचीं फळें त्याला भोगावीं लागतात ॥ १४ ॥ ह्याकरितां थोरथोर ब्राह्मणांना मान्य व परंपराप्राप्त अशा धर्माचें मुख्यत्वेंकरून पालन करून अर्थकामदिकांच्या ठिकाणीं आसक्त न होतां तूं पृथ्वीचें रक्षण कर, म्हणजे सर्व लोक तुझ्यावर प्रीति करितील ॥ १५ ॥ हे नरश्रेष्ठा, तूं मजपासून कांहीं तरी वर मागून घे. तुझे शान्त्यादिक गुण व निर्मत्सरत्वादिक स्वभाव पाहून मी तुला वश झालों आहें ! सुखदुःखदिकांच्या ठिकाणीं समबुद्धि धारण करणाऱ्या पुरुषास मी जसा सुलभ आहें, तसा यज्ञ, तपश्चर्या आणि योगाभ्यास यांच्या योगेंकरून सुद्धां सुलभ नाहीं ॥ १६ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, सर्व लोकांमध्यें ज्यांची आज्ञा चालत आहे व सर्व लोकांचा गुरु अशा भगवंतानें त्या जगद्विजयी पृथुराजाला असा उपदेश केला असतां, त्यानेंहि त्या श्रीहरीची आज्ञा शिरसा मान्य केली ॥ १७ ॥ आणि स्वतःच्या अश्वहरणरूप कर्मानें लज्जित होऊन क्षमा मागण्याकरितां इंद्र त्याच्या पायां पडूं लागला असतां, त्या पृथुराजानें त्याला प्रेमपूर्वक आलिंगन दिलें आणि त्याविषयींचा द्वेष अगदीं सोडून दिला ॥ १८ ॥ नंतर क्षणोक्षणीं वृद्धिंगत होणाऱ्या भक्तीनें ज्याचें चरणकमळ पृथुराजानें धरिलें आहे व ज्याला पूजा अर्पण केली, असा सज्जनांचा मित्र, जगदात्मा, कमळपत्राक्ष तो षड्गुणैश्वर्यसंपन्न विष्णुहि तेथून निघून वैकुंठास जाण्याविषयीं उद्युक्त झाला; परंतु त्या राजावर कांहीं तरी अनुग्रह करावा या बुद्धीनें थोडा विलंब करीत तो त्याच्याकडे पाहात कांहीं वेळ तसाच थांबला ॥ १९ ॥ २० ॥

त्या वेळीं पृथुराजा त्याच्यापुढें हात जोडून उभा राहिला आणि आपल्यावर देवाची मोठी कृपा आहे असें पाहून त्याचे नेत्र अतिशय प्रेमामुळें आनंदाश्रूंनीं भरून आले. त्याला श्रीहरीकडे अवलोकनहि करवेना व कंठ सद्गदित झाल्यामुळें कांहीं भाषणहि

करवेना. शेवटीं तो स्तब्ध उभा राहिला आणि हरीला हृदयानें दृढ आलिंगन देऊन त्यानें आपल्या हृदयामध्येंच त्याची स्थापना केली ॥ २१ ॥ नंतर राजानें आपल्या अश्रुधारा पुसून टाकिल्या आणि पाहण्याविषयीं तृप्ति न पावणाऱ्या आपल्या दृष्टीला विषयभूत, पायानें भूमीला स्पर्श करणाऱ्या व गरुडाच्या स्कंधावर आपल्या हस्ताचा अग्रभाग ( चवंगा ) ठेवून राहिलेल्या अशा पुरुषोत्तमाला अवलोकन करीत म्हणाला ॥ २२ ॥

पृथु म्हणाला,—हे समर्थ ईश्वरा, ज्ञानवान् पुरुष, वरदात्या ब्रह्मादिकांनाहि इच्छित वर देणाऱ्या तुजपासून देहाभिमानी पुरुषांनीं उपभोग घेण्यास योग्य असे वर कसा बरें मागून घेईल ? यास्तव हे मोक्षाधिपते, नरकामध्यें वास करणाऱ्या प्राण्यांना सुद्धां जे विषयभोग प्राप्त होतात ते मी तुजपासून मागून घेणार नाहीं ॥ २३ ॥ हे नाथा, अत्यंत श्रेष्ठ साधूंच्या हृदयांतून मुखद्वारा बाहेर पडलेला तुझ्या चरणकमलाचा मकरंद जेथें मिळत नाहीं तें मोक्षपद देखील मी तुझ्यापासून मागून घेऊं इच्छीत नाहीं, तर तुझें यश ऐकावें म्हणून मला दहा हजार कान दे, हाच वर मला पाहिजे आहे. ॥ २४ ॥ कारण, हे पुण्यकीर्ते ईश्वरा, साधूंच्या मुखांतून बाहेर पडलेला तुझ्या चरणकमलासंबंधीं अमृतकणांनीं युक्त असा जो वारा तो तत्त्वमार्गाचें विस्मरण पडलेल्या भ्रष्ट योग्यांना देखील पुनः आत्मज्ञानाची स्फूर्ति करून देतो. यास्तव आम्हां सारग्राही भक्तांना भक्तीवांचून दुसऱ्या वरांचें प्रयोजन नाहीं. भक्तीमध्येंच मोक्षसुद्धां सर्व सुखें आहेत ॥ २५ ॥ यास्तव हे मङ्गलकीर्ते, सर्व पुरुषार्थ आपणांस प्राप्त व्हावे या इच्छेनें प्रत्यक्ष लक्ष्मीनेंहि तुझ्या यशःश्रवणाचाच वर मागून घेतला आहे. सत्समागम झाल्यामुळें तुझें तें कल्याणकारक यश, ज्याला एकवार तरी श्रवण करावयास मिळालें, असा कोणता गुणज्ञ पुरुष त्या यशाला कंटाळेल ? ॥ २६ ॥ यास्तव लक्ष्मीप्रमाणें तुझ्या भजनाविषयीं उत्सुक होऊन, सर्व पुरुषांमध्यें श्रेष्ठ अशा तुझेंच मी सेवन करीन; परंतु एकाच पतिविषयीं स्पर्धा करणाऱ्या व तुझ्या एकट्याच्याच चरणाच्या ठिकाणीं एकसारखा मनाचा लय लावून ठेवणाऱ्या ( लक्ष्मीचा व माझा ) कलह मात्र होऊं नये ॥ २७ ॥

हे जगन्नाथा, पण त्या जगन्मातेशीं माझें वैमनस्य येणारच. कारण तुझी सेवा हें जें तिचें कर्म त्याविषयीं मलाहि इच्छा झाली आहे. तूं दीनवत्सल असल्यामुळें भक्तांचें सेवादिक कर्म अति स्वल्प असलें तरी तें तूं पुष्कळ असें मानितोस. ( त्यामुळें लक्ष्मीचा व माझा विरोध आला असतां तूं माझाच पक्ष स्वीकारशील; कारण ) स्वस्वरूपींच रममाण असलेल्या लक्ष्मीची काय गरज आहे ? ॥ २८ ॥ आणि म्हणूनच निरिच्छ असे साधु, ज्ञान प्राप्त झाल्यावरहि मायागुणांच्या विलासांचें कार्य जेथें नाहींसें झालें आहे, अशा तुझीच भक्ति करीत असतात. त्यांना तुझ्या चरणाच्या सतत स्मरणाशिवाय दुसरें कांहीं फळ असेल असें आम्हांस तरी वाटत नाहीं ॥ २९ ॥ हे परमेश्वरा, तूं स्वतःचें भजन करणाऱ्या मला 'वर माग' असें म्हणतोस, त्या अर्थीं, ती तुझी वाणी जगाला मोह करणारी आहे असें मला वाटतें. हे देवा, ही वाणी तर काय

परंतु तुझी वेदरूप वाणीहि लोकांना मोहित करून बद्ध करित्ये. जर तुझ्या वेदवाणीरूप दावणीनें लोक बद्ध झालेले नाहींत म्हणावें, तर वारंवार फलप्राप्तीच्या आशेनें मोहित होऊन ते कर्में कशीं करितील ? ॥ ३० ॥ हे ईश्वरा, मूर्ख लोक ज्या अर्थीं पुत्र, स्त्री इत्यादिकांची इच्छा धरितात त्या अर्थीं तुझ्या मायेनें त्यांना सत्यस्वरूपी अशा तुजपासून निराळें काढिलेलें आहे यांत संशय नाहीं. यास्तव माझें म्हणणें इतकेंच आहे कीं, मायेनें ज्याला फसविलें आहे त्याला तूं आणखी फसवूं नकोस ! तर ज्याप्रमाणें पिता आपणच होऊन आपल्या पुत्राचें हित करितो, त्याप्रमाणें आमचें हित करणें हेंच तुला योग्य आहे ॥ ३१ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें त्या आदिराज पृथूनें जगद्दष्टया परमेश्वराची स्तुति केली असतां, तो त्याला म्हणाला,–हे राजा, माझ्या ठिकाणीं तुझी भक्ति असो. तूं माझ्याविषयीं अशी प्रेमयुक्त बुद्धि धारण केलीस हें फार चांगलें झालें. या बुद्धीच्या योगेंकरून दुस्तर अशाहि माझ्या मायेला तरून जातां येतें ॥ ३२ ॥ हे राजा, तरी तूं विषयांच्या ठिकाणीं आसक्त न होतां मी सांगितलेल्या मार्गानें प्रजेचें पालन कर. माझ्या आज्ञेप्रमाणें वर्तणूक करणारे लोक, या लोकीं व परलोकीं सुख पावतात ॥ ३३ ॥

मैत्रेय म्हणाला,— हे विदुरा, याप्रमाणें पृथुराजानें यथार्थ वचनांनीं भगवंताची स्तुति केली असतां भगवंतानें, त्या सर्वांना सुखकारक अशा वचनांचा सत्कार करून व त्यांच्यावर अनुग्रह करून स्वस्थानीं परत जाण्याचा विचार केला ॥३४॥ तेव्हां देव, पितर, गंधर्व, सिद्ध, चारण, सर्प, किन्नर, अप्सरा, मनुष्य, पक्षी, अनेक प्रकारचे प्राणी आणि विष्णूचे पार्षद या सर्वांचा राजानें ' हे भगवंताचेच अंश आहेत ' अशा बुद्धीनें स्तुति, दक्षिणादान व हात जोडून नमस्कार यांच्या योगानें भक्तिपुरःसर सत्कार केला आणि ते सर्व तेथून आपापल्या स्थानीं निघून गेले ॥ ३५ ॥ ३६ ॥ नंतर समर्थ असा अच्युत भगवानहि उपाध्याय व ऋत्विज यांसहित असलेल्या त्या राजर्षि पृथूचें मन हरण करीतच जणूं काय आपल्या वैकुंठलोकास निघून गेला ॥ ३७ ॥ नंतर ज्यानें आपलें स्वरूप प्रत्यक्ष दाखविलें आहे, त्या दृष्टिमार्गाचें उल्लंघन करून गेलेल्या, निराकार देवाधिदेव वासुदेवाला नमस्कार करून पृथुराजानेंहि आपल्या नगरामध्यें प्रवेश केला ॥ ३८ ॥

**विसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २१ वा

मैत्रेय म्हणाला,— हे विदुरा, त्या वेळीं पृथुराजाचें नगर जागोजागीं मोत्यांचे सर, फुलांच्या माळा, रेशमी वस्त्रें, सुवर्णपुष्पांचीं तोरणें व अत्यंत सुगंधकारक धूप, यांनीं सुशोभित केलेलें होतें ॥ १ ॥ त्या नगरांतील गल्ल्या, अंगणें व राजमार्ग यांवर चंदन आणि कृष्णागरु यांच्या उदकांचा सडा घातलेला असून जेथें तेथें मांडून ठेविलेलीं फुलें, अक्षता, फळें, अंकुर, लाह्या व दीप यांमुळें त्याला सर्वत्र शोभा आली होती ॥२॥ त्यामध्यें कित्येक ठिकाणीं फुलांफळांसुद्धां केळींचे खांब व पोफळींचे रोपे उभे केलेले असून चोहोंकडे आम्रवृक्षादिकांच्या कोमल पल्लवांचीं तोरणें उभारून त्याला शोभा आणिली होती ॥ ३ ॥ त्या नगरामध्यें पृथुराजानें प्रवेश केला तेव्हां त्याला सर्व लोक व कानांत दैदीप्यमान कुंडलें घातलेल्या सुंदर कुमारिका, आरती, भेटीच्या वस्तु आणि मंगलसाहित्यें घेऊन सामोऱ्या गेल्या ॥ ४ ॥ नंतर महाप्रतापी पण गर्वरहित अशा त्या राजानें, शंख, दुंदुभि इत्यादिक वाद्यांचा गजर, ऋत्विज ब्राह्मणांचा वेदपाठ व सूत, मागध व बंदी यांचा स्तुतिपाठ चालला असतां, राजमंदिरामध्यें प्रवेश केला ॥ ५ ॥ गृहप्रवेशाच्या प्रसंगीं अनेक ठिकाणीं पुरवासी व देशवासी लोकांनीं त्याची पूजा केली आणि त्या महायशस्वी राजानें त्यांच्यावर संतुष्ट होऊन व त्यांना इच्छित वर देऊन त्यांचा यथायोग्य सत्कार केला ॥ ६ ॥ असो. निर्दोष आचरणाच्या आणि थोर गुणांमुळें पूज्य झालेल्या अशा त्या पृथुराजानें सर्वोपयोगी अशीं अनेक मोठमोठीं कर्मे करून भूमंडळाचें पालन केलें आणि पृथ्वीवर आपली उज्ज्वल कीर्ति स्थापन करून, शेवटीं वैकुंठनामक श्रेष्ठ पदावर आरोहण केलें ॥ ७ ॥

हे सभापते शौनका, तो महाभगवद्भक्त विदुर, ज्ञानवैराग्यादि सर्व गुणांनीं परिपूर्ण व गुणी लोकांनीं प्रशंसा केलेलें असें तें आदिराज पृथूचें यश वर्णन करणाऱ्या मैत्रेय-ऋषीचा सत्कार करून म्हणाला ॥८॥

विदुरा म्हणाला,—हे ऋषे, सर्व देवांनीं ज्याचा मोठा सत्कार केला व ज्यानें आपल्या बाहूंनीं पृथ्वीचें दोहन केलें, त्या विष्णूचें तेज धारण करणाऱ्या पृथुराजाला ब्राह्मणांनीं अभिषेक करून राज्यावर बसविलें ॥ ९ ॥ मैत्रेयमुने, ज्याच्या पृथ्वीदोहनरूप पराक्रमानें उत्पन्न झालेल्या भोगवस्तूंवर सर्व राजे व इंद्रादि लोकपालांसहवर्तमान सर्व प्राणी अद्यापि उपजीविका करितात, त्या पृथूची कीर्ति कोणता गुणग्राही पुरुष श्रवण करणार नाहीं बरें ? यास्तव त्याचें तें शुद्ध कर्म तूं मला कथन कर ! ॥ १० ॥

मैत्रेय म्हणाला,— हे विदुरा, गंगा व यमुना या नद्यांच्या मध्यभागीं असलेल्या क्षेत्रामध्यें वास करणारा तो पृथुराजा, स्वतःच्या प्रारब्धकर्मानें प्राप्त झालेल्या भोगांचा मात्र

उपभोग घेत असे. भोग भोगणें हें तरी त्याचें कार्य पुण्यक्षय होण्याच्या इच्छेनेंच असे. सुखाच्या आसक्तीनें नसे ॥ ११ ॥ त्याच्या आज्ञेचा कोठेंहि भंग होत नसे. ब्राह्मणाच्या कुलाखेरीज व ज्यांचें कुलदैवत अच्युत भगवान् आहे, त्या भगवद्भक्तांखेरीज, साती द्वीपांच्या पृथ्वीवर तो एकटाच सत्ता चालवीत होता ॥ १२ ॥ हे विदुरा, एकदां त्या राजानें महासत्र करण्यासाठीं दीक्षा घेतली. त्या सत्रामध्यें देव, ब्रह्मर्षि आणि राजर्षि यांचा एक मोठा समाज जमला होता ॥ १३ ॥ त्या ठिकाणीं सर्व पूज्य लोकांचें त्यानें यथायोग्य पूजन केल्यावर जसा नक्षत्रसमुदायांत चंद्र उदय पावतो, त्याप्रमाणें पृथुराजा सभेमध्यें उठून उभा राहिला ॥ १४ ॥ तो शरिरानें उंच होता. त्याचे भुज पुष्ट व लांब होते, त्याचा वर्ण गौर, नेत्र कमळासारखे तांबूस, नासिका सरळ, मुख प्रसन्न, मुद्रा शांत, स्कंध पुष्ट असून दंतपक्ति व हास्य सुंदर होतीं ॥ १५ ॥ त्याचें वक्षःस्थळ विशाळ व कटिप्रदेश विस्तीर्ण असून पोट त्याच्यावरील तीन वळ्यांनीं सुंदर व पिंपळाच्या पानासारखें वरतीं विस्तृत व खालीं संकुचित असें कमानदार होतें. त्याची नाभि भोंवऱ्यासारखी खोल, देह बलवान्, मांड्या सुवर्णासारख्या उज्ज्वल व पावलांचे चवडे उंच होते ॥ १६ ॥ त्याच्या मस्तकावरील केंस सूक्ष्म, कुरळे, काळे व तुळतुळीत असून कंठ शंखासारखा तीन रेषांनीं चिन्हित होता. तो एक मौल्यवान् वस्त्र नेसला असून दुसरें पांघरला होता ॥ १७ ॥ सत्रदीक्षा घेतल्यामुळें त्यानें अंगावरील भूषणें काढून ठेविलीं होतीं व त्यामुळें त्याच्या सर्व शरिराची खरी शोभा व्यक्त दिसत होती. त्यानें अंगावर कृष्णाजिन धारण केलें होतें, हातांत दर्भ घेतले होते व तो मोठा कांतिमान् असून त्यानें सर्व योग्य कर्मे केलीं होतीं ॥ १८ ॥ त्याच्या नेत्रांच्या बाहुल्या लोकांचा संताप दूर करणाऱ्या व पाणीदार होत्या. तो पृथुराजा, सभोंवार पाहून सभेला आनंद उत्पन्न करीत स्वतः अनुभव घेतलेल्या गोष्टींचा उच्चार करीत करीत त्या वेळीं सर्वांवर उपकार करण्यासाठीं भाषण करूं लागला. तें त्याचें भाषण, कानाला गोड लागणारें, चमत्कारिक पदांनीं युक्त, प्रशस्त, शुद्ध, गंभीर अर्थानें युक्त व निभ्रांत असें होतें ॥ १९ ॥ २० ॥

राजा म्हणाला,—हे सभासद हो, जे तुम्ही सज्जन येथें प्राप्त झालां आहां ते माझें भाषण श्रवण करा ! तुमचें कल्याण असो ! कारण धर्म जाणण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषांनीं सज्जनांना आपलें मनोगत सांगावें असें आहे ॥ २१ ॥ या मूलोकाच्या ठिकाणीं ऋषींनीं मला सर्व प्रजांचा राजा नेमिलें आहे. म्हणून मी दंड धारण करून त्यांचें रक्षण करतों व त्यांचा निर्वाह चालवून त्या मर्यादेंत ठेवितों ॥ २२ ॥ प्राचीन कर्मांचा साक्षीभूत असा जो परमात्मा तो ज्याला प्रसन्न होतो त्या ब्रह्मवेत्त्या पुरुषाला, जे लोक प्राप्त होतात असें म्हणतात, ते सर्वांचे मनोरथ परिपूर्ण करणारे लोक, मला मी प्रजांचें पालन केलें असतां, प्राप्त होवोत ! ॥ २३ ॥ जो राजा, धर्माविषयीं प्रजांना शिक्षण न देतां त्यांच्यापासून करभार मात्र ग्रहण करितो, त्याला प्रजांचें पाप भोगावें लागतें आणि तो आपल्या ऐश्वर्यापासून भ्रष्ट होतो ॥ २४ ॥ तस्मात् हे प्रजाजन हो, तुमचा पालक जो मी, त्या माझें परलोकीं हित होण्यासाठीं तुम्ही निर्दोष अन्तःकरणपूर्वक

ईश्वरार्पणबुद्धीनें आपल्या धर्माचेंच आचरण करीत जा म्हणजे मजवर तुम्ही अनुग्रह केल्याप्रमाणें होईल ॥ २५ ॥ हे देवऋषि पितर हो, हें माझें प्रजाशिक्षणरूप वाक्य जर चांगलें असेल तर याला आपल्या निर्मळ चित्तानें अनुमोदन द्या म्हणजे याच्यावर सर्वांचा विश्वास बसेल. कारण, कोणत्याहि कर्माचें परलोकीं जें फल प्राप्त होतें तें कर्म करणारा, शिक्षण देणारा व अनुमोदन देणारा यांस सारखेंच प्राप्त होतें ॥ २६ ॥ हे परमपूज्य जन हो, एखाद्या दुराग्रही पुरुषाच्या मतें नसो, परंतु कित्येक लोकांच्या मतें तरी यज्ञपति परमेश्वर म्हणून कोणी आहे. ह्या लोकीं व परलोकींहि विशेष तेजस्वी अशा भोगभूमि व शरिरें दिसून येतात. त्यांतहि ज्या वस्तूपासून ज्याला विशेष सुख होतें त्याच वस्तूपासून त्याला कालांतरीं दुःख होतें किंवा एकच वस्तु एकाएकीं एकाला अतिसुखकारक व दुसऱ्याला अतिदुःखकारक होते असें जगाचें विचित्रत्व आहे. तें त्या त्या कर्माचें फळ देणाऱ्या भगवंताच्या सत्तेवांचून घडणार नाहीं ॥ २७ ॥ मनु, उत्तानपाद, ध्रुवराजा, राजर्षि प्रियव्रत, आमच्या पित्याचा पिता अंगराजा, तसेंच ह्यांच्यासारखे धर्मनिष्ठ व विचारशील असे दुसरे राजे, ब्रह्मदेव, शंकर, प्रल्हाद व बलि ह्या सर्वांचें परमेश्वराशीं कर्तव्य आहेच, म्हणजे कर्मांचीं फलें देणारा परमेश्वर असलाच पाहिजे असें ह्या सर्वांचें मत आहे ॥ २८ ॥ २९ ॥ फार तर काय, परंतु धर्मज्ञानाविषयीं मूढ व सत्पुरुषांनीं 'त्यांचें कल्याण कसें होईल म्हणून' शोक करण्यास योग्य अशा वेनादिक राजावांचून इतर सर्वांचें मत 'कर्मफलदाता ईश्वर आहे' असेंच आहे. बहुतकरून धर्म, अर्थ, काम, स्वर्ग आणि मोक्ष यांचें फळ अधिकारपरत्वें देणारा सर्वव्यापक एक ईश्वर कारण असलाच पाहिजे ॥ ३० ॥ जशी ईश्वराच्या चरणांगुष्ठापासून निघालेली गंगा, उत्तरोत्तर वृद्धिंगत होऊन लोकांच्या पापांचा नाश करिते त्या सर्वव्यापी भगवंताच्या चरणाच्या सेवेची आवड प्रतिदिवशीं वृद्धिंगत होऊन संसारतापानें तप्त झालेल्या लोकांच्या बुद्धीवर पुष्कळ जन्मांनीं वाढलेल्या मळाचा तत्काळ नाश करून टाकिते ॥ ३१ ॥ नंतर मनाचे सर्व मळ नाहींसे झालेला पुरुष, वैराग्यानें दृग्गोचर झालेल्या भगवत्स्वरूपाच्या साक्षात्काररूप बळाच्या योगानें युक्त होऊन भगवंताच्याच चरणकमळांचा आश्रय करून राहतात आणि पुनः क्लेशदायक अशा संसारांत पडत नाहींत ॥ ३२ ॥ यास्तव, हे लोक हो,. ज्याचें चरणकमळ सर्वांचे मनोरथ परिपूर्ण करणारें आहे, त्या भगवंताचें तुम्ही 'अधिकारानुरूप आपणांस फळ प्राप्त होईल असा निश्चय करून' निष्कपटपणें स्वतःच्या अध्यापन वगैरे वृत्तींनीं मन, वाणी व शरीर यांच्या योगानें, ध्यानस्तुतिपूजारूप स्वधर्में करून आराधना करीत जा ! ॥ ३३ ॥ हा भगवानच स्वरूपानें अतिशुद्ध ज्ञानघन असल्यानें निर्गुण असतांहि या कर्ममार्गामध्यें तांदूळ, घृत, दहीं इत्यादिक द्रव्यें शुक्लादिक गुण, कंडनादिक क्रिया, मंत्र, प्रयाज, अनुयाज इत्यादिक अंगांनीं केलेली पूर्णता, संकल्प, पदांची अर्थबोधक शक्ति, ज्योतिष्टोम, वाजपेय इत्यादिक नांवें, अशा अनेक गुणांच्या योगें करून यज्ञरूपी बनतो ॥ ३४ ॥ हाच व्यापक भगवान्, प्रकृति, काल, वासना आणि पुण्यपापरूप जीवांचें अदृष्ट ह्यांच्या संग्रहामुळें जन्म पावलेल्या शरिराच्या ठिकाणीं चेतना पावतो व जसा एकच अग्नि

काष्ठांमध्यें त्यांच्या लांबी, वक्रता इत्यादि गुणांनीं युक्त होऊन, लांब, वक्र इत्यादि भासतो, त्याचप्रमाणें यज्ञादिकांच्या फलाच्या रूपानें तो नाना प्रकारें अनुभवास येतो ॥ ३५ ॥ अहो, या पृथ्वीतलावर दृढनिश्चयी असे हे माझे सर्व प्रजाजन स्वधर्माच्या योगेंकरून यज्ञामध्यें हविर्भाग ग्रहण करणाऱ्या देवांचा अधिपति अशा जगद्गुरु श्रीहरीचें निरंतर आराधन करितात, ते माझ्यावर मोठाच अनुग्रह करीत आहेत ॥ ३६ ॥ मोठमोठ्या समृद्धींनीं उत्कट झालेल्या राजांच्या कुलापासून निघालेलें जें तेज त्यानें, ज्यांचें आराध्य दैवत विष्णु आहे, अशा वैष्णवांच्या कुळामध्यें आणि सहनशीलता, तप आणि विद्या यांच्या योगानें स्वतःच दैदीप्यमान असलेल्या अशा ब्राह्मणांच्या कुळामध्यें आपला प्रभाव कधींहि चालवूं नये ॥ ३७ ॥ कारण, ब्रह्मादिकांना पूज्यतम, ब्राह्मणांचा कैवारी व पुराणपुरुष असा साक्षात् विष्णुहि निरंतर ज्या ब्राह्मणांच्या चरणांचें वंदन करून अखंड लक्ष्मी व जगाला पवित्र करणारें यश पावला व ज्या ब्राह्मणांच्या सेवेमुळें तो सर्वान्तर्यामी, स्वयंप्रकाश, ब्राह्मणप्रिय ईश्वर, फार संतुष्ट होतो, त्या ब्राह्मणांच्या कुळांची भगवत्तत्पर अशा तुम्ही नम्रपणें कायावाचामनेंकरून सेवा करावी ॥ ३८ ॥ ३९ ॥ ज्या ब्राह्मणांची नित्य निष्कपट भावानें सेवा केली असतां, पुरुष, ज्ञानाचा अभ्यास केल्याशिवाय आपोआपच शीघ्र शुद्धचित्त होऊन मोक्षाला पावतो, त्या ब्राह्मणकुलापेक्षां मोठ्या योग्यतेचें दुसरें देवांचें मुख जगामध्यें कोणतेंच नाहीं ! ॥ ४० ॥ सर्व उपनिषदांनीं ज्ञानघनत्वेंकरून सांगितलेला अनंत भगवान्, तत्त्ववेत्त्या पुरुषांनीं इंद्रादिकांची तृप्ति होण्याच्या उद्देशानें, ब्राह्मणांच्या मुखामध्यें श्रद्धापूर्वक हवन केलेलें अन्न जसें मनापासून भक्षण करितो, तसें चेतनाशक्तीनें रहित अशा अग्नीमध्यें हवन केलें असतांहि तें भक्षण करीत नाहीं ॥ ४१ ॥ हे श्रेष्ठ लोक हो, आरशामध्यें भासमान होणाऱ्या मुखाप्रमाणें ज्या वेदामध्यें हे विश्व भासमान होतें, त्या शुद्ध व सनातन वेदाला जे ब्राह्मण, श्रद्धा, तपश्चर्या, शुद्ध आचरण, वृथा भाषणाचा त्याग, इंद्रियांचा निग्रह आणि चित्ताची एकाग्रता, यांच्या योगेंकरून नित्य धारण करितात, त्यांच्या चरणकमळाची धूळ, मी आपल्या मुकुटावर, माझें आयुष्य आहे तोंपर्यंत धारण करीन ! कारण, ती धूळ निरंतर धारण करणाऱ्या पुरुषाचें पातक तत्काळ नष्ट होतें व सर्व गुण त्याच पुरुषाचा आश्रय करितात ॥ ४२ ॥ ४३ ॥ सर्व गुणांचा आश्रय, सुस्वभावरूप धनानें संपन्न, दुसऱ्याचे उपकार जाणणारा आणि वृद्ध जनांची सेवा करणारा, अशा पुरुषास सर्व संपत्ति आपण होऊन वरितात. म्हणून मी अशी इच्छा करितों कीं, ब्राह्मणांचें कुल, गाईचा समुदाय आणि भक्तमण्डळासह भगवान् विष्णु, हे मजवर प्रसन्न होवोत ॥ ४४ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें पृथुराजानें भाषण केलें असतां त्या उत्तम भाषणाच्या योगानें संतुष्टचित्त झालेले व सदाचारनिष्ठ असल्यामुळें शुद्धचित्त असे पितर, देव आणि ब्राह्मण त्याची स्तुति करूं लागले ॥ ४५ ॥ ते म्हणाले,—पुत्राच्या योगानें पित्याला उत्तम लोक प्राप्त होतात अशी श्रुति आहे, ती अगदीं खरी आहे. कारण, ब्राह्मणांच्या शापानें दग्ध झालेला पापी वेनराजासुद्धां पृथुनामक या पुत्राच्या योगेंकरून

नरकापासून तरला ॥ ४६ ॥ तसाच हिरण्यकशिपुमुद्धां भगवंताच्या निंदेमुळें नारका-मध्यें पडत होता; परंतु प्रल्हादनामक पुत्राच्या भगवद्भजनरूप प्रभावानें तो उद्धरून गेला ॥ ४७ ॥

हे वीरश्रेष्ठा, हे भूमिपालका पृथुराजा, सर्व लोकांचा मुख्य रक्षक अशा अच्युत भगवंताच्या ठिकाणीं ज्या तुझी अशी अतिअपूर्व भक्ति आहे, त्या तुला अनंतसंवत्सरपर्यंत आयुष्य असो ! ॥ ४८ ॥ हे पवित्रकीर्ते राजा, जो तूं पुण्यकीर्ति पुरुषांत अतिश्रेष्ठ व ब्राह्मणांचा हितकारी अशा विष्णूची कथा वर्णन करीत आहेस, त्या तुझ्यासारखा राजा आम्हांला मिळाल्यामुळेंच भगवान् मुकुंद आम्हांला नाथ लाभला आहे असें समजत आहों ॥ ४९ ॥ हे राजा, सेवकांना शिक्षण देणें हें तुझ्या ठिकाणीं कांहीं मोठेंसें आश्चर्य-कारक नाहीं. कारण, प्रजेवर प्रेम करणें हा दयाळू अंतःकरणाच्या सत्पुरुषांचा स्वभावच आहे ॥ ५० ॥ हे प्रभो, प्रारब्धकर्माच्या योगानें नष्टदृष्टि झालेला व संसारामध्यें भ्रमण पावणाऱ्या आम्हांला आज तूं भगवत्तत्त्वाचा उपदेश करून अज्ञानरूप अंधकाराचें परतीर दाखविलेंस ॥ ५१ ॥ यास्तव ब्रह्मकुल आणि क्षत्रियकुल या उभयतांत प्रवेश करून जो ह्या जगाचें परिपालन करितो, त्या सत्त्वगुणमय अशा परमपूज्य पुरुषोत्तमाला आमचा नमस्कार असो ! ॥ ५२ ॥

## एकविसावा अध्याय समाप्त

# अध्याय २२ वा

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें प्रजाजन, त्या महापराक्रमी पृथुराजाची स्तुति करीत आहेत इतक्यांत सूर्यासारखे तेजःपुंज असे चार सनकादिक मुनि तेथें प्राप्त झाले ॥ १ ॥ तेव्हां सेवकांसहित असलेल्या त्या राजानें, लोकांना निष्पाप करणाऱ्या कांतीनेंच हे सनकादिक ऋषि आहेत असें जाणविलेल्या व आकाशांतून खालीं उतरणाऱ्या त्या सिद्धेश्वरांना अवलोकन केलें ॥ २ ॥ आणि जसा जीव, सुगंधादि विषयांना उत्सुकतेनें सामोरा जातो, त्याप्रमाणें त्या मुनींच्या दर्शनानें निघून जात असलेल्या आपल्या प्राणांना फिरून ग्रहण करण्याच्या इच्छेनेंच कीं काय, तो राजा सभासद व सेवक यांसह उठून उभा राहिला ॥ ३ ॥ नंतर मुनींच्या महत्त्वामुळें त्यांच्या अंकित झालेल्या व नम्रतेनें आपली मान खालीं वांकविणाऱ्या त्या सभ्य राजानें आसनाचा व अर्घ्याचा स्वीकार करणाऱ्या त्या मुनीची यथाविधि पूजा केली ॥४॥ आणि त्यांच्या पादप्रक्षालनोदकानें ज्याच्या केशबंधाचें क्षालन झालें आहे, असा तो राजा, त्या सभेमध्यें सदाचारसंपन्न पुरुषांचा आचारच फार चांगला आहे, असा त्या सदाचाराचा बहुमान करून स्वतःहि त्याप्रमाणेंच त्याचें आचरण करिता झाला ॥ ५ ॥

नंतर श्रध्दा आणि इंद्रियनिग्रह यांनीं युक्त असा तो राजा, संतुष्ट होऊन 'आपापल्या स्थानीं स्थित असलेल्या तीन अग्नींप्रमाणें' सुवर्णाच्या आसनांवर बसलेले व शंकराचे वडील बंधु अशा त्या सनकादिकांस म्हणाला ॥ ६ ॥

पृथु म्हणाला,—अहो मुनि हो, आपलें आगमन केवळ मंगलरूप आहे. योगी जनांच्याहि दृष्टीस पडण्यास कठीण अशा तुमचें ज्या मला दर्शन झालें, त्या मीं पूर्वीं काय बरें पुण्यकर्म केलें होतें ? ॥ ७ ॥ आज तर मी खरोखर कृतार्थ झालों आहें. कारण, ज्याच्यावर तुमच्यासारखे ब्राह्मण, तसेंच भक्तांसहवर्तमान शंकर आणि विष्णु हे प्रसन्न होतात त्या पुरुषाला या लोकीं किंवा परलोकीं अतिदुर्लभ असें काय बरें आहे ? ॥८॥ हे ब्रह्मनिष्ठ मुनि हो, या जगाला कारणभूत जे महत्तत्त्वादिक सर्व देव, ते जसे सर्वसाक्षी परमात्म्याला जाणत नाहींत, त्याप्रमाणें सर्वांवर उपकार करण्याकरितां लोकांमध्यें पर्यटण करणाऱ्या तुम्हांला 'हे अशा सामर्थ्याचे आहेत' असें हा जनसमूह जाणत नाहीं ॥९॥ अहो, ज्यांच्या घरांमध्यें आपल्यासारख्या पूज्य जनांना स्वीकार करण्यास योग्य अशीं जल, तृणादिकांचीं आसनें, भूमि, गृहस्वामि व सेवक हीं असतात, ते सदाचारसंपन्न गृहस्थाश्रमी लोक निर्धन जरी असले तथापि धन्य होत ॥ १० ॥ आणि जीं घरें भगवद्भक्तांच्या चरणतीर्थानें रहित आहेत तीं जरी सर्व संपत्तीनें परिपूर्ण असलीं तथापि तीं सर्वांना आश्रयभूत असलेल्या वृक्षांसारखीं घातक होत ॥ ११ ॥ हे द्विजश्रेष्ठ हो,

तुमचें आगमन झालें हें फार चांगलें झालें. कारण, तुम्हीं बाल्याअवस्थेपासून मुमुक्षु असून इंद्रियांचा निग्रह करणारे व नैष्ठिक ब्रह्मचर्यादिक मोठमोठीं व्रतें श्रद्धापूर्वक आचरण करणारे आहां ॥ १२ ॥ तुम्हीं आमचे धनी आहां, तेव्हां दुःखाचें क्षेत्र अशा या संसारामध्यें स्वकर्मांच्या योगेंकरून पडलेल्या व इंद्रियांचे उपभोग्य जे विषय हेच पुरुषार्थ असें मानणाऱ्या आमचें कल्याण कोणत्या तरी उपायानें होईल काय तें सांगा ॥ १३ ॥ हे ब्रह्मनिष्ठ ऋषि हो, आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं रममाण असणाऱ्या तुम्हांला कुशल प्रश्न विचारण्याचें कारणच नाहीं. कारण कल्याणरूपी अशा बुद्धीच्या वृत्ति आपल्या ठिकाणीं मुळींच नाहींत ॥ १४ ॥ यास्तव आपल्या भाषणावर विश्वास ठेवणारा मी, त्रिविध तापानें संतप्त झालेल्या लोकांचें या संसारामध्यें कोणत्या साधनानें अनायासानें कल्याण होईल, हेंच आपणांस विचारतों ॥ १५ ॥ अहो, आत्मवेत्त्या पुरुषांना अत्यंत प्रिय असा भगवान् नारायणच आपल्यासारख्या सिद्धांच्या स्वरूपानें आपल्या भक्तांवर अनुग्रह करण्याकरितां ह्या पृथ्वीवर संचार करितो, हें अगदीं निश्चित आहे. कारण, तो स्वतः जन्मादिविकाररहित असून भक्तांना आपल्या स्वरूपाचा प्रकाश करून देणारा आहे ॥ १६ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, पृथुराजानें, न्यायास अनुरूप, गंभीर अभिप्रायानें भरलेलें, थोडें व कानाला गोड लागणारें असें तें उत्तम भाषण श्रवण करून हास्य केल्याप्रमाणें प्रसन्नमुख होऊन, त्या सनत्कुमारमुनींनीं, आनंदानें त्या राजाला उत्तर दिलें ॥ १७ ॥

सनत्कुमार म्हणाले,—महाराज, सर्व भूतांचें हित करण्याची इच्छा करणारा व तें हित जाणत असणारा असा तूं हा फार चांगला प्रश्न केलास. ठीकच आहे. सत्पुरुषांची बुद्धि अशीच असत्ये ॥ १८ ॥ साधूंचा समागम, वक्ते आणि श्रोते या उभयतांनाहि मान्य असतो यांत संशय नाहीं. कारण, वक्त्याश्रोत्यांच्या संभाषणांत निघालेला उत्तम प्रश्न, तेथें असणाऱ्या सर्व लोकांचें कल्याण करितो ॥ १९ ॥ हे राजा, मधुसूदनाच्या चरणकमलाचे जे पराक्रम त्यांच्या श्रवणांविषयीं तुला प्रीति आहेच. ही प्रीति अभक्तांना दुर्लभ असून वस्त्राला लागलेल्या गैरिकादिक धातूंच्या डागाप्रमाणें अन्य उपायांनीं न जाणाऱ्या अशा अंतःकरणाच्या वासनात्मक मळाला सुद्धां नाहींशी करित्ये ॥ २० ॥ हे राजा, आत्मव्यतिरिक्त अशा देहादिकांविषयीं विरक्ति ठेवून निर्गुण ब्रह्मरूप आत्म्याच्या ठिकाणीं दृढ प्रीति जडविणें, हेंच उत्तम विचारांनीं ओतप्रोत * भरलेल्या शास्त्रांमध्यें मनुष्याच्या मोक्षरूप कल्याणाचें

---

* भगवत्कथामृताच्या संबंधानिमित्त जरी लोकांशीं सहवास करण्याचा प्रसंग आला तरी हरकत नाहीं. तेवढयापुरतें लोकांशीं दळणवळण ठेवावें; पण कथामृतप्राशनाचा योग बगळून इतर प्रसंगीं लोकसंबंध सोडून एकांतांत राहणें व आत्म्यामध्येंच रममाण होणें हें भगवंताच्या ठिकाणीं प्रीति उत्पन्न होण्याचें मुख्य साधन होय, असा ह्याचा तात्पर्यार्थ आहे.

साधन ठरविलें आहे ॥ २१ ॥ ही विरक्ति व प्रीति उत्पन्न होण्याचीं साधनें म्हणजे गुरूच्या व शास्त्रांच्या बचनावर विश्वास ठेवणें, भागवतधर्माचें आचरण करणें, भजनादि प्रकार जाणण्याची इच्छा करणें, यमनियमादिक योगाभ्यासांत तत्पर राहणें, योगेश्वर परमात्म्याची उपासना करणें, पुण्यकीर्ति अशा भगवंताच्या पवित्र चरित्रांचें नित्य श्रवण करणें, अर्थप्राप्तीमध्यें व इंद्रियांची तृप्ति करण्यामध्यें रमणाण असणाऱ्या तामस व राजस प्रकृतीच्या लोकांची संगति सोडून तशा लोकांना आवडणारे जे अर्थ व काम त्यांच्या ठिकाणीं आसक्ति न करणें, एकांतवासाची प्रीति धारण करणें, आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं समाधान मानणें, हरीच्या कथामृतांचें प्राशन करावयास मिळत असेल तरच समाजांत मिसळणें, हीं होत ॥ २२ ॥ २३ ॥ हिंसा न करणें, अनायासानें प्राप्त झालेल्या अन्नादिकांच्या योगानें वृत्ति चालविणें, आपल्या हिताचें अनुसंधान राखणें, मोक्षदात्या हरीच्या लीलारूपी उत्तम अमृताचें स्मरण करणें, कोणतीहि इच्छा न धरितां अहिंसा, सत्य, स्नान, संध्या इत्यादि यमनियमांचें सेवन करणें, दुसऱ्या पंथांची किंवा दुसऱ्या देवतांची निंदा न करणें, शरीरनिर्वाहाकरितांच कोणतेहि व्यापार करणें, शीत, उष्ण, क्षुधा, तृष्णा इत्यादि गोष्टी सहन करणें आणि भगवद्भक्तांच्या कर्णांना शोभविणाऱ्या अलंकारभूत अशा श्रीहरीच्या गुणानुवादांचा उच्चार करणें, यांच्या योगानें वृद्धिंगत झालेल्या भक्तीनें स्थूलसूक्ष्मरूपी अशा आत्मव्यतिरिक्त प्रपंचाच्या ठिकाणीं विरक्ति होते आणि निर्गुण ब्रह्मरूप आत्म्याच्या ठिकाणीं दृढ प्रीति अनायासानें प्राप्त होते ॥ २४ ॥ २५ ॥ हे राजा, जेव्हां ब्रह्माच्या ठिकाणीं निश्चल प्रीति होते, तेव्हां पुरुष, ब्रह्मनिष्ठ सद्गुरूचा आश्रय करून ज्ञान आणि वैराग्य ह्यांच्या योगानें, जसा प्रज्वलित झालेला अग्नि आपल्या उत्पत्तिस्थानरूप काष्ठाला जाळून टाकितो, त्याप्रमाणें, जीवाला आवरण करणारें, पंचमहाभूतात्मक अथवा अविद्या, स्मित, राग, द्वेष आणि आग्रह अशा पांच प्रकारचें जें अंतःकरण त्याला, अगदीं जाळून टाकितो ॥ २६ ॥ नंतर स्वप्नामध्यें भासलेल्या धर्मांना जागृत झालेला पुरुष, जसा पाहात नाहीं त्याचप्रमाणें ज्याचें अंतःकरण दग्ध झालें आहे व ज्यानें त्याचे कर्तृत्वादिक धर्म सोडून दिले आहेत, तो पुरुषभेद भासण्याचें कारण जें अंतःकरण, त्याचा नाश झाला म्हणजे देहाच्या बाहेर असलेल्या घटादि पदार्थांस व आंत असलेल्या सुखदुःखादि प्रकारास, मुळींच पाहत नाहीं ॥ २७ ॥ कारण, जो पुरुष, द्रष्ट्या आत्म्याला दृश्य अशा इंद्रियांच्या विषयांना व दोन्हींच्या संबंधाला कारण असलेल्या अहंकाराला पाहतो, तो अंतःकरणरूप उपाधि असली तरच पाहतो, नाहीं तर पाहत नाहीं ॥ २८ ॥ उदाहरण, पाणी किंवा आरसा असें कांहीं निमित्त असलें, तरच सर्व ठिकाणीं पुरुषाला, स्वतःचा किंवा दुसऱ्याचा भेद दिसून येतो. इतर वेळीं तसें होत नाहीं ॥ २९ ॥ जसें डोहाच्या तीरावरून असणारे लव्हाळे, आपल्या मुळांनीं कोणाला न समजतां डोहांतील उदक हळूहळू ओढून घेतात, त्याप्रमाणें ऐकिलेल्या किंवा अनुभविलेल्या विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरुषांचें मन विषयासक्त झालेल्या इंद्रियांनीं विषयांकडे आकर्षण केलें असतां, तें त्याच्या बुद्धीच्या विचारसामर्थ्याला न समजतांच

हरण करतें ॥ ३० ॥ विचारसामर्थ्य नाहींसें झालें म्हणजे पूर्वापरानुसंधानरूप स्मृति नाहींशी होत्ये आणि स्मृतीचा नाश होतांच स्वरूपज्ञानाचा नाश होतो. अशा प्रकारें ज्ञानाचा प्रतिबंध होणें ह्यालाच विद्वान् लोक, स्वतःच्या आत्म्याचा नाश करून घेणें असें म्हणतात ॥ ३१ ॥ ज्याकरितांच इतर सर्व विषय प्रिय वाटतात, त्या आत्म्याचें स्वरूप स्वतः लपवून ठेवणें यापासून जो स्वार्थाचा नाश आहे, त्यापेक्षां प्राण्याचा अधिक नाश या लोकीं कोणताच नाहीं ॥ ३२ ॥ धनाचें इंद्रियतृप्तीचें निरंतर चिंतन करणें हाच मनुष्यांच्या सर्व पुरुषार्थाचा नाश होय. कारण, त्या चिंतनानें शाब्दिक व अनुभविक अशा दोन्ही प्रकारच्याहि ज्ञानांपासून भ्रष्ट होऊन पुरुष स्वकर्मापासून च्युत होतो व वृक्षादि योनींत जन्मास जातो ॥ ३३ ॥ म्हणून भयंकर संसारांतून तरून जाण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांस अत्यंत घातक अशी जी वस्तु तिजवर कधींहि आसक्ति ठेवूं नये ॥ ३४ ॥ त्यांतहि मोक्ष हाच पुरुषार्थ कधींहि नष्ट न होणारा नसल्यामुळें सर्वोत्कृष्ट आहे. कारण, धर्मार्थकामरूप जे इतर तीन पुरुषार्थ त्यांना निरंतर नष्ट होण्याचें भय असतें ॥ ३५ ॥ सृष्टीच्या आरंभीं त्रिगुणांमध्यें क्षोभ झाल्यानंतर उत्पन्न झालेलें ब्रह्मदेवादिक उच्च प्राणी व आमच्यासारखे नीच प्राणी, त्यांच्या त्रिविध पुरुषार्थांचा सर्वसमर्थ कालानें नाश केला असल्यामुळें त्यांना सुख असें प्राप्त होत नाहीं ॥३६॥ म्हणून हे राजा, ज्या अर्थी विषयासक्ति अनर्थाला कारण आहे, त्याअर्थी तूं ती सोडून दे, आणि देह, इंद्रियें, प्राण, बुद्धि आणि अहंकार, यांनीं वेष्टन केलेल्या स्थावरजंगमात्मक जगाच्या हृदयामध्यें जो भगवान्, जीवांच्या अंतर्यामिरूपेंकरून, अंतर्मुखत्वेंकरून व व्यापकत्वेंकरून प्रत्यक्ष प्रकाश पावतो त्याला 'तोच मी आहें' असें जाण ॥ ३७ ॥ फुलांच्या माळेच्या ठिकाणीं जशी सर्पबुद्धि भासत्ये, त्याप्रमाणें ज्याच्या ठिकाणीं हें विश्व उत्कृष्टनिकृष्टभावानें किंवा कार्यकारणभावानें केवळ खोटेंच भासतें, व माळेवर भासलेला सर्प जसा विचारानें नाहींसा होतो, त्याप्रमाणें हा विश्वाचा भ्रम सुद्धां ज्याच्या तत्त्वविचारानें नाहींसा होतो, त्या नित्यमुक्त, अत्यंत शुद्ध, केवळ ज्ञानस्वरूप व ज्यानें कर्माच्या योगानें मलिन झालेल्या प्रकृतीचा निरास केला आहे, अशा त्या परमेश्वराला मी शरण आहें; अशी भावना कर ॥ ३८ ॥ ज्याच्या चरणकमलासंबंधीं अंगुलींच्या कांतीची स्मरणरूप भक्ति करून भक्तजन जसे कर्माच्या योगानें घट्ट झालेल्या आपल्या अहंकाररूप हृदयग्रंथीला नाहींसा करून टाकितात, त्याप्रमाणें ज्यांची बुद्धि निर्विषय झाली आहे व ज्यांनीं आपलीं इंद्रियें अंतर्मुख केलीं आहेत, ते यत्न करणारे ज्ञानमार्गी संन्यासीहि आपल्या हृदयग्रंथीचा भेद करून घेण्यास समर्थ होत नाहींत, अशा त्या जगन्निवास वासुदेवाला तूं शरण जा ॥ ३९ ॥ पंच ज्ञानेंद्रियें व मन अशा त्या इंद्रियषड्वर्गरूप सुसरींनीं युक्त असलेल्या संसारसमुद्राला, जे पुरुष केवळ योगादि साधनेंकरून तरण्याची इच्छा करितात, त्या ईश्वररूप नावाड्याचा आश्रय न करणाऱ्या पुरुषांना तो संसारसमुद्र तरून जाण्यास फार क्लेश होतात. यास्तव तूं षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा भगवान् श्रीहरीच्या पूज्य चरणरूप नौकेचा आश्रय कर, आणि ह्या दुःखरूप दुस्तर भवसमुद्राला तरून जा ॥ ४० ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें ब्रह्मदेवाचा पुत्र आत्मज्ञानी जो सनत्कुमार त्यानें पृथुराजाला आत्म्याचें तत्त्व उत्तमप्रकारें सांगितलें असतां, तो राजा त्या सनत्कुमाराची उत्तमप्रकारानें प्रशंसा करून म्हणाला कीं, ॥ ४१ ॥

राजा म्हणाला,—हे ब्रह्मनिष्ठ सर्वज्ञ मुने, दीनांवर दया करणाऱ्या हरीनें पूर्वींच मजवर अनुग्रह केला होता, तोच पूर्ण करण्याकरितां तुम्ही येथें प्राप्त झालां आहां ॥ ४२ ॥ आणि तो अनुग्रह दयाळू अशा तुम्ही पूर्णपणें सिद्धीस नेला आहे. याकरितां तुम्हांला गुरुदक्षिणारूपानें मीं कांहीं तरी समर्पण करावें; परंतु काय समर्पण करावें ? कारण, माझ्या देहासहवर्तमान जें सर्व राज्यादिक आहे तें सर्व साधूंचें उच्छिष्ट आहे, म्हणजे साधूंनीं आपला प्रसाद म्हणून मला दिलें आहे. पित्यानें दिलेला मोदकादिक खाऊ त्याला उलट दानरूपानें देतां येत नाहीं ॥ ४३ ॥ परंतु निवेदन घडतें म्हणून हे ब्रह्मनिष्ठा सनत्कुमारा, जसे राजाचे सेवक, त्याच्या पदरचे तांबूल वगैरे घेऊन सेवारूपानें त्यालाच अर्पण करितात, त्याप्रमाणें मी आपले प्राण, पत्नी, सुत, साहित्यांनीं भरलेलीं घरें, राज्य, सैन्य, पृथ्वी व द्रव्यभांडार हें सर्व आपणांस अर्पण केलें आहे ! ॥ ४४ ॥ सेनापतित्व, राज्य, दंडनेतृत्व ( लोकांना शिक्षण करण्याचें किंवा न्याय करण्याचें काम ) आणि सर्व लोकांवर अधिकार चालविणें हें सर्व करण्याविषयीं वेदशास्त्रवेत्ता ब्राह्मणच योग्य आहे ॥ ४५ ॥ ब्रह्मवेत्ता पुरुष, स्वतःचेच पदार्थ भक्षण करितो, स्वतःचींच वस्त्रें परिधान करितो आणि स्वतःच्याच वस्तू लोकांना देतो. क्षत्रियादिक बाकीचे वर्ण, या ब्राह्मणाच्या अनुग्रहानेंच अन्नवस्त्रादिक उपभोग्य पदार्थांचें सेवन मात्र करितात, त्यांना जास्ती अधिकार नाहीं ॥ ४६ ॥ हे ऋषि हो, ज्या वेदवेत्त्या तुम्हीं आत्मविचाराविषयीं निश्चयानें अशी भगवंताची गति ( तत्त्व ) आम्हांला निरूपण केली आहे, त्या निरंतर परम दयाळू अशा तुम्ही आपण केलेल्या दीनोद्धरणरूप कर्माच्या योगेंकरून आपणच संतुष्ट असावें. कारण, असल्या उपकाराबद्दल केवळ हात जोडणें याखेरीज दुसरा प्रत्युपकार कोण बरें करूं शकेल ? कोणीच करूं शकणार नाहीं. जर कोणी करूं इच्छील तर त्याची लोकांमध्यें थट्टा मात्र होईल ! ॥ ४७ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, नंतर आत्मज्ञानाचा उपदेश करण्याविषयीं समर्थ अशा त्या सनत्कुमारादिक ऋषींची पृथुराजानें पूजा केली असतां ते त्याच्या सुस्वभावाची प्रशंसा करीत करीत, तेथें असणारे सर्व लोक पाहत असतां आकाशमार्गानें निघून गेले ॥ ४८ ॥ त्या वेळीं थोरांमध्यें अग्रगण्य असा तो वेनाचा पुत्र पृथुराजा, सनत्कुमारानें केलेल्या आत्मतत्त्वाच्या उपदेशानें आत्म्याचे ठिकाणीं मनाची एकाग्रता संपादन करून, तिच्या योगानें परमात्म्याचे ठिकाणीं ऐक्यरूपानें स्थित होत्साता, आपल्याला कृतकृत्य झाल्यासारखें मानूं लागला ॥ ४९ ॥ आणि पुढें तो राजा लोकव्यवहारासाठीं काल, देश, बल व वित्त यांच्या योग्यतेप्रमाणें सर्व कर्में यथासांग ब्रह्मार्पण करूं लागला ॥ ५० ॥

त्याचा ब्रह्माचे ठिकाणीं कर्म अर्पण करण्याचा प्रकार असा कीं, तो राजा, कर्माचें फळ ब्रह्माचे ठिकाणीं अर्पण करून ' म्हणजे या कर्माच्या योगेंकरून कर्मप्रवर्तक भगवानच संतुष्ट असो, त्याखेरीज मला कोणत्याहि फलाची अपेक्षा नाहीं असा संकल्प करून, ' मी कर्म करितों अशा आसक्तीनें रहित, समाधानयुक्त व प्रकृतीहून निराळा असा आत्मा सर्व कर्मांचा साक्षी आहे असें मानीत असे ॥ ५१ ॥ म्हणून साम्राज्यलक्ष्मीनें युक्त व गृहाचे ठिकाणीं वास करणाराहि तो पृथुराजा निरभिमानी होत्साता, जसा सर्व ठिकाणीं पर्यटण करणारा सूर्य कोठेंही आसक्त होत नाहीं, त्याप्रमाणें तो कोणत्याहि इंद्रियांच्या उपभोग्य विषयांचे ठिकाणीं आसक्त झाला नाहीं ॥ ५२ ॥ याप्रमाणें तो पृथुराजा आत्मज्ञानपूर्वक सर्व कर्में भगवंताचे ठिकाणीं समर्पण करणारा होत्साता, अर्चिनामक स्त्रीच्या ठिकाणीं गुणांनीं आपल्यासारख्या पांच पुत्रांस उत्पन्न करिता झाला ॥ ५३ ॥ त्यांचीं नांवें—विजिताश्व, धूम्रकेश, हर्यक्ष, द्रविण आणि वृक हीं होत. पृथुराजानें आपल्या एकाच शरिराचे ठिकाणीं सृष्टीच्या रक्षणासाठीं त्याच्या योग्य काळीं सर्व लोकपालांचे निरनिराळे गुण धारणकेले होते. कारण, तो विष्णुरूपीच होता. त्यानें, आपल्या मनाच्या हितचिंतनादिक वृत्तींनीं व वाणीच्या सत्यप्रिय भाषणादिक वृत्तींनीं व देहाच्या मनोहर सुस्वभावादिक गुणांनीं सर्व प्रजांना रमवून, हा दुसरा सोमराज ( चंद्रच ) आहे कीं काय अशाप्रमाणें राजा हें सार्थ नांव धारण केलें होतें. सूर्य जसा सर्व ठिकाणीं सारखा ताप उत्पन्न करून, भूमीपासून उदकाचें आठ महिने आकर्षण करून त्याची वर्षाकालीं वृष्टि करितो, त्याप्रमाणें राजा, सर्व प्रजांना निःपक्षपातानें शिक्षारूप ताप उत्पन्न करीत होत्साता घेण्याच्या वेळीं प्रजांपासून कररूपानें द्रव्य घेत असे व दुर्भिक्षकाळीं तें त्यांस देत असे, त्यामुळें सूर्यासारखा वाटत असे ॥ ५४ ॥ ५५ ॥ ५६ ॥ हा राजा अग्नीसारखा तेजानें असह्य, इंद्रासारखा दुर्जय,' पृथ्वीसारखा दुसऱ्यांचे अपराध सहन करणारा व स्वर्गासारखा मनुष्यांचे मनोरथ पूर्ण करणारा होता ॥ ५७ ॥ हा पर्जन्याप्रमाणें यथा-योग्यकाळीं प्रजांची तृप्ति करण्याकरितां द्रव्याची यथेच्छ वृष्टि करीत असे. गांभीर्यानें समुद्रासारखा दुर्बोध असून मेरुपर्वतासारखा धैर्यवान् होता ॥ ५८ ॥ दुर्जनांना शिक्षा करण्याविषयीं यमासारखा असून आश्चर्यकारक वस्तूंच्या संग्रहाविषयीं हिमाचलासारखा होता. हा कुबेराप्रमाणें पुष्कळ द्रव्यभांडारानें युक्त असून वरुणाप्रमाणें याचें द्रव्य गुप्त व सुरक्षित होतें ॥ ५९ ॥ हा राजा शरीराचें बळ, इंद्रियांचें पटुत्व व मानसिक धैर्य, यांच्या योगानें वायूसारखा सर्वांचा नियंता असून युद्धामध्यें शत्रूंनीं सहन करण्यास अशक्य असा भगवान् श्रीरुद्रासारखा होता ॥ ६० ॥ हा सौंदर्याविषयीं मदनासारखा,

निर्भयपणाविषयीं सिंहासारखा, वात्सल्याविषयीं मनूसारखा व मनुष्यांच्या स्वामित्वाविषयीं भगवान् ब्रह्मदेवासारखा होता ॥ ६१ ॥ ब्रह्मविचाराविषयीं बृहस्पतीसारखा असून देह व इंद्रियादिक स्वाधीन ठेवण्याविषयीं स्वतः विष्णूसारखा होता. गाई, गुरु, ब्राह्मण व भगवद्भक्त ह्यांचे ठिकाणीं भक्तीनें, लोकलज्जेनें, नम्रतेनें आणि सुस्वभावानें युक्त असून परोपकार करण्याविषयीं आपल्यासारखाच म्हणजे निरुपम होता ॥ ६२ ॥ जसा दाशरथी राम आपल्या कीर्तिद्वारा सत्पुरुषांच्या कर्णरंध्रांचे ठिकाणीं प्रविष्ट होता, तसा हा राजा, त्रैलोक्यामध्यें जागोजागीं पुरुषांनीं उच्च स्वरानें गायन केलेल्या कीर्तीच्या योगानें सर्व स्त्रियांच्या कर्णच्छिद्रांचे ठिकाणीं पवित्र झाला होता ॥ ६३ ॥

**बाविसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २३ वा

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, ज्यानें स्वतः केलेल्या अन्नादिकांची उत्पत्ति व नगरग्रामादिकांची सर्व रचना वाढविली आहे आणि जिच्याकरितां या भूमितलावर आपण उत्पन्न झालों ती प्रजापालनादिरूप ईश्वराची आज्ञा ज्यानें उत्तमप्रकारें पूर्ण केली आहे, असा, स्थावरजंगमात्मक प्राण्यांची उपजीविका चालविणारा, प्रजांचा पालक, साधूंचा धर्मरक्षक व इंद्रियांचा निग्रह करणारा जो वेनपुत्र पृथुराजा, त्यानें एके वेळीं आपल्याला वृद्धदशा प्राप्त झाली असें पाहून, तपश्चर्येकरितां वनांत जाण्याचा निश्चय केला ॥ १ ॥ २ ॥ आपल्या विरहामुळें जणूं रोदनच करणाऱ्या आपल्या पृथ्वीरूप कन्येला त्यानें आपल्या पुत्रांच्या स्वाधीन केलें आणि सर्व प्रजा खिन्न झाल्या असतां, तो राजा एकटाच स्त्रीसहवर्तमान तपोवनांत निघून गेला ॥ ३ ॥ पूर्वीं नगरांत असतांना जिंकण्याच्या आपल्या कर्तव्याला जसा मोठ्या प्रयत्नानें तो झटत असे, त्याप्रमाणें त्या वनामध्येंहि ज्याचे नियम विघ्नांनीं कधींच खंडित झाले नाहींत असा होऊन वानप्रस्थाश्रमीं लोकांना संमत असें देहेंद्रियशोषक तप करण्यास प्रवृत्त झाला ॥ ४ ॥ कांहीं दिवसपर्यंत कंद-मुळें व फळें यांचा आहार करून तो राहिला. नंतर कांहीं दिवस सुकलेलीं पानें भक्षण करून तो राहिला. त्यावर कांहींएक पंधरवडे केवळ पाणी पिऊन राहिला आणि शेवटीं तर तो आपल्या जाग्यावरच राहून वायूचें मात्र भक्षण करी ॥ ५ ॥ त्या प्रभावशाली राजानें, ग्रीष्मऋतूमध्यें चार दिशांकडे पेटविलेले चार अग्नि व मस्तकावर सूर्याचा ताप अशा रीतीनें पंचाग्निसाधन केलें. तसेंच वर्षाऋतूंत अंगावर पाऊस सहन करावा, शिशिरऋतूमध्यें गळ्याइतक्या पाण्यामध्यें बुडून राहावें आणि प्रतिदिवशीं भूमीवर शयन करावें, अशी तपश्चर्या केली ॥६॥ क्षुधा व तृषा इत्यादि दुःखें सहन करणारा, मौनव्रत धारण करणारा, इंद्रियांचा जय करणारा, जवळ पत्नी असतांनाहि इंद्रियनिग्रह करणारा व प्राणवायूचा जप करणारा, अशा त्या पृथुराजानें, कृष्णपरमात्म्याची आराधना व्हावी एवढीच इच्छा धरून उत्तम तप केलें ॥ ७ ॥ अनुक्रमानें परिपक्व झालेल्या त्या तपाच्या योगानें ज्याचीं कर्में नष्ट होऊन अंतःकरण निर्मल झालें आहे, व ज्यानें प्राणायामाच्या योगेंकरून पंच ज्ञानेंद्रियें व मन या षड्वर्गाचा निरोध केला आहे व म्हणून ज्याचीं वासनारूप बंधनें तुटून गेलीं आहेत, अशा त्या पुरुषश्रेष्ठ पृथुराजानें, सनत्कुमार भगवंतानें आत्मप्राप्तीच्या साधनत्वें-करून जो श्रेष्ठ भक्तियोग सांगितला होता, त्याच्या योगेंकरूनच पुरुषोत्तम भगवंताची आराधना केली ॥ ८ ॥ ९ ॥ भगवंताच्या ठिकाणीं सर्व कर्में अर्पण केल्यामुळें त्याची आराधना करण्याविषयीं तत्पर, शुद्धचित्त व विश्वासानें निरंतर भगवंताची सेवा करणाऱ्या अशा त्या पृथुराजाला ब्रह्मस्वरूप भगवंताच्या ठिकाणीं एकनिष्ठ भक्ति उत्पन्न झाली ॥ १० ॥ तेव्हां भगवंताच्या उपासनेनें अंतःकरण शुध्दसत्त्वमय झालें असतां त्या पृथुराजाची भक्ति

भगवंताच्या निरंतर स्मरणानें वृद्धिंगत झाली आणि त्या भक्तियोगानें त्याला वैराग्ययुक्त ज्ञान उत्पन्न झालें. मग त्या तीक्ष्ण ज्ञानाच्या योगेंकरून असंभावना, विपरीत भावना इत्यादिक संशयांचा आश्रय अशा आपल्या जीवस्वरूपाचें आवरण करणाऱ्या हृदयग्रंथीचा त्यानें छेद करून टाकिला ॥ ११ ॥ मग ज्याची भेदबुद्धि नष्ट झाली आहे व ज्यानें आत्मतत्त्व जाणलें आहे अशा अणिमादि सिद्धीविषयींहि निःस्पृह झालेल्या त्या पृथुराजानें, ज्या ज्ञानाच्या योगानें हृदयग्रंथीचा छेद केला होता त्या ज्ञानाचा सुद्धां शेवटीं त्याग केला आणि हेंच योग्य आहे. कारण, आत्मप्राप्तीविषयीं यत्न करणारा पुरुष, जोंपर्यंत श्रीकृष्णाच्या कथांच्या ठिकाणीं एकनिष्ठ प्रीति ठेवीत नाहीं, तोंपर्यंत तो अणिमादिक योग-सिद्धींच्या योगेंकरून विषयासक्तच राहतो ॥१२॥ असो. याप्रमाणें त्या वीरश्रेष्ठ पृथुराजानें आपलें मन, परमात्म्याच्या ठिकाणीं स्थिर करून पूर्ण ब्रह्मस्वरूप प्राप्त झालें असतां, योग्य काळीं आपल्या शरिराचा त्याग केला ॥ १३ ॥ त्यानें आपल्या पायांच्या टांचांनीं गुदद्वार दाबून मूलाधारापासून प्राणवायु हळूहळू वर चढवीत नाभिप्रदेशीं नेला व तेथून अनुक्रमानें हृदय, ऊर, कंठ व भ्रूमध्य या स्थानांवर त्याची स्थापना केली ॥ १४ ॥ पुढें त्या वायूला वर चढवून ब्रह्मरंध्रावर त्यानें स्थापिलें आणि संसारसंबंधीं विषयभोगांच्या इच्छेनें रहित होऊन त्या वायूचा महाभूतरूप वायूंत ऐक्यरूपानें लय करून देहांतील पृथ्वीच्या भागाचा पृथिवींत व तेजाचा तेजांत लय केला ॥ १५ ॥ नंतर इंद्रियच्छिद्रांत असलेल्या आकाशप्रदेशाचा महाकाशांत लय करून त्यानें शरिरांतील रुधिरादिक द्रवांशाचा उदकांमध्यें लय केला. याप्रमाणें देहाचा लय करून अद्वितीय आत्मस्वरूपाची प्राप्ति होण्यासाठीं महाभूतादिकांचाहि त्यानें लय केला. पृथिवीचा उदकांत, उदकाला तेजांत, तेजाला वायूंत व वायूला आकाशांत त्यानें लीन केलें ॥ १६ ॥ त्यानें देवतांसह मनाचा इंद्रियांत लय केला. नंतर कर्णेंद्रियाचा आकाशांत व आकाशाचा सूक्ष्मभूत शब्दामध्यें, त्वचेचा स्पर्शामध्यें इत्यादि उत्पत्तिक्रमानें लय करून, अहंकाराच्या योगानें त्यांना उचलून म्हणजे अवशिष्ट राहिलेल्या आकाशासुद्धां त्या सूक्ष्मभूतरूप इंद्रियांचा अहंकाराचे ठिकाणीं लय करून त्या अहंकाराचा महत्तत्त्वाच्या ठिकाणीं लय केला ॥ १७ ॥ नंतर सर्व गुणांची व त्या गुणांच्या कार्यांची स्थिति ज्यांत आहे त्या महत्तत्त्वाचा, त्यानें प्रकृतिकार्य असें जें जीवोपाधिक लिंगशरीर, त्याच्या ठिकाणीं लय केला आणि ज्ञान व वैराग्य यांच्या प्रभावानें स्वस्वरूपीं स्थिर झालेल्या त्या महासमर्थ पृथूनें, शेवटीं आपल्या ठिकाणीं असलेला तो मायारूप उपाधिहि सोडून दिला ॥ १८ ॥ त्या पृथुराजाची पत्नी जी अर्चिनामक महाराणी होती ती पतीच्या बरोबर वनांत गेली. ती इतकी सुकुमार होती कीं, पायांनीं भूमीला स्पर्श करणें सुद्धां तिला कधीं सोसवत नसे ॥ १९ ॥ ती, पतीचीं जीं भूमिशयनादिक व्रतें व भगवत्पूजा इत्यादि धर्म त्यांना अनुसरून पतीच्या सेवेनें व कंदमूलफलादिकांच्या योगेंकरून ऋषींसारख्या देहनिर्वाहानें अत्यंत कृश झाली असतांही तिनें मुळींच दुःख मानिलें नाहीं. कारण ती, प्रियपतीच्या हस्ताचा आपल्याला स्पर्श होतो यांतच आपला मान व आनंद आहे असें मानीत असे ॥ २० ॥ त्या अर्चीनें पृथिवीचा पालक व आपला पति जो

पृथुराजा त्याच्या देहाचे चैतन्यादिक सर्व धर्म नष्ट झाले असें पाहून त्याच्या वियोगदुःखानें कांहीं वेळपर्यंत विलाप केला आणि नंतर त्या पतिव्रतेनें धर्मास अनुसरून पतीबरोबर सहगमन करण्याकरितां पर्वताच्या एका शिखरावर चिता रचून तिच्यावर पतीचा देह तिनें ठेविला ॥ २१ ॥ नंतर तिनें नदीच्या उदकांत स्नान करून त्या काळीं योग्य असलेलें सौभाग्यधारणादिक कृत्य करून, पृथिवीदोहनादिक व भगवदाराधनादिक उदार कर्में करणाऱ्या आपल्या पतीला उदकांजलि दिली आणि अंतरिक्षामध्यें असणाऱ्या देवांना वंदन करून व चितेला लावलेल्या अग्नीला तीन प्रदक्षिणा घालून, आपल्या पतीच्या चरणांचें ध्यान करीत करीत तिनें अग्नीमध्यें प्रवेश केला ॥ २२ ॥ तेव्हां वीरश्रेष्ठ अशा पृथुनामक पतीबरोबर सहगमन केलेल्या त्या सतीला अवलोकन करून वर देण्याविषयीं समर्थ अशा हजारों देवस्त्रिया देवांसहवर्तमान तिची स्तुति करूं लागल्या ॥ २३ ॥ त्या उभयतां दंपतीच्या वैकुंठगमनाच्या वेळीं मंगलासाठीं देवांचीं वाद्यें वाजूं लागलीं असतां, त्या मंदार-पर्वतावर पुष्पवृष्टि करणाऱ्या त्या देवांगना परस्पर बोलूं लागल्या ॥ २४ ॥

देवी म्हणाल्या,—अहो, ही स्त्री अत्यंत धन्य होय! कारण, जशी लक्ष्मी यज्ञपति विष्णूची आराधना करित्ये त्याप्रमाणें हिनें आपल्या राजाधिराज पतीची सर्वभावानें सेवा केली ॥ २५ ॥ ती ही पतिव्रता आपल्या दुष्कर कर्मांच्या योगानें आम्हांला खालीं टाकून आपल्या पतीच्या मागून उच्च पदवीस खरोखर जात आहे पाहा! ॥ २६ ॥ क्षणभंगुर आयुष्यानें युक्त असे जे मनुष्य, या भूमीवर भगवंताची सुद्धां प्राप्ति करून देणारें ज्ञान संपादन करितात, त्या मनुष्यांना दुर्लभ असें दुसरें काय बरें आहे? ॥ २७ ॥ वास्तव जन्मांतरीं केलेल्या तपश्चर्यादिक पुण्यानें या जन्मामध्यें भूतलावर मोक्षाचा साधनभूत असा मनुष्यजन्म प्राप्त झाला असतां, जो मनुष्य विषयांवर आसक्त होतो, त्या आत्मद्रोही मनुष्याला ईश्वराच्या मायेनें अगदीं फसविलें आहे असें समजावें॥२८॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें देवांच्या स्त्रिया स्तुति करीत असतां, भगवंताचा आश्रय करणारा व ज्ञातिजनांमध्यें श्रेष्ठ असा पृथुराजा ज्या लोकाला प्राप्त झाला, त्या पतिलोकालाच त्याची स्त्री अर्चिसुद्धां गेली ॥ २९ ॥ असो. हे विदुरा, तो हा भगवद्भक्तांमध्यें मुख्य असा पृथुराजा, अशा प्रकारचा पराक्रमी होता. त्या महापुण्यकीर्ति राजाचें चरित्र मीं तुला सांगितलें आहे ॥ ३० ॥ जो मनुष्य एकाग्रचित्त होऊन अतिशय महापुण्यकारक आख्यान श्रद्धेनें पठण करील, दुसऱ्या-कडून ऐकवील किंवा स्वतः श्रवण करील तो पृथूच्या पदवीलाच पावेल ॥ ३१ ॥ याचें पठण करणारा ब्राह्मण असेल तर तो ब्रह्मतेजानें युक्त होईल, राजा असेल तर तो पृथिवीचा पति होईल, वैश्य असेल तर तो आपल्या जातीमध्यें श्रेष्ठ होईल व शूद्र हें चरित्र श्रवण करील तर तो मोठ्या साधूंच्या योग्यतेला पावेल ॥ ३२ ॥ पुरुष असो अथवा स्त्री असो, जो कोणी आदरानें हें आख्यान त्रिवार श्रवण

करील, तो अपुत्रिक असला तर त्याला उत्तम पुत्र होईल, तो निर्धन असला, तर त्याला धनप्राप्ति होईल ॥ ३३ ॥ तो अप्रसिद्ध असला, तर कीर्तिमान् होईल आणि मूर्ख असला तर पंडित होईल. श्रवण, पठण इत्यादि करणाऱ्या पुरुषांचें कल्याण करणारें असें हें आख्यान आहे ॥ ३४ ॥ तसेंच धनाची प्राप्ति करून देणारें, यशाची वृद्धि करणारें, आयुष्याची वृद्धि करणारें, स्वर्गाची प्राप्ति करून देणारें व कलिसंबंधीं पापाचा नाश करणारें असेंहि तें आहे. यास्तव धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्यांची उत्तम प्रकारें सिद्धि व्हावी अशी इच्छा करणाऱ्या मनुष्यांनीं श्रद्धेनें याचें श्रवण करावें. हेंच धर्मादि चतुर्विध पुरुषार्थांच्या सिद्धीचें परम कारण आहे ॥ ३५ ॥ विजय संपादन करण्याविषयीं तत्पर झालेला राजा हें आख्यान श्रवण करून ज्या देशावर स्वारी करील त्या देशांतील राजे, जसे पूर्वी पृथुराजाला करभार निवेदन करीत होते, त्याप्रमाणें त्यालाहि करभार आणून देतील ॥ ३६ ॥

या चरित्राच्या श्रवणादिकांपासून जरी सकाम पुरुषांना पुष्कळ फळें मिळतात, तथापि तीं सर्व फळें तुच्छ आहेत असें समजून त्या कर्मफळांची इच्छा सोडून भगवंताच्या ठिकाणीं निष्काम भक्ति करणाऱ्या पुरुषानें, पृथुराजाचें हें पवित्र चरित्र वक्ता मिळल्यास ऐकावें, श्रोता मिळाल्यास ऐकवावें व दोन्ही न मिळाल्यास स्वतःच पठण करावें ॥ ३७ ॥ हे विदुरा, भगवंताच्या माहात्म्याचें सूचक असें हें पृथुचरित्र मीं तुला सांगितलें आहे. श्रवणादिकेंकरून याचें चिंतन करणारा मनुष्य, पृथूच्या वैकुंठप्राप्तिरूप गतीला पावेल ॥ ३८ ॥ जो फलेच्छारहित मनुष्य, या पृथुचरित्राचें आदरानें प्रतिदिवशीं श्रवण किंवा कीर्तन करील, तो मनुष्य, ज्याचे चरण संसारसमुद्र तरून जाण्याचें साधन अशी नौकाच आहे, त्या भगवंताच्या ठिकाणीं संसाराची निवृत्ति करणाऱ्या अशा तिला पात्र होतो ॥ ३९ ॥

**तेविसावा अध्याय समाप्त**

# अध्याय २४ वा

मैत्रेय म्हणाला,- हे विदुरा, पृथुराजाच्या नंतर त्याचा पुत्र महायशस्वी विजिताश्व सार्वभौम राजा झाला. आपल्या कनिष्ठ भावांशीं प्रेमळ असून त्यानें त्या चार धाकट्या भावांना चारी दिशांचें राज्य दिलें ॥ १ ॥ त्यांत त्या समर्थ राजानें, हर्यक्षनामक भावाला पूर्वदिशेचें राज्य दिलें, धूम्रकेशाला दक्षिण दिशेचें दिलें, वृकनामक भावाला पश्चिमदिशेचें व द्रविणसनामक भावाला चौथ्या उत्तर दिशेचें राज्य दिलें ॥ २ ॥ त्यानें पृथुराजाच्या अश्वमेधामध्यें इंद्रापासून अश्व जिंकिला होता म्हणून त्यास विजिताश्व हें नांव पडलें होतें. तसाच त्यानें त्या अश्वविजयाच्या वेळीं भयग्रस्त झालेल्या इंद्राचा वध केला नाहीं, म्हणून त्याला प्रसन्न झालेल्या इंद्रापासून अंतर्धानगतिरूप वर प्राप्त झाल्यामुळें तो 'अंतर्धान' या नांवानें प्रसिद्ध झाला. त्या अंतर्धानाला शिखंडिनीनामक भार्येच्या ठिकाणीं सर्वसंमत असे तीन पुत्र झाले ॥ ३ ॥ पावक, पवमान आणि शुचि अशीं त्यांचीं नांवें होतीं. ते तीनहि पुत्र पूर्वीचे दक्षिणाग्नि, गार्हपत्य आणि आहवनीय हे अग्नि असून वसिष्ठऋषींच्या शापामुळें मनुष्ययोनीमध्यें उत्पन्न झाले होते. ते पुनः योगमार्गाच्या योगें-करून शापापासून मुक्त होऊन आपल्या मूळच्या अग्निरूपाला पावले ॥४॥ 'अश्वहरण करणारा हा इंद्र आहे' असें जाणत असूनहि त्याचा ज्यानें वध केला नाहीं, त्या या अंत-र्धाननामक विजिताश्वाला दुसऱ्या नभस्वतीनामक स्त्रीपासून हविर्धाननामक पुत्र झाला ॥५॥ त्यानें प्रजांपासून कर घेणें, दंडाचें द्रव्य स्वीकारणें, जकात बसविणें इत्यादिक जी राजांची वृत्ति ती दुसऱ्यांना पीडा करणारी आहे, असें जाणून पुष्कळ वेळपर्यंत चालणारें सत्र करण्याच्या निमित्तानें ती वृत्ति सोडून दिली ॥६॥ आणि सत्रामध्येंहि द्रव्य, देश, काल, कर्म, देवता इत्या-दिकांच्या ठिकाणीं परमात्मदृष्टि ठेवून शुद्ध व पूर्ण अशा परमात्म्याचें पूजन करीत पुण्यकारक समाधीच्या योगेंकरून तो त्या भगवंताचें निवासस्थान अशा वैकुंठलोकास गेला ॥ ७ ॥ त्या हविर्धानापासून त्याच्या हविर्धानीनामक पत्नीला बर्हिषद्, गय, शुक्ल, कृष्ण, सत्य आणि जितव्रत असे सहा पुत्र झाले ॥ ८ ॥ हे कौरवश्रेष्ठा विदुरा, त्यांमध्यें हविर्धानाचा पहिला पुत्र जो बर्हिषद् तो प्रजांचें पालन करणारा आणि यज्ञादि अनुष्ठानरूप कर्मकांड व प्राणायामादिक योगाभ्यास यांत निष्णात असा महापुण्यशाली झाला ॥ ९ ॥ त्या बर्हिषद् राजानें, 'जेथें एक यज्ञ केला त्याच्या समीपभागीं दुसरा यज्ञ करावयाचा, त्याच्या समीपभागीं तिसरा याप्रमाणें यज्ञ करण्याचा क्रम चालविला असतां, त्याच्या पूर्वाभिमुख पसरलेल्या दर्भांनीं आच्छादित झालेलें हें भूमंडळ यज्ञमंडपरूप झालें, म्हणून त्याचें नांव प्राचीनबर्हि असें पडलें आहे ॥ १० ॥ त्यानें देवाधिदेव ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून समुद्राच्या शतद्रुतिनामक कन्येशीं विवाह केला. त्या विवाहाच्या वेळीं ती वयानें किशोरी होती व तिचे सर्व अवयव सुंदर असून त्यांवर तिनें उत्तम अलंकार धारण केले होते. ती

विवाहहोमाच्या वेळीं अग्नीला प्रदक्षिणा घालूं लागली असतां तिला पाहून अग्नीनेंहि कामातुर होऊन ' जशी पूर्वी सप्तर्षीच्या शुकीनामक भार्येची इच्छा तृप्त केली होती तशी, या शतद्रुतीचीहि केली ।। ११ ।। नववधूच्या स्थितींत असतांच शतद्रुतीनें आपल्या पायांतील नूपुरांच्या मंजुळ ध्वनीनें सर्व दिशांत राहणाऱ्या देव, असुर, गंधर्व, ऋषि, सिद्ध, मनुष्य व सर्प ह्या सर्वांना मोहित करून सोडिलें ।। १२ ।। त्या शतद्रुतीपासून प्राचीनबर्हिराजाला प्रचेतस्नामक दहा पुत्र झाले. त्या दहांचेंहि नांव एकच व आचारहि सारखाच असून ते सर्वहि भगवदाराधनरूप धर्मामध्यें निष्णात होते ।। १३ ।। पुढें पिता जो प्राचीनबर्हिराजा त्यानें प्रजोत्पत्तीची आज्ञा केल्यामुळें ते प्रचेतस् भगवत्प्रसादावांचून उत्तम संतति होणार नाहीं, असें जाणून त्याच्या संतोषार्थ तप करण्याकरितां समुद्रामध्यें प्रविष्ट झाले आणि तेथें त्यांना दहा हजार वर्षेपर्यंत तपश्चर्या करून तिच्या योगानें, तपाचें फल देणाऱ्या भगवंताचें आराधन केलें ।। १४ ।। जातांना मार्गामध्यें दृष्टि पडलेल्या व प्रसन्न झालेल्या श्रीमहादेवानें त्यांच्यावर प्रसाद करून जें भगवंताच्या आराधनेचें साधन त्यांना सांगितलें होतें, त्याच्या योगानेंच त्या प्रचेत्यांनीं भगवंताचें ध्यान, मंत्र जप व पूजा इत्यादिक साधनानें आराधना केली ।। १५ ।।

विदुर म्हणाला,—हे ब्रह्मनिष्ठ मैत्रेयऋषे, त्या प्रचेत्यांची शंकराशीं मार्गामध्यें गांठ कशी पडली ? व संतुष्ट झालेल्या शंकरानें त्यांना भगवंताच्या आराधनेचें तत्त्वविचारानें भरलेलें साधन काय सांगितलें, तें सर्व आपण मला सांगावें ।। १६ ।। हे ब्रह्मर्षे, सर्वसंगपरित्याग करून एकांतस्थळीं वास करणारे मुनि, ज्या आवडत्या शंकराचें केवळ ध्यान करीत असतात, त्या शंकराचा समागम घडणें हें ह्या जगांत खरोखर प्राण्यांना फार दुर्लभ आहे ।। १७ ।। भगवान् रुद्र, आत्मस्वरूपीं रममाण असतांहि लोकरचनेचें परिपालन करण्यासाठीं आपल्या तमोगुणात्मक भयंकर शक्तीनें युक्त होऊन लोकांमध्यें संचार करीत असतो ।। १८ ।।

मैत्रेय म्हणाला,—विदुरा, सदाचारसंपन्न अशा त्या प्रचेत्यांनीं पित्याचें वाक्य बहुमानपूर्वक स्वीकारून तें सिद्धीस नेण्याचा निश्चय केला आणि त्याला अनुसरून भगवदाराधनरूप तप करण्यासाठीं सादरचित्त होऊन ते पश्चिमदिशेस निघून गेले ।। १९ ।। जातां जातां वाटेंत समुद्राच्या अलीकडे समुद्रापेक्षां कांहीं लहान असें एक मोठें सरोवर त्यांच्या दृष्टीस पडलें. त्याचें पाणी सत्पुरुषांच्या अंतःकरणासारखें निर्मळ होतें व त्यांत राहणारे मत्स्यकूर्मादि प्राणी शांत होते ।। २० ।। तसेंच काळीं कमळें, तांबडीं कमळें, चंद्रविकासी कमळें, सूर्यविकासी कमळें आणि संध्याविकासी कमळें ह्यांचें तें उत्पत्तिस्थान असून हंस, सारस, चक्रवाक् ह्या पक्ष्यांच्या स्वरांनीं गजबजून गेलें होतें ।। २१ ।। त्यांतील वेली आणि वृक्ष मत्तभ्रमरांच्या सुस्वर गायनानें रोमांचयुक्त झाल्यासारखे कळ्यांनीं भरून गेलेले होते आणि कमलकोशांतील पराग दाही दिशांमध्यें नेऊन टाकणाऱ्या वायूच्या योगानें त्यांमध्यें 'गुलाल उधळल्यासारखा' उत्साह प्राप्त झाला होता ।। २२ ।। असो.

त्या ठिकाणीं मृदंग, पणव, झांजा इत्यादि वाद्यांच्या तालाला अनुसरून दिव्य पद्धतीवर चाललेलें गंधर्वांचें मनोहर गायन ऐकून ते राजपुत्र विस्मित झाले ॥ २३ ॥ तों इतक्यांत नंदिकेश्वरादिक सेवकांसह त्या सरोवरांतून बाहेर पडणारा शंकर त्यांच्या दृष्टीस पडला. त्याच्या यशाचें गंधर्वादिकांनीं गायन चालविलें होतें. त्याची अंगकांति तापलेल्या सुवर्णासारखी व कंठ निळा असून तीन डोळे होते आणि भक्तावर अनुग्रह करण्याकरितां तो उद्युक्त झालेला दिसत होता. त्या देवाधिदेव शंकराला अवलोकन करून त्या राजपुत्रांना कौतुक वाटलें व त्यांनीं त्याला वंदन केलें ॥ २४ ॥ २५ ॥ तेव्हां शरणागतांची पीडा दूर करणारा व धर्मवत्सल असा तो भगवान् शंकर संतुष्ट होऊन धर्मज्ञ, शीलसंपन्न व आपल्या दर्शनानें आनंदित झालेल्या त्या प्रचेत्यांशीं बोलूं लागला ॥ २६ ॥

श्रीरुद्र म्हणाला, तुम्ही प्राचीनबर्हि राजाचे पुत्र आहां, हें मला ठाऊक आहे. तुमच्या मनांत करावयाचें जें भगवंताचें आराधन तेंहि मला समजलें आहे. तुमचें कल्याण असो ! तुमच्यावर अनुग्रह करण्याकरितांच मी तुम्हांला दर्शन दिलें आहे ॥ २७ ॥ जो प्राणी सूक्ष्म अशा त्रिगुणात्मक प्रधान व जीवनसंज्ञक पुरुषापलीकडे असलेल्या भगवान् वासुदेवाला शरण गेला आहे तो मला प्रिय आहे ॥ २८ ॥ स्वधर्माचें उत्तम प्रकारें आचरण करणारा पुरुष, शंभर जन्मांनीं ब्रह्मदेवाच्या स्वरूपीं लय पावतो. त्यापेक्षांहि अधिक पुण्यवान् असेल तर तो माझ्या स्वरूपीं मिळतो आणि जसा मी रुद्र व इतरहि अधिकारांवर असलेले देव आपले अधिकार संपले आणि लिंगदेहाचा भंग झाला म्हणजे भगवद्रूपीं मिळतात, त्याप्रमाणें भगवद्भक्त देहपातानंतर सनातन अशा वैष्णवपदास पावतो ॥ २९ ॥ तुम्ही भगवद्भक्त असल्यामुळें जसा भगवान् मला प्रिय आहे, त्याप्रमाणेंच तुम्ही मला प्रिय आहां. भगवद्भक्तांना माझ्याहून दुसरा कोणीहि कधींच प्रिय वाटत नाहीं ॥३०॥ यास्तव जप करण्यास योग्य, पवित्र, मंगलकारक, श्रेष्ठ आणि भगवत्स्वरूपाची प्राप्ति करून देणारें असें स्तोत्र मी तुम्हांस सांगतों, तें तुम्ही श्रवण करा आणि एकांतस्थळीं त्यांचा जप करा ! ॥ ३१ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें सदय अंतःकरणाचा व नारायण हेंच मुख्य दैवत मानणारा तो भगवान् शंकर हात जोडून नम्रपणें उभ्या राहिलेल्या त्या राजपुत्रांस तें स्तोत्र सांगूं लागला ॥ ३२ ॥

श्रीरुद्र म्हणाला,—हे देवा, आत्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ जे भगवद्भक्त त्यांना परमानंदलाभाची प्राप्ति होण्याकरितां तूं आपला उत्कर्ष प्रकट केला आहेस, यास्तव मलाहि स्वानंदाचा लाभ असो. तूं परमानंदरूपानेंच नित्यस्थित आहेस म्हणून सर्वरूपी तुज परमात्म्याला नमस्कार असो ! ॥३३॥ तसाच जो तूं कमलनाथ भगवान्, आकाशादिक पंचमहाभूतें, त्यांचीं शब्दादिक सूक्ष्मरूपें व इंद्रियें ह्यांचा आत्मा, शांत. निर्विकार आणि स्वयंप्रकाश आहेस, त्या तुज चित्ताधिष्ठात्या वासुदेवाला नमस्कार असो ॥ ३४ ॥ सूक्ष्म, अविनाशी आणि विश्वसंहारक अशा अहंकाराच्या अधिष्ठात्या तुज संकर्षणाला नमस्कार

असो. ज्यांपासून विश्वाला ज्ञानप्राप्ति होते अशा बुद्धीच्या अधिष्ठात्या, तुज प्रद्युम्नाला नमस्कार असो ॥ ३५ ॥ विषयग्रहण करणाऱ्या इंद्रियांचा राजा अशा मनाच्या अधिष्ठात्या तुज अनिरुद्धाला बारंवार नमस्कार असो. आपल्या तेजानें जगाला व्यापणाऱ्या वृद्धिक्षयरहित अशा सूर्यरूपी तुला नमस्कार असो ॥ ३६ ॥ तसाच स्वर्ग व मोक्ष यांचें द्वार, निरंतर पवित्र अंतःकरणामध्यें राहणारा, कर्मविस्तारक असल्यामुळें होता, अध्वर्यु इत्यादिक चार ऋत्विजांनीं घडणाऱ्या कर्माला साधनभूत आणि सुवर्णरूप वीर्यानें युक्त अशा अग्निरूपी तुला नमस्कार असो ॥ ३७ ॥ तसाच पितरांचें व देवांचें अन्न असलेल्या अशा सोमरूपी तुला नमस्कार असो. याप्रमाणें सूर्य, अग्नि आणि सोम यांच्या रूपानें वेदत्रयाचा अधिपति अशा तुज हरीला नमस्कार असो. सर्व जीवांना तृप्ति देणाऱ्या सर्वरसरूपी तुला नमस्कार असो ॥ ३८ ॥ तूं सर्व प्राण्यांचा देह असून पृथिवीरूपी व विराट्स्वरूपी आहेस. तुला आमचा नमस्कार असो. मनःसामर्थ्य; इंद्रियसामर्थ्य आणि देहसामर्थ्य हे ज्याचे धर्म, त्या त्रैलोक्याचें पालन करणारा तूं असून वायुरूपी आहेस. तुला आमचा नमस्कार असो ॥ ३९ ॥ शब्दगुणांच्या योगानें सृष्टींतील पदार्थांना व्यक्त करणाऱ्या व त्यांना संचार करावयास वाव देऊन सर्वांच्या आंत व बाहेर वास करणाऱ्या अशा आकाशरूपी तुज भगवंताला नमस्कार असो. पुण्याच्या योगानें प्राप्त होणारा व प्रकाशमय असा स्वर्गवैकुंठादि लोकरूपी जो तूं त्याला नमस्कार असो ॥ ४० ॥ सृष्टिकार्यांत प्रवृत्त होऊन नंतर तिचा संहार करणारा, पितृदेवतास्वरूपी व कर्मस्वरूपी आणि तसेंच अधर्माचें फल देणारा दुःखदायक मृत्युरूपी अशा तुला नमस्कार असो ॥ ४१ ॥ हे ईश्वरा, इच्छित फलांचा दाता, सर्वज्ञ, पुराणपुरुष, सांख्यशास्त्र व योगशास्त्र यांचा अधिपति व अकुंठित बुद्धीनें युक्त, अशा परम धर्मरूपी तुज कृष्णाला नमस्कार असो ॥ ४२ ॥ कर्ता, कारण आणि ज्याच्यापासून 'परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी ह्या रूपांनीं' वाणीची अनेकप्रकारें उत्पत्ति होते त्या ज्ञानक्रियाशक्तींनीं युक्त अशा ब्रह्मस्वरूपी तुला नमस्कार असो ॥ ४३ ॥ हे भगवन्, तुझ्या दर्शनाची इच्छा करणाऱ्या आम्हां भक्तांना अत्यंत प्रिय असें आपलें स्वरूप दाखीव ! तें तुझें स्वरूप सर्व इंद्रियांना रमविणारें व अलौकिक विषयांनीं युक्त आहे ॥ ४४ ॥ तें वर्षाऋतूंतील दाट मेघांप्रमाणें श्यामवर्ण असून त्यांत सर्व सौंदर्याचा संग्रहच जणू झाला आहे. त्याला मनोहर आणि दीर्घ असे चार बाहु असून सर्व अवयव यथोचित आहेत व त्याचें मुख सुंदर व मोहक आहे ॥ ४५ ॥ त्याचे नेत्र कमळांच्या कोशांतील पाकळ्यांप्रमाणें सुंदर असून भ्रुकुटी रम्य आहे, त्याचें नाक व दांत शोभायुक्त असून सुंदर गालांमुळें त्याचें मुख रमणीय झालें आहे आणि कानांत दोहींकडे सारखे अलंकार असल्यामुळें तें त्याचें सौंदर्य फारच खुलून दिसतें ॥ ४६ ॥ ज्याचे कटाक्ष संतोषसूचक अशा हास्यानें युक्त आहेत, कुरळ केशांनीं जें सुशोभित झालें आहे, कमळांतील केसराप्रमाणें तेजस्वी, भरजरीचे दोन पीतांबर ज्यानें परिधान केले आहेत व ज्याच्या कानांमध्यें उज्ज्वल अशीं कुंडलें आहेत ॥ ४७ ॥ दैदीप्यमान अशीं किरीट, कडीं, तोडे, रत्नांचे हार, नूपुर व करगोटा हीं भूषणें ज्यानें

घातलीं असून शंख, चक्र, गदा, पद्म, वनमाला, अलंकारांवर जडविलेलीं रत्नें यांच्यामुळें जें फार सुशोभित झालें आहे ॥ ४८ ॥ सिंहाच्या स्कंधासारख्या ज्याच्या स्थूल स्कंधांवर कुंडलें, हार इत्यादिकांचे किरण पडले असून कंठाला सुशोभित करणारा कौस्तुभमणि ज्यानें धारण केला आहे, कधींही वियोग न पावणारी अशी लक्ष्मी, सुवर्णाला कसोटीस लावणाऱ्या भूषणांची शोभा ज्यानें मागें सारिली आहे, अशा ज्याच्या वक्षःस्थलाला सुशोभित करीत आहे ॥ ४९ ॥ श्वासोच्छ्वासांच्या योगानें हालत असलेल्या तीन वळ्यांनीं मनोहर असें अश्वत्थपर्णासारखें ज्याचें पोट आहे व तें भोवऱ्यानें युक्त व खोल असलेल्या नाभीच्या योगानें, जेथून जग बाहेर पडलें त्याच द्वारानें पुनः आंत प्रवेश करीत आहे कीं काय असें दिसत आहे ॥ ५० ॥ जेथें श्यामवर्ण कटिभागानें अधिकच झळकणाऱ्या पीतांबरावर सुवर्णमय मेखला धारण केलेली आहे, ज्याचे पाय, पोटऱ्या व मांड्या हे दोन दोन अवयव एकसारखे असून सुंदर आहेत, गुडघे खोलगट असून दिसण्यांत सुरेख आहेत, ॥ ५१ ॥ हे प्रभो, शरदृतूंतील कमलपत्रांच्या कांतीनें युक्त असलेल्या नखांच्या प्रभेनें जें आमचें अन्तर्गत अज्ञान नाहींसें करितें अशा पावलांनीं युक्त व भक्तांचें संसारभय दूर करणारें असें जें आपलें आश्रयस्थानभूत स्वरूप तें तूं आम्हांला दाखीव. कारण हे गुरो, आम्हां अज्ञ जनांना मार्ग दाखविणारा गुरु तूंच आहेस ॥ ५२ ॥ हे देवा, ज्या तुझ्या स्वरूपाची ध्यान, सेवा, स्तुति व नमस्कारादिरूप भक्ति केली असतां तो स्वधर्माचरण करणाऱ्या भक्तांच्या जन्ममरणादिरूप संसारभयाची निवृत्ति करतो, तें तुझें स्वरूप अंतःकरणाची शुद्धि व्हावी अशी इच्छा करणाऱ्या लोकांनीं नित्य ध्यान करण्यास सर्वथैव योग्य आहे ॥ ५३ ॥ विषयासक्त अशा सर्व प्राणिमात्रांना जरी तूं दुर्लभ आहेस, तथापि भक्तिमान् पुरुषांना तूं सुलभ आहेस. कारण, स्वर्गाचें राज्य करणाऱ्या इंद्रालाहि तूं मान्य आहेस आणि जो केवळ आत्मवेत्ता पुरुष आहे त्यालाहि तुझ्याहून दुसरें कांहींच प्राप्त करून घ्यावयाचें नसतें ॥ ५४ ॥ यास्तव कष्ट पडले तरीहि आराधना करण्यास योग्य अशा तुला, सदाचारसंपन्न पुरुषांनाहि दुर्लभ अशा एकांतभक्तीनें प्रसन्न करून घेतल्यावर तुझ्या चरणमूलाशिवाय दुसऱ्या विषयसुखाची इच्छा कोणत्या विचारी पुरुषाला होईल बरें? ॥ ५५ ॥ शौर्य आणि उत्साहशक्ति ह्यांनीं क्षोभ पावलेल्या आपल्या भ्रुकुटीच्या योगानें सर्व विश्वाचा विध्वंस करणाराहि काळ, ज्या तुझ्या चरणाला शरण गेलेल्या पुरुषासंबंधानें 'हा माझ्या स्वाधीन आहे' असा अभिमान धरीत नाहीं, त्या चरणकमलाहून दुसरें निर्भयस्थान कोणतें असणार? ॥ ५६ ॥ तुझ्या भक्तांची संगति तर सर्व पुरुषार्थांमध्यें श्रेष्ठ आहे. कारण, तुझ्या भक्तांच्या संगतीच्या क्षणार्धाच्या बरोबरीपुढें स्वर्गाची किंवा मोक्षाचीहि योग्यता आम्हांला वाटत नाहीं; मग मनुष्यांच्या राज्यादिक संपत्तीची ती काय कथा? ॥ ५७ ॥ तुझे चरण पापनाशक असून तुझी कीर्ति व गंगादि तीर्थें ह्यांच्या आंतून व बाहेरून घडलेल्या स्नानांच्या योगानें ज्यांचें पाप अगदीं नाहींसें झालें आहे व त्यामुळें भूतदया, कामक्रोधादिराहित्य आणि चांगलें शील हे गुण ज्यांचे अंगीं दृढ झाले आहेत, त्या

सत्पुरुषांचा आम्हांला समागम होवो, हाच तुझा आमच्यावर अनुग्रह व्हावा ॥ ५८ ॥ जेव्हां तुझ्या भक्तांच्या संगतीपासून झालेल्या भक्तियोगानें साधक पुरुषाच्या चित्तावर अनुग्रह होऊन तें शुद्ध होतें तेव्हांच तो मननशील पुरुष तुझें स्वरूप अनायासानें पाहूं शकतो ॥ ५९ ॥ हे देवा, ज्याच्या ठिकाणीं हें जग प्रकाश पावतें व जगतामध्यें जें सच्चिदानंद-रूपानें भासतें आणि जें आकाशासारखें व्यापक असून सर्वांपेक्षां अधिक प्रकाशमान आहे तेंच तुझें स्वरूप होय ॥६०॥ हे भगवन्. जिच्या योगानें तुझ्याहून इतरांच्या ठिकाणीं आत्मबुद्धि उत्पन्न होत्ये, जी मायाहि आत्मस्वरूप अशा तुझ्या ठिकाणीं आपलें मोहादिक कार्य घडवूं शकत नाहीं. तूं ब्रह्मदेवरूपानें हें जग उत्पन्न करितोस, विष्णुरूपानें त्याचें पालन करितोस आणि रुद्ररूपानें त्याचा संहार करितोस; त्या स्वतंत्र अशा तुज भगवंताला आम्हीं शरण आलों आहों ॥ ६१ ॥ हे देवा, जे कर्मयोगी. विश्वासयुक्त होऊन, कर्माची सिद्धि होण्यासाठीं 'ज्याचें ज्ञान पृथिव्यादि भूतें, इंद्रियें आणि अंतःकरण यांच्या योगानें प्रवर्तकत्वेंकरून होतें. अशा ह्या तुझ्या स्वरूपाचें ध्यान, सेवा इत्यादिकेंकरून उत्तमप्रकारें पूजन करितात, तेच वेदोक्त व आगमोक्त कर्म करण्यामध्यें निपुण आहेत असें समजावें ॥ ६२ ॥ हे भगवन्, सृष्टीच्या पूर्वीं ज्याची मायाशक्ति निद्रिस्त असते असा आदिपुरुष तूं एकच असतोस. नंतर सृष्टीच्या आरंभीं उठलेल्या तुझ्या मायाशक्तीच्या योगानें सत्त्व, रज आणि तम अशा तीन शक्ति निरनिराळ्या होतात. पुढें त्यांच्यापासून महत्तत्त्व, अहंकार, आकाश, वायु, तेज, जल, पृथ्वी, देव, ऋषि आणि भूतगण असें हें विश्व उत्पन्न होतें ॥ ६३ ॥ याप्रमाणें आपल्या मायाशक्तीनें, जरायुज, स्वेदज, अंडज आणि उद्भिज्ज अशा चार प्रकारचें उत्पन्न केलेलें जें हें शरीररूपी नगर, त्यामध्यें तूं आपल्या जीव आणि अंतर्यामीं शिव अशा दोन प्रकारच्या अंशांनीं प्रविष्ट झाला आहेस. म्हणून शरिराच्या आंत असणाऱ्या त्या दोन स्वरूपांच्या तुला पुरुष असें म्हणतात. त्यांमध्यें जो मधुमक्षिकांनीं निर्माण केलेल्या मधासारख्या तुच्छ विषयसुखाला इंद्रियांनीं सेवन करितो, तो जीवरूपी पुरुष होय ( आणि जो अभोक्ता असून सर्व जाणणारा आहे तो अंतर्यामीं भगवान् शिव होय ) ॥ ६४ ॥ याप्रमाणें जगाला उत्पन्न करून त्यामध्यें प्रविष्ट झालेला जो तूं तोच मेघपंक्तींना जिकडेतिकडे चाळविणाऱ्या वायूप्रमाणें भूतांच्याच योगेंकरून स्थावरजंगमात्मक सर्व भूतांचा उपसंहार करितोस. कारण तुझा वेग अतिप्रचंड असून तुझ्या स्वरूपाचें ज्ञान केवळ अनुमानानेंच करून घ्यावें लागतें ॥ ६५ ॥ हे ईश्वरा, क्षुधेच्या योगानें जिभल्या चाटीत असलेला सर्प, जसा उंदराला गिळून टाकितो, त्याप्रमाणें विषयाविषयीं लंपट आणि विषय प्राप्त झाले तरीसुद्धां अत्यंत लोभी, व 'असेंच हें करावयाचें अशा चिंतेनें' फार असावध असलेला या लोकांला सावध करणारा असा कालरूपी तूं एकाएकीं गट्ट करून टाकितोस ॥ ६६ ॥ म्हणून कालापासून नाश होईल या भीतीनें आमचा गुरु ब्रह्मदेव आणि स्वायंभुवादिक चौदा मनु, यांनीं दृढ विश्वासानें ज्या तुझ्या चरणकमलांचें अर्चन केलें आहे, त्या तुझ्या चरणकमलाला, तुज पुरुषोत्तमाच्या अनादरानें ज्याचें शरीर काळाच्या भयानें कंपित होत आहे, असा कोण बरें ज्ञानी पुरुष

करणाऱ्या व उद्यां आपलें कसें चालेल याचा विचार न करणाऱ्या अशा पशुतुल्य पुरुषाशीं सोडून देईल ? ॥ ६७ ॥ असो. कालरुद्रादिकांच्या भयानें हें सर्व जग ग्रासून टाकिलें आहे, यास्तव हे ब्रह्मस्वरूप परमात्मन्, तुला शरण जाणें हेंच कालरुद्रादिकांच्या भयाचें निवर्तक आहे, असें जाणणाऱ्या आमचें सर्वथा भयरहित असें आश्रयस्थान तूंच आहेस ॥ ६८ ॥ अहो राजपुत्र हो, तुम्ही शुद्धचित्त व स्वधर्माचें आचरण करून भगवंताच्या ठिकाणीं आपलें अंतःकरण समर्पण करा व मी सांगितलेल्या ह्या स्तोत्राचा जप करीत जा, म्हणजे तुमचें कल्याण होईल ! ॥६९॥ आपल्या ठिकाणीं व सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणीं असणाऱ्या त्याच परमात्मरूपी हरीचें तुम्ही ध्यान करा, व स्तवनपूर्वक पूजन करीत जा ॥ ७० ॥ तसेंच योगादेशनामक हें स्तोत्र माझ्यापासून घेऊन मौनव्रती व सावधचित्त असे सर्व तुम्ही, आदरपूर्वक त्याचा जप करीत जा ॥ ७१ ॥ पूर्वीं सृष्टि करण्याची इच्छा करणारा व मरीचादिक ऋषींचा अधिपति जो भगवान् ब्रह्मदेव, त्यानें प्रजोत्पत्ति करण्याची इच्छा करणाऱ्या आम्हां भृग्वादिक पुत्रांना हेंच स्तोत्र सांगितलें होतें ॥ ७२ ॥ प्रजोत्पत्ति करण्याविषयीं ब्रह्मदेवानें प्रेरणा केली असतां आम्हीं प्रजापतींनीं ह्या स्तोत्राच्या योगानें प्रेरणा केली असतां आम्हीं प्रजापतींनीं, ह्या स्तोत्राच्या योगानें सर्व प्रतिबंधांचें निवारण करून अनेक प्रकारच्या प्रजा उत्पन्न केल्या ॥ ७३ ॥ यास्तव आतां सुद्धां जो कल्याणाविषयीं प्रयत्न करणारा पुरुष, वासुदेवपरायण व एकाग्रचित्त होऊन नित्य या स्तोत्राचा जप करितो त्याला लवकरच आत्यंतिक कल्याण प्राप्त होतें ॥ ७४ ॥ हे राजपुत्र हो, ह्या लोकीं कल्याणकारक अशा सर्व फळांमध्यें ज्ञान हेंच मोक्ष देणारें उत्कृष्ट फळ होय. कारण, ज्ञानरूपी नौकेचा आश्रय करणारा पुरुष, दुस्तर अशाहि संसारसमुद्राला अनायासानें तरून जातो ॥ ७५ ॥ असो. मी सांगितलें हें भगवंताचें स्तोत्र, जो पुरुष युक्त होऊन पठण करितो, तो प्रसन्न होण्यास योग्य व आराधना करण्यास कठीण अशाहि श्रद्धेनें श्रीहरीला सुखानें प्रसन्न करून घेतो ॥ ७६ ॥ आणि मी सांगितलेल्या स्तोत्रानें सावकाशपणें स्तुति केलेल्या ह्या श्रीहरीपासून पुरुष जें जें इष्टफळ इच्छितो तें तें त्यास प्राप्त होतें. कारण, तो भगवान् सर्व फलांचा एकच आश्रय आहे ॥ ७७ ॥ जो मनुष्य, पहांटेच्या वेळीं उठून श्रद्धापूर्वक हात जोडून या स्तोत्राचें श्रवण करितो, तो कर्मबंधापासून मुक्त होतो ॥ ७८ ॥ हे राजपुत्र हो, गायन केलेल्या ह्या परमपुरुष परमात्म्याच्या स्तोत्राचा जप करीत तुम्ही मोठें तप करा, म्हणजे त्याच्या योगानें शेवटीं तुम्हांला इच्छित फळ प्राप्त होईल ! ॥ ७९ ॥

**चोविसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २५ वा

मैत्रेय म्हणाला,— हे विदुरा, याप्रमाणें भगवान् रुद्रानें प्रचेत्यांना भगवत्स्तोत्राचा उपदेश केला असतां त्या प्राचीनबर्हिराजाच्या पुत्रांनीं रुद्राचें पूजन केलें आणि मग त्या राजपुत्रांच्या देखत तो रुद्र त्या ठिकाणींच अंतर्धान पावला ॥ १ ॥ नंतर त्या सर्व प्रचेत्यांनीं समुद्राच्या पाण्यांत उभें राहून रुद्रानें उपदेश केलेल्या भगवंताच्या स्तोत्राचा जप करीत दहा हजार वर्षेंपर्यंत तप केलें ॥ २ ॥ हे विदुरा, इकडे प्राचीनबर्हिराजा कर्मावर आसक्तचित्त झाल्यामुळें आत्मतत्त्व जाणणाऱ्या दयाळु नारदानें त्याला अध्यात्मतत्त्वाचा उपदेश केला ॥ ३ ॥ नारद म्हणाला,—" हे राजा, तूं काम्यकर्माचें अनुष्ठान करून स्वार्थाकरितां कोणत्या फलाची इच्छा करीत आहेस? अज्ञ लोकांच्या दृष्टीनें दुःखाची हानि व सुखाची प्राप्ति असें दोन प्रकारचें कर्मफल जरी दिसत आहे, तथापि तें नश्वर असल्यामुळें विचारी पुरुष त्या दोन्हींचीहि इच्छा करीत नाहींत " ॥ ४ ॥

प्राचीनबर्हिराजा म्हणाला,—हे महाभाग्यशाली नारदऋषे, कर्माच्या योगानें माझी बुद्धि विपरीत झाली आहे, यास्तव मोक्षरूप कल्याण म्हणजे काय हें मला समजत नाहीं. तरी ज्याच्या योगानें कर्मानें उत्पन्न होणाऱ्या पुण्यपापापासून मी मुक्त होईन, असें अहंताममतांची निवृत्ति करणारें निर्मळ ज्ञान तूं मला सांग ॥ ५ ॥ कारण, कपटधर्मानें युक्त व जन्ममरणरूप संसाराला मार्गभूत अशा गृहांत भ्रमण पावणाऱ्या आणि पुत्र, स्त्री व धन यांच्या ठिकाणीं, हाच परम पुरुषार्थ आहे, अशी बुद्धि धारण करणाऱ्या मूढ पुरुषाला मोक्ष कधींहि मिळत नाहीं ॥ ६ ॥

नारद म्हणाला,—हे प्रजापालक राजा, जीवांचे समुदाय तूं निर्दयपणें मारविले आहेस, ते पाहा! ॥ ७ ॥ राजा, तूं केलेल्या पीडेचें स्मरण होऊन त्यांना अतिशय राग आलेला आहे व 'केव्हां हा राजा मरून आमच्या स्वाधीन होईल अशी' ते वाट आहेत. तूं मृत झालास म्हणजे हे लोखंडाच्या भाल्यांसारख्या आपल्या शिंगांनीं मोठ्या त्वरेनें तुला छिन्नभिन्न करितील ॥ ८ ॥ यास्तव या संकटांतून तुला तारणारा पुरंजनचरित्ररूप पुरातन इतिहास आतां मी सांगतों, तो तूं एकाग्रचित्तानें श्रवण कर! ॥९॥ हे राजा, पुरंजन ह्या नांवाचा एक मोठा कीर्तिमान् राजा होता व ज्याचें कर्म कोणालाहि माहीत नाहीं असा त्याचा अविज्ञातनामक मित्र होता ॥ १० ॥ तो पुरंजनराजा आपणांस राहण्याचें स्थान पाहाण्याकरितां पृथ्वीवर फिरूं लागला; परंतु राहण्यास योग्य असें स्थान त्याला जेव्हां मिळालें नाहीं, तेव्हां तो मनांत खिन्न झाला ॥ ११ ॥ विषयभोगांची इच्छा करणाऱ्या त्या पुरंजनराजानें पृथ्वीवर जीं जीं नगरें पाहिलीं तीं तीं सर्व त्या विषयाच्या प्राप्तीला योग्य अशीं कांहीं त्याला वाटलीं नाहींत ॥ १२ ॥ मग एका वेळीं हिमाचलाच्या दक्षिणप्रदेशांत नऊ दरवाज्यांनीं

ओळखूं येणारी एक सुलक्षणिक नगरी त्यानें पाहिली ॥ १३ ॥ तिच्या सभोंवार तट, उपवनें व खंदक, उप्परमाड्या, गवाक्षें व शोभेकरितां बांधलेलीं तोरणें होतीं आणि सुवर्णाचीं, रुप्याचीं व लोखंडाचीं शिखरें असलेल्या घरांनीं तीं सर्वत्र गच्च भरून गेलीं होतीं ॥ १४ ॥ तिच्यामधील घरांच्या फरसबंद्या इंद्रनीळमणि, स्फटिक, वैडूर्य, मोतीं, पाच व माणकें यांच्या योगानें केलेल्या असल्यामुळें ती प्रकाशयुक्त होऊन नागांच्या भोगवतीनगरीप्रमाणें शोभत होती ॥ १५ ॥ तीमध्यें अनेक सभा, चव्हाटे, राजमार्ग क्रीडास्थानें, बाजार, विश्रांतिस्थानें, ध्वजांवर असलेल्या पताका आणि पोंवळ्यांनीं बांधिलेले ओटे जिकडेतिकडे दिसत होते ॥ १६ ॥ त्या नगरीच्या बाहेर एक आरामबाग होती, ती मनोहर वृक्ष व वेली यांनीं भरून गेलेली असून आंतील तलावांत मधुर शब्द करणारे व गुंजारव करणारे भ्रमर ह्यांचा सारखा कलकलाट होत होता ॥ १७ ॥ वसंतऋतूंत तेथें गार पाण्याचे झरे वाहात असून त्यांच्या तुषारांनीं भरलेल्या वायूनें, तेथील वृक्षांचे अंकुर व शाखा हालत होत्या व त्यामुळें सरोवरांच्या तीरांना मोठी शोभा प्राप्त झाली होती ॥ १८ ॥ ऋषींसारखें अहिंसाव्रत धारण करणारे अनेक प्रकारच्या वनपशूंचे समुदाय तींत असल्यामुळें तिच्यामध्यें कोणालाहि पीडा होत नसे आणि तिच्यांतील कोकिलपक्ष्यांच्या मधुर शब्दामुळें, जवळच्या मार्गानें जाणाऱ्या मनुष्याला आपल्याला ही बाग बोलावीतच आहे कीं काय, असें वाटत असे ॥ १९ ॥ त्या बागेमध्यें सहजगत्या आलेली एक अत्युत्तम स्त्री त्या पुरंजनराजाच्या दृष्टीस पडली. तिच्याबरोबर दहा सेवक असून त्यांपैकीं प्रत्येकाच्या हाताखालीं शंभर शंभर माणसें होतीं ॥ २० ॥ पांच पांच फडांचा द्वाररक्षक नाग सर्व बाजूंनीं तिचें रक्षण करीत होता व ती आपणांस योग्य असा श्रेष्ठ पति मिळविण्याच्या खटपटींत होती. तिचें वय सोळा वर्षांचें असून तिनें नाना प्रकारचे शृंगार धारण केले होते ॥ २१ ॥ ती अगदीं सुकुमार असून तिचें नाक, दांत, गाल आणि मुख हे अवयव फार सुंदर होते. तिच्या दोन्ही कानांची ठेवण एकसारखी असून त्यामुळें त्यांतील कुंडलांची फार चांगली शोभा दिसत होती ॥ २२ ॥ ती पिंवळी पैठणी नेसलेली होती व तिचा कटिभाग फार सुंदर होता. तिचा वर्ण सांवळा असून सुवर्णाचा कमरपट्टा तिनें धारण केला होता व चालतांना तिच्या पायांतील तोरड्यांचा रुणझुण शब्द होत असल्यामुळें ती देवतेसारखी शोभत होती ॥ २३ ॥ तिची गति गजासारखी असून, तिच्या स्तनांच्या सारख्या व वाटोळ्या आकारावरून तिनें यौवनांत नुकताच प्रवेश केला आहे असें दिसत होतें. ते स्तन एकमेकांना भिडलेले असून लज्जेमुळें ती त्यांना वारंवार पदरानें झांकीत होती ॥ २४ ॥ तिचें हास्य लज्जायुक्त असून त्यामुळें ती मनोहर दिसत होती. अशा त्या स्त्रीला पाहतांच प्रेमानें भ्रमण पावणाऱ्या तिच्या भ्रुकुटीरूप धनुष्यापासून सुटलेल्या स्नेहयुक्त कटाक्षरूप बाणानें वीर पुरंजनराजा विद्ध झाला आणि तिच्याशीं मनोहर भाषण करूं लागला ॥ २५ ॥ तो म्हणाला, — हे कमलपत्राक्षि, तूं कोण आहेस ? हे सुंदरि, तूं येथें कोठून आलीस ? हे मर्यादशील तरुणी, या नगरीजवळ फिरत राहून तूं काय करूं

इच्छित आहेस हें मला सांग ॥ २६ ॥ तसेंच हे जे तुझे अकरा शूर सेवक आहेत हे कोण ? हे सुंदरि, या तुझ्याबरोबरच्या स्त्रिया कोण, तसाच हा तुझ्यापुढें चालणारा सर्प तरी कोण आहे ? ॥ २७ ॥ हे सुंदरि, या एकांत वनामध्यें तूं केलेल्या चरणसेवेनेंच ज्याचे सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत असा आपला पति जो धर्म त्याची मुनिवृत्ति धारण करणारी तूं ही देवता आहेस ! कीं, शिवाचा शोध करणारी पार्वती आहेस ? किंवा ब्रह्मदेवाचा शोध करणारी सरस्वती आहेस ? अथवा विष्णूचा शोध करणारी लक्ष्मी आहेस ? लक्ष्मी असशील तर तुझ्या लीलाकमळाचा कळा तुझ्या हातांतून कोठें पडला कीं काय ? ॥ २८ ॥ परंतु, हे सुंदरि, तूं पायांनीं भूमीला स्पर्श करीत आहेस यावरून तूं ह्या देवतांपैकीं कोणी नव्हेस. विष्णूसह लक्ष्मी जशी वैकुंठ-लोकाला शोभा आणित्ये त्याप्रमाणें, या लोकींच्या भोगसाधनांविषयीं दक्ष व पराक्रमी अशा माझ्यासहवर्तमान ही नगरी सुशोभित करण्याला तूं योग्य आहेस ॥ २९ ॥ हे सुंदरि, तुझ्या कटाक्षानें माझें चित्त मोहित झालें असून तुझ्या सलज्ज व सप्रेम हास्यपूर्वक भ्रमण पावणाऱ्या भ्रुकुटीच्या योगानें प्रेरणा केलेला भगवान् मदन मला अतिशय प्रिय आहे, तरी तूं माझ्यावर अनुग्रह कर ! ॥ ३० ॥ हे चारुहास्ये, सुंदर भ्रुकुटींनीं आणि उत्तम बाहुल्यांच्या डोळयांनीं युक्त असून लांब लांब अशा निळ्या कुरळ केसांनीं वेष्टिलेलें आणि मनोहर भाषण करणारें आपलें मुख तूं लज्जेमुळें माझ्यासमोर करीत नाहींस; पण तें वर करून तूं मला दाखीव ॥ ३१ ॥

नारद म्हणाला,——हे वीरश्रेष्ठा राजा, याप्रमाणें कामवश होऊन तो पुरंजनराजा अधीर पुरुषासारखी त्या स्त्रीची प्रार्थना करूं लागला असतां त्याच्या स्वरूपसौंदर्यानें मोहित होऊन सप्रेम हास्य करणाऱ्या त्या स्त्रीनेंहि आपणांस इच्छित विषयभोग देणाऱ्या, त्याचा पति म्हणून स्वीकार केला, आणि मग त्याला ती म्हणाली ॥ ३२ ॥ हे पुरुषश्रेष्ठा, माझा तसाच तुझाहि उत्पादक कोण आहे हें मला ठाऊक नाहीं व आमचें गोत्र व नांव ज्यानें आम्हांल दिलें त्यालाहि आम्ही जाणत नाहीं ॥ ३३ ॥ माझें राहण्याचें स्थान अशी ही नगरी देखील कोणी निर्माण केली तें मला ठाऊक नाहीं. आज ह्या नगरीमध्यें तूं, मी व हे माझे मित्र आदिकरून आहेत, इतकें मात्र आम्हांला समजतें. याहून दुसरें आम्हांस कांहींच ठाऊक नाहीं ॥ ३४ ॥ हे प्रियकरा, हे अकरा पुरुष माझे मित्र आहेत व ह्या स्त्रिया माझ्या सख्या आहेत. मी निद्रिस्त झाल्यें म्हणजे हा सर्प माझ्या ह्या नगरीचें रक्षण करीत जागृत राहतो ॥ ३५ ॥ हे शत्रुदमना, तुझें कल्याण असो. माझ्या सुदैवानें तूं येथें आलास व तूंहि विषयभोगांची इच्छा करीत आहेस, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. जे पाहिजे असतील ते विषय मी तुला आपल्या मित्रांसहवर्तमान संपादन करून देईन ॥ ३६ ॥ हे नाथा, मीं प्राप्त करून दिलेल्या विषयांचा उपभोग करीत तूं शंभर वर्षेपर्यंत ह्या माझ्या नऊ दरवाज्यांच्या नगरीमध्यें सुखानें वास कर ! ॥ ३७ ॥ प्राणप्रिया, तुला सोडून या लोकींचें विषयसुख न जाणणाऱ्या, परलोकीं सुख होण्याचें साधनानुष्ठान न ×

× करणाऱ्या व उद्या आपलें कसें चालेल याचा विचार न करणाऱ्या पशुतुल्य पुरुषाशीं ××

४४ मी कशी रममाण होईन ? ॥ ३८ ॥ अहो, या गृहस्थाश्रमामध्यें अर्थ व काम हाच धर्म असून पुत्रसुख म्हणजेच मोक्ष होय व यज्ञांच्या अनुष्ठानानें प्राप्त होणारे शुद्ध व शोकरहित लोक हेच कीर्तिदायक होत. गृहस्थाश्रमाचा त्याग करणाऱ्या संन्याशांना त्यांचें ज्ञान कोठून होणार ? ॥ ३९ ॥ म्हणूनच या संसारामध्यें गृहस्थाश्रम हा पितर, देव, ऋषि, मनुष्य, सर्व प्राणी व स्वतः आपण या सर्वांचें कल्याण करणारा असें आश्रयस्थान आहे असें वेदवेत्ते म्हणतात ॥ ४० ॥ यास्तव हे नाथा, लोकांमध्यें वीर म्हणून प्रख्यात असलेल्या, उदारचित्त व अतिसुंदर अशा तुझ्यासारख्या आपण होऊन प्राप्त झालेल्या प्रिय पतीला कोणती बरें माझ्यासारखी स्त्री वरणार नाहीं ? ॥ ४१ ॥ हे महापराक्रमी वीरा, दयेनें प्रेरित होऊन आपल्या हास्यपूर्वक अवलोकनानें आम्हांसारख्या दीन जनांची मनःपीडा नाहींशी करण्याकरितां तूं पृथ्वीवर संचार करीत असल्यामुळें या तुझ्या सर्पदेहासारख्या अतिमृदु बाहूंवर कोणत्या बरें स्त्रीचें मन आसक्त होणार नाहीं ? ॥ ४२ ॥

नारद म्हणाला,—हे राजा, याप्रमाणें त्या बागेमध्यें त्या स्त्रीपुरुषांनीं परस्परांस वरण्याचा संकेत करून त्या नगरीमध्यें प्रवेश केला आणि तीं उभयतां तेथें शंभर वर्षेंपर्यंत आनंदानें राहिलीं ॥ ४३ ॥ तो पुरंजनराजा त्या नगरीमध्यें स्त्रियांसह क्रीडा करीत असतां स्तुतिपाठक त्याचें स्तवन करीत व उष्णकाळीं तो तापशांत्यर्थ नदीमध्यें प्रवेश करून क्रीडा करीत असे ।४४। त्या नगरींतून निरनिराळ्या देशांमध्यें जाण्यासाठीं वरच्या बाजूला सात द्वारें केलेलीं होतीं व खालच्या बाजूला दोन होतीं ॥ ४५ ॥ त्या सात द्वारांपैकीं पांच पूर्वदिशेकडे, एक दक्षिणेकडे, एक उत्तरेकडे व दोन पश्चिमेकडे अशीं होतीं. हे राजा, त्यांचीं तुला नांवें सांगतों तीं ऐक ॥ ४६ ॥ पूर्वेकडे खद्योत आणि आविर्मुखी या नांवांचीं दोन द्वारें एकाच ठिकाणीं लाविलेलीं होतीं. त्या द्वारांनीं द्युमान्‌नामक आपल्या मित्रासह तो, पुरंजन राजा विभ्राजित नामक देशाकडे जात असे ॥ ४७ ॥ पूर्वेकडे तशींच नलिनी व नालिनी अशीं आणखी दोन द्वारें एका ठिकाणीं असून, त्या अवधूतनामक आपल्या मित्रासह तो राजा सौरभ नांवाच्या देशास जात असे ॥ ४८ ॥ मुख्या ह्या नांवाचें एक द्वार आहे. त्यानें तो पुराधिपति राजा रसज्ञ आणि विपण या दोन मित्रांसह बहूदन व आपण या देशांत जातो ॥ ४९ ॥ दक्षिणेकडील पितृहू नांवाच्या द्वारानें पुरंजनराजा, श्रुतधरनामक मित्रासह दक्षिणपंचाल देशास जातो आणि उत्तरेकडील देवहूनामक द्वारानें त्याच श्रुतधरनामक मित्रासह तो उत्तरपंचाल देशीं जातो ॥ ५० ॥ ५१ ॥ पश्चिमेकडच्या आसुरी नांवाच्या द्वारानें पुरंजनराजा दुर्मद नांवाच्या मित्रासह ग्रामनांवाच्या देशाला जात असतो ॥ ५२ ॥ तसाच निर्ऋति नांवाच्या पश्चिमेकडील द्वारानें लुब्धक ह्या नांवाच्या मित्रासह तो वैशसनामक देशाला जातो ॥ ५३ ॥ या पुरवासी लोकांमध्यें निर्वाक आणि पेस्कृत असे दोघे जण आंधळे असून त्यांच्यासह डोळसांचा अधिपति असा तो पुरंजनराजा पाहिजे तिकडे जातो व सर्व व्यवहार करितो ॥ ५४ ॥ विषूचीननामक प्रधानासहवर्तमान जेव्हां अंतःपुरात जातो, तेव्हां पत्नी व पुत्र, यांपासून उत्पन्न होणाऱ्या, मोह, प्रसन्नता व हर्ष या

विकारांचा अनुभव त्याला येतो ॥ ५५ ॥ याप्रमाणें कर्मामध्यें गढून गेलेला विषयासक्त अज्ञानी व स्त्रीच्या नादानें फसून गेलेला तो पुरंजनराजा राणी जें जें म्हणे तें तें सारें करीत असे ॥ ५६ ॥ एखादे वेळीं ती स्त्री मद्य पिऊं लागली असतां तो पुरंजनहि मद्यप्राशन करून मदानें विव्हळ होई. केव्हां ती भोजन करूं लागली, म्हणजे तोहि भोजन करी. तसेंच ती कांहीं पदार्थ खाऊं लागली म्हणजे तोहि तसाच खात असे ॥ ५७ ॥ ती केव्हां गाऊं लागली कीं, हा गाऊं लागे आणि एखादे वेळीं ती रडूं लागली तर हा देखील रडूं लागे. ती हसूं लागली कीं यानेंहि हसावें व ती बडबडूं लागली कीं यानेंहि बडबडूं लागावे. ॥ ५८ ॥ केव्हां ती धावूं लागली तर यानेंहि धावावें आणि ती उभी राहिली कीं त्यानेंहि तिच्याबरोबर उभें रहावें. तसेंच तिनें झोंप घेतली कीं यानेंहि झोंप घ्यावी व ती बसली कीं यानेंहि बसावें ॥ ५९ ॥ ती ऐकूं लागली कीं हा ऐकत बसे, ती कांहीं पाहूं लागली कीं हाही पाहूं लागे, कधीं ती हुंगूं लागली तर तो हुंगूं लागे आणि ती केव्हां एखाद्या स्पर्शसुखाचा अनुभव घेऊं लागली कीं तो पुरंजनराजाहि तसें स्पर्शसुख घेई ॥ ६० ॥ क्वचित् प्रसंगीं पत्नी शोक करूं लागली, तर हाही दीनासारखा तिच्यामागून शोक करी व ती हर्ष पावली कीं हासुद्धां हर्षित होई आणि ती आनंदित झाली म्हणजे हाहि तिजसह आनंद पावे ॥ ६१ ॥ ह्याप्रमाणें स्त्रीनें आपल्या स्वाधीन करून घेतलेला व प्रधानांनीं फसविलेला तो अज्ञानी पुरंजनराजा अगदीं परवश होऊन गेल्यामुळें स्वतःची इच्छा नसतांहि जसा क्रीडेसाठीं पाळलेला पशु धन्याच्या मागोमाग फिरत असतो, त्याप्रमाणें स्त्री जें जें करील त्याचें त्याचें तो अनुकरण करीत असे ॥ ६२ ॥

## पंचविसावा अध्याय समाप्त

---

नारद म्हणाला,—हे प्राचीनबर्हि राजा, एकदां अकरा सैन्यांचा अधिपति असा तो पुरंजन राजा—सुवर्णाचें कवच, अक्षय भाता आणि मोठें धनुष्य धारण करून, पांच घोडे, दोन दांड्या, दोन चक्रें, एक आंस, तीन ध्वज, पांच बन्धनें, एक लगाम, एक सारथी, एक बैठक, दोन जोखडें, पांच शस्त्रें, सात आच्छादनें, पांच प्रकारच्या गति आणि सुवर्णाचे अलंकार यांनीं युक्त अशा आपल्या वेगवान् रथांत बसून मृगया करण्यासाठीं पंचप्रस्थ नांवाच्या अरण्यांत गेला ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥ मृगया करण्याची उत्कट इच्छा झाल्यामुळें हातांमध्यें धनुष्यबाण धारण करून तो गर्विष्ठ पुरंजनराजा, दूर करण्यास अयोग्य अशाहि आपल्या स्त्रीला सोडून मृगया करूं लागला ॥ ४ ॥ निर्दय व भयंकरस्वरूपी त्या राजानें आसुरी वृत्तीचा अंगीकार करून त्या बनांत असलेल्या पुष्कळ पशूंचा आपल्या तीक्ष्ण बाणांनीं वध केला ॥५॥ राजा, मृगयेसंबंधानें शास्त्रानें असा नियम केला आहे कीं, मांसभक्षणाविषयीं अतिशय लुब्ध अशा राजानेंसुद्धां यज्ञादि कार्यापुरतीच वनामध्यें पवित्र पशूंची हिंसा करावी ॥ ६ ॥ हे राजेंद्रा, जो विद्वान् पुरुष, या नियमाप्रमाणें वागतो तो त्या कर्माच्या योगानें लिप्त होत नाहीं ॥ ७ ॥ पण जो पुरुष या शास्त्रनियमाचें उल्लंघन करून अभिमानपूर्वक कर्में करितो, तो त्या कर्माच्या आचरणानें विवेकभ्रष्ट होऊन नरकांत पडतो ॥ ८ ॥ असो. इकडे बनामध्यें पुरंजन राजाच्या चित्रविचित्र पिसाऱ्यांच्या बाणांनीं छिन्नभिन्न अवयव होऊन दुःखित झालेल्या मृगांचा, कृपाळू जनांना कळवळा येण्यासारखा नाश झाला ॥ ९ ॥ त्या वनामध्यें ससे, डुक्कर, महिष, गवे, काळवीट, हरिण आणि साळिंदर असे यज्ञीय पशु व दुसरेहि अनेक प्रकारचे पशु यांचा वध करितां करितां तो पुरंजन राजा थकून गेला ॥ १० ॥ नंतर क्षुधेनें व तृषेनें व्याकुळ झाल्यामुळें वनांतून तो घरीं परत आला आणि स्नान व योग्य आहार केल्यावर कांहीं वेळपर्यंत शयन केल्यामुळें त्याचा श्रमपरिहार झाला ॥ ११ ॥ नंतर सुगंधी द्रव्यें, चंदनाची उटी, पुष्पांच्या माळा इत्यादिकांनीं आपणांस भूषित करून, सर्व अवयवांवर अलंकार धारण केले असतां राणीच्या समागमाची त्याला इच्छा झाली ॥ १२ ॥ त्या वेळीं तारुण्यानें उन्मत्त, भोजनानें तृप्त आणि आनंदित व मदनानें व्याकुळचित्त झालेल्या त्या पुरंजन-राजानें जिकडे तिकडे स्त्रीचा शोध केला; परंतु गृहस्थधर्मास योग्य अशी त्याची सुंदर भार्या त्याला कोठें आढळेना ॥ १३ ॥ हे प्राचीनबर्हि राजा, तेव्हां तो मनामध्यें खिन्न झाला आणि अंतःपुरांतील राणीच्या सख्यांना तिजविषयीं विचारूं लागला. तो म्हणाला,—'हे स्त्रियांनो, तुम्ही सर्वजणी आपल्या धनिणीसह पूर्वीप्रमाणेंच खुशाल आहां ना ? कारण, मीं मृगयेला जाण्याच्या पूर्वीं घराचें वैभव घरामध्यें जसें शोभत होतें तसें तें आतां शोभत नाहीं, यामुळें मला शंका उत्पन्न झाली आहे ॥ १४ ॥ घरामध्यें संपत्ति पुष्कळ असली तरी त्यांत जर माता किंवा पतिव्रता पत्नी नसेल तर 'चाकें वगैरे अवयव मोडून गेलेल्या रथाप्रमाणें' दुःखकारक झालेल्या त्या घरामध्यें कोणता बरें चतुर पुरुष दीनासारखा वास करील ? ॥ १५ ॥ वास्तव मी संकटांत सांपडलों असतां पदोपदीं माझ्या ज्ञानशक्तीला

बोध करून जी त्यांतून माझा उद्धार करी, ती माझी प्रियपत्नी आतां कोठें आहे तें मला सांगा ॥ १६ ॥

स्त्रिया म्हणाल्या,—हे शत्रुनाशका राजा, आपल्या प्रियेनें आज मनांत काय आणिलें आहे तें आम्हांला ठाऊक नाहीं. कारण, ही पाहा! ती तेथें चटई देखील नसलेल्या भूमीवर रुसून निजली आहे! ॥ १७ ॥

नारद म्हणाला, पुरंजनराजानें, भूमीवर अस्ताव्यस्त पडलेल्या त्या आपल्या भार्येला जेव्हां पाहिलें, तेव्हां तिच्या संगतीमुळें त्याचें ज्ञान नष्ट होऊन तो अत्यंत व्याकुळ झाला ॥ १८ मग तो मनांत खिन्न होऊन मधुर वाणीनें तिचें सांत्वन करूं लागला; परंतु तिचा आपल्यावर राग कां झाला याचें कारण त्याला समजलें नाहीं ॥ १९ ॥ तरी तिला वश करून घेण्याचें चातुर्य त्याच्यांत असल्यामुळें त्यानें तिचें हळूहळू सांत्वन केलें. प्रथम त्यानें तिच्या पायांवर आपलें मस्तक ठेवून, नंतर तिला आपल्या मांडीवर बसविलें आणि तिला कुरवाळून तो तिच्याशीं बोलूं लागला ॥ २० ॥

पुरंजन म्हणाला,—हे सुंदरी, सेवकांना, अपराधानुरूप शिक्षा करणें हें धन्याचें कर्तव्यकर्म आहे. असें असतां, ज्या अपराध करणाऱ्या सेवकांना आपलेपणाच्या भावनेनें धनी शिक्षा करीत नाहींत; ते सेवक खरोखर मंदभाग्य होत ॥ २१ ॥ हे सुंदरी, अपराध करणाऱ्या सेवकांना स्वामीनें केलेला दंड म्हणजे केवळ अनुग्रहच होय. परंतु दंड झाल्यामुळें क्रोधाविष्ट होणारा सेवक मूर्ख होय. कारण तें धन्यानें केलेलें हितकृत्य त्याला समजत नाहीं. ॥ २२ ॥ हे सुंदरी, हे मानी स्त्रिये, तूं आमची स्वामिनी आहेस, यास्तव अतिशयम प्रेमळपणा आणि लज्जा यांच्यामुळें उत्पन्न झालेल्या मंदहास्यानें ज्याची दृष्टि शोभत आहे, आणि जें नीलवर्ण केशरूप भ्रमरांनीं भूषित झालें असून सरळ व उंच नाक आणि मधुर भाषण यांनीं युक्त आहे, असें आपलें मुख तूं मला दाखव, मी तुझ्या कृपेला पात्र आहे ॥ २३ ॥ हे वीरपत्नि, ब्राह्मण किंवा विष्णूचे भक्त यांच्याशिवाय जर दुसऱ्या कोणी तुझा अपराध केला असेल तर मला सांग, म्हणजे आतांच मी त्याला दंड करितों! कारण माझा अपराध करून निर्भयपणें आनंदांत राहणारा पुरुष त्रैलोक्याच्या आंत तर काय, परंतु बाहेर सुद्धां कोठें दिसणें शक्य नाहीं! ॥२४॥ हे प्रिये, कुंकुमतिलकविहीन होऊन मलिन, हर्षरहित, रागानें भयंकर आणि तेजोहीन व त्यांमुळें स्नेहशून्य झालेलें हें तुझें मुख माझ्यानें बघवत नाहीं. तसेच तुझे सुंदर स्तनहि शोकाश्रूंनीं भिजून गेलेले असून पिकलेल्या तोंडल्यासारख्या तुझ्या ओठांचा केशरासारखा लाल रंगहि नष्ट झाला आहे ॥ २५ ॥ तूं रागावल्यामुळें मी अतिदुःखित झालों आहे. तरी व्यसनासक्त होऊन तुला न विचारितां वनांत गेलों हा तुझा मी मोठा अपराध केला; परंतु वस्तुतः तुजविषयीं माझ्या मनांत अत्यंत प्रेम आहे. यास्तव आतां तूं

मजवर प्रसन्न हो ! कारण मदनाच्या त्रासानें धैर्यहीन झालेल्या व आपणांस अनुकूल असून रतिसुख देणाऱ्या अशा पतीचा विषयभोगाकरितां कोणती बरें कामिनी स्त्री स्वीकार करणार नाहीं ? ॥ २६ ॥

**सव्विसावा अध्याय समाप्त**



# अध्याय २७ वा

नारद म्हणाला—हे प्राचीनबर्हि राजा, याप्रमाणें ती पुरंजन राजाची स्त्री, विलासांनीं आपल्या पतीला पूर्णपणें स्वाधीन करून घेऊन त्याला रमवीत आपणहि रमूं लागली ॥ १ ॥ तिनें उत्तम प्रकारें स्नान करून कुंकुमादिक मंगल अलंकार धारण केले आणि अन्नादिकांच्या सेवनानें तृप्त होऊन ती जवळ आली असतां, आपल्या सुंदर मुखयुक्त राणीचा त्यानें हर्षपूर्वक अंगीकार केला ॥ २ ॥ नंतर तिनें त्याला दृढ आलिंगन दिलें असतां त्यानें तिच्या गळ्याला मिठी मारिली. त्या एकांतस्थळीं तिच्या अनुकूल गुह्यभाषणाच्या योगानें त्याचा विवेक नष्ट झाला आणि रात्रंदिवस स्त्रीवश होऊन राहिल्यामुळें अपरिहार्य अशा काळाच्या वेगाचेंहि त्याला भान राहिलें नाहीं ॥ ३ ॥ अज्ञानानें त्याला घेरून टाकल्यामुळें त्याचा विषयभोग अतिशय वाढला आणि अंतःकरणामध्यें नाना प्रकारचे संकल्पविकल्प चालले असतां, तो राणीचा हात उशाला घेऊन उत्कृष्ट शय्येवर निद्रा घेत राहिला. त्यानें त्या राणीलाच सर्वस्व मानून आपलें स्वरूपभूत जें परब्रह्म त्याची मुळींच जाणीव ठेविली नाहीं ॥ ४ ॥ हे राजेंद्रा, याप्रमाणें कामाच्या योगानें मोहितचित्त होऊन स्त्रीच्याबरोबर क्रीडा करणाऱ्या त्या राजाचें तारुण्य अर्ध्या क्षणासारखें निघून गेलें ॥५॥ हे प्रजापालका राजा, त्या पुरंजनाला त्या पत्नीपासून अकराशें पुत्र झाले आणि आईबापांचें यश वाढविणाऱ्या व सुस्वभाव औदार्यादिक गुणांनीं संपन्न अशा एकशेंदहा कन्याहि झाल्या. त्यांना पौरंजनी असें म्हणतात. इतकें होत आहे तों पुरंजनाचें अर्धें आयुष्य संपून गेलें ॥ ६ ॥ ७ ॥ नंतर त्या पंचालाधिपति पुरंजन राजानें, पितृवंशाचा विस्तार करणाऱ्या आपल्या पुत्रांचा यथायोग्य स्त्रियांशीं व कन्यांचा वरांशीं विवाह केला ॥ ८ ॥ त्या पुत्रांनाहि प्रत्येकाला शंभर शंभर पुत्र झाले व त्यांच्या योगानें पुरंजन राजाचा वंश पंचालदेशांत सर्वत्र विस्तार पावला ॥ ९ ॥ तो पुरंजनराजा, आपले पुत्र, नातू, घर, द्रव्यभांडार, सेवक व देश याविषयींच्या उत्तरोत्तर वाढत चाललेल्या ममत्वानें अगदीं बद्ध झाला ॥ १० ॥ आणि अनेक प्रकारच्या विषयभोगांच्या इच्छा धारण करून त्यानें तुझ्याप्रमाणें यज्ञदीक्षा घेतली व पशुहिंसाप्रधान असे घोर यज्ञ करून, देव, पितर आणि भूतपति यांचें आराधन केलें ॥ ११ ॥ याप्रमाणें आत्महितकारक अशा योग्य कर्मांविषयीं दुर्लक्ष करून, कुटुंबावरच आसक्त झालेल्या त्या पुरंजन राजाला, ज्यांना स्त्रियाच प्रिय आहेत अशा पुरुषांना आवडत नसणारा असा वृद्धपणा प्राप्त झाला ॥ १२ ॥ हे राजा, चंडवेग ह्या नांवाचा एक गंधर्वांचा राजा असून त्याच्या हाताखालीं तीनशें साठ बलाढ्य गंधर्व आहेत ॥ १३ ॥ त्या प्रत्येक गंधर्वाची एक एक अशा श्वेतवर्ण व कृष्णवर्ण मिळून तीनशेंसाठ गंधर्वी स्त्रिया आहेत. गंधर्वांशीं संग करणाऱ्या त्या स्त्रिया संचार करीत करीत सर्व उपभोग्य विषयांनीं भरलेल्या अशा

पुरंजनराजाच्या नगरीला लुटीत चालल्या. ॥ १४ ॥ ते चंडवेगाचे सेवक जेव्हां पुरंजनाचें नगर लुटून नेऊं लागले, तेव्हां त्या नगरांत जागत बसलेल्या प्रजागरनामक नागानें त्यांचा निषेध केला ॥ १५ ॥ हे राजा, पुरंजनाच्या नगराचें रक्षण करणाऱ्या त्या बलिष्ठ अशा एकट्याच नागनें त्या सातशेंवीस गंधर्वांबरोबर शंभर वर्षेंपर्यंत युद्ध केलें ॥ १६ ॥ सातशें विसांबरोबर दीर्घकाळपर्यंत युद्ध करून आपला संबंधी असा तो नाग थकून गेला असें पाहून राष्ट्र, नगरें व संबंधी सर्व लोक यांसह तो पुरंजनराजा घाबरा होऊन मोठ्या चिंतेंत पडला ॥ १७ ॥ तो नाग गंधर्वांबरोबर युद्ध करीत असतां पुरंजनराजा त्या नगरीमध्यें व बाहेरच्या पंचाल देशांमध्यें, आपल्या दूतांनीं आणून दिलेल्या करभारांचा स्वीकार करीत होता आणि स्त्रीनें त्याला अगदीं वश करून टाकिलें होतें. यास्तव पुढें प्राप्त होणारें भय त्याला समजून आलें नाहीं ॥ १८ ॥ हे प्राचीनबर्हि राजा पूर्वी काळाची कोणी एक कन्या आपल्याला वर मिळावा या इच्छेनें त्रैलोक्यामध्यें फिरत असतां कोणीच तिचा स्वीकार करीना ॥ १९ ॥ कारण, ती स्वतःच्या भाग्यहीनपणामुळें जगतामध्यें ‘दुर्भगा’ या नांवानें प्रसिद्ध झाली होती. पुरुराजानें मात्र पूर्वी तिला कांहीं वेळपर्यंत वरिली असल्यामुळें तिनें संतुष्ट होऊन त्याला राज्यप्राप्तिरूप वर दिला होता ॥ २० ॥ याप्रमाणें वर पाहण्याकरितां सर्व ठिकाणीं फिरत असणाऱ्या त्या कन्येनें, एके वेळीं ब्रह्म-लोकाहून पृथिवीवर आलेल्या मला नारदाला, मी नैष्ठिक ब्रह्मचारी आहें असें जाणत असूनहि काममोहित होऊन ‘तूं माझा पति हो!’ असें म्हटलें ॥ १२ ॥ तेव्हां मी वरीत नाहीं म्हणून तिला सांगितलें असतां, तिनें माझ्यावर रागावून मला मोठा शाप दिला. ती म्हणाली, हे नारदमुने, मी तुझ्याजवळ याचना केली असतांहि तूं माझा अंगीकार करीत नाहींस, त्यापेक्षां तुझें एका ठिकाणीं फार वेळपर्यंत रहाणें घडणार नाहीं ॥ २२ ॥ असो. मी तिचा अव्हेर केल्यामुळें मला वरण्याचा तिचा संकल्प फुकट गेला. नंतर त्या कन्येनें, मी सांगितलेल्या भयनामक यवनाधिपतीच्या जवळ जाऊन त्याला वरण्याविषयीं त्याची प्रार्थना केली ॥ २३ ॥ ती म्हणाली, हे वीरा, यवनांचा पति म्हणून मी तुला वरिल्यें. कारण, प्राणिमात्रांनीं तुझ्याविषयीं केलेला संकल्प कधींही खरोखर फुकट जात नाहीं ॥ २४ ॥ हे नाथा, जो कोणी, लौकिकव्यवहारानें अथवा शास्त्रानें प्राप्त झालेल्या वस्तूचें दान करीत नाहीं व त्याचा स्वीकारहि करीत नाहीं, ह्या दोघांहि अज्ञपुरुषांची साधूलोक निंदा करितात, ॥ २५ ॥ यास्तव हे कल्याणप्रद राजा, तुझ्या सेवेसाठीं प्राप्त झालेल्या माझा तूं स्वीकार कर आणि माझ्यावर दया कर. कारण, दुःखी जनांवर कृपा करणें हाच पुरुषांचा मुख्य धर्म होय ॥ २६ ॥ हे राजा, याप्रमाणें कालकन्येनें केलेलें भाषण श्रवण करून यवनाधिपतीनें देवांचें कांहीं गुप्त कार्य करण्याची इच्छा मनांत धरून हास्यपूर्वक तिला उत्तर केलें ॥ २७ ॥ तो म्हणाला, हे कालकन्ये, मी आपल्या ज्ञानदृष्टीनें तुला एक पति योजून ठेविला आहे. तूं लोकांचें अनिष्ट करणारी असल्यामुळें लोकांना आवडत नाहींस, म्हणून हे लोक तुझा अंगीकार करीत नाहींत ॥ २८ ॥ तर तूं कोठून कशी फिरत्येस हें कोणाच्याहि लक्षांत न येईल अशा रीतीनें वागून कर्मांच्या योगानें निर्माण

केलेल्या सर्वहि लोकांचा बलात्कारानें तूं उपभोग घे ! तूं माझ्या सेनेला बरोबर घेऊन जा, म्हणजे लोकांचा नाश तुला करतां येईल ।। २९ ।। हा प्रज्वारनामक माझा भाऊ आहे आणि तूं माझी बहीण हो, म्हणजे मी तुम्हां दोघांच्या समागमानें कोणाच्या लक्षांत न येतां यवनादिकांची भयंकर सेना बरोबर घेऊन या लोकांमध्यें संचार करीन ।। ३० ।।

**सत्ताविसावा अध्याय समाप्त**



# अध्याय २८ वा

नारद म्हणाला,— हे प्राचीनबर्हिराजा, भयनामक यवनेश्वराचे जे आज्ञाधारक सेनापति होते ते प्रज्वार आणि कालकन्या यांच्यासह ह्या पृथ्वीवर फिरत असत ॥ १ ॥ राजा, एके वेळीं त्यानें म्हाताऱ्या सर्पानें रक्षण केलेल्या भूमीवरील सर्व उपभोग्य वस्तूंनीं परिपूर्ण असलेल्या त्या पुरंजन राजाच्या नगरीला बलत्कारानें वेढा घातला ॥ २ ॥ आणि जिनें व्यापून टाकिलेला, पुरुष तात्काळ हतवीर्य होतो, ती कालकन्याहि पुरंजन राजाच्या पुराचा बलात्कारानें उपभोग घेऊं लागली ॥ ३ ॥ ती उपभोग घेत असलेल्या त्या सर्व नगरीमध्यें, यवनांनीं चारी द्वारांनीं प्रवेश केला आणि तिचा ते विध्वंस करूं लागले ॥ ४ ॥ याप्रमाणें ती नगरी अत्यंत पीडित झाली असतां, तिचा अभिमान बाळगणाऱ्या व तिच्या ममतेनें व्याकूळ झालेल्या पुरंजनराजाला नाना प्रकारचे ताप होऊं लागले ॥ ५ ॥ तेव्हां कालकन्येनें दृढ आलिंगन दिल्यामुळें निस्तेज झालेला, गंधर्वांनीं व यवनांनीं बलात्कारानें ऐश्वर्य हिरावून घेतलेला, विषयभोगांत चित्त गुंतून गेल्यामुळें बुद्धिभ्रंश झालेला व दीन असा तो पुरंजनराजा, आपल्या नगरीचा विध्वंस झाला, पुत्र, पौत्र, सेवक व प्रधान हे आपणास प्रतिकूल होऊन आपला अनादर करूं लागले, आपली भार्या आपणांवर प्रेम करीत नाहींशी झाली, आपणांला कालकन्येनें ग्रासून टाकिलें, आपला पंचालदेश शत्रूंनीं दूषित केला, असें पाहून तो राजा मोठ्या चिंतेंत पडला; पण प्राप्त झालेल्या संकटाचा प्रतिकार करण्याचा त्याला कांहींच उपाय सुचेना ॥ ६ ॥ ७ ॥ ८ ॥ नंतर कालकन्येनें उपभोग घेतल्यामुळें निःसार होऊन गेलेल्याहि विषयांचा अभिलाष करणारा व परलोकांतील गति व इहलोकांतील पुत्रादि स्नेह हीं दोन्हींहि नष्ट झालीं असतांहि पुत्रांचें व स्त्रीचें लालन करणाऱ्या अशा त्या राजानें, गंधर्व आणि यवन यांनीं छापा घातलेल्या व कालकन्येनें जर्जर केलेल्या त्या आपल्या नगरीला, इच्छा नव्हती तरी मोठ्या कष्टानें सोडून जाण्याचा विचार मनांत आणिला ॥ ९ ॥ १० ॥ इतक्यांत, भयनामक यवनेश्वराचा वडील भाऊ प्रज्वार तेथें येऊन पोंचला आणि त्यानें आपल्या भावाचें प्रिय करण्यासाठीं त्या सगळ्या नगरीला आग लावून दिली ॥ ११ ॥ तेव्हां ती जळूं लागली असतां, नागरिक जन व सेवकवर्ग. स्त्री व पुत्रादिक संतति यांसह तेथें संसार करणाऱ्या त्या पुरंजन राजाला फारच ताप होऊं लागला ॥ १२ ॥ त्या वेळीं कालकन्येनें ग्रासून टाकिलेल्या त्या नगरींतील आपलीं राहण्याचीं सर्व ठिकाणें यवनांनीं व्यापून टाकिल्यामुळें व प्रज्वारानें अतिशय उपद्रव दिल्यामुळें नगराचें संरक्षण करणाऱ्या पांच फडांच्या नागालाहि अतिशय त्रास झाला ॥ १३ ॥ अतिकष्ट होऊं लागल्यामुळें थरथर कांपणाऱ्या त्या नागाला जेव्हां त्या नगरीचें रक्षण करण्याचें सामर्थ्य राहिलें नाहीं, तेव्हां ज्याप्रमाणें अग्नीनें जळत असलेल्या वृक्षांच्या ढोलींतून सर्पानें

निघून जाण्याची इच्छा करावी, त्याप्रमाणें त्यानें या नगरींतून निघून जाण्याची इच्छा केली ॥ १४ ॥ ज्याचें सामर्थ्य गंधर्वांनीं हरण केलें होतें व ज्याचे अवयवहि शिथिल झाले होते, अशा तो नाग नगरींतून निघून जाऊं लागला असतां शत्रुरूपी यवनांनीं त्याला तेथेंच कोंडून टाकिलें व त्यामुळें तो रडूं लागला ॥ १५ ॥ त्या वेळीं स्त्री वगैरे सर्वांशीं एकदम आपला वियोग होणार अशी वेळ आली हें पाहून गृहादिकांवर आसक्त असलेला तो गृहस्थाश्रमीं पुरंजन राजा, गृहादिक विषयांवरील 'मी आणि माझें' अशा बुद्धीमुळें अगदीं दीन झाला आणि आपल्या मुली, मुलगे, नातवंडें, सुना, जावई, चाकर, आणि स्वकीय म्हणून जें कांहीं घर, द्रव्यभांडार व संसाराच्या उपयोगीं पडणारें भांडीं वगैरे साहित्य होतें त्यांचें तो चिंतन करूं लागला ॥ १६ ॥१७ ॥ त्याला वाटलें 'मी परलोकास निघून गेलों असतां, अनाथ व पुत्रादि कुटुंबानें युक्त अशी ही माझी भार्या, बालकाचा शोध करीत कशी बरें राहील ? ॥ १८ ॥ ती माझ्या सेवेंत तत्पर असते, मी जेवलों नाहीं तर आपण जेवीत नाहीं, मी स्नान केलें नाहीं तर ती स्नान करीत नाहीं, मी रागावलों तर भयभीत होते, आणि मी निर्भर्त्सना केली असतां ती भयानें मौन धरून बसत्ये ॥ १९ ॥ एखादे वेळीं व्यवहारांत मला कांहीं विस्मृति पडली तर लागलीच ती मला बोध करित्ये, आणि मी देशांतरीं गेलों असतां विरहशोकानें कृश होऊन जात्ये. ही पुत्रवती असतांहि माझ्या पश्चात् हा गृहस्थाश्रम मार्ग तिला चालवितां येणार नाहीं ॥ २० ॥ मी परलोकीं गेलों असतां ज्यांना दुसरा आश्रय नाहीं असे माझे हे पुत्र व कन्या कशा बरें राहतील ? जशी समुद्रामध्यें नौका फुटून गेली असतां लोकांची धांदल होऊन जात्ये तशी तर त्यांची होणार नाहीं ना ? ' ॥ २१ ॥ याप्रमाणें मोहित झालेल्या कोत्या बुद्धीच्या योगानें शोक करणाऱ्या, परंतु वस्तुतः शोक करण्यास अयोग्य, अशा ह्या पुरंजनाला घेऊन जाण्यासाठीं भय नांवाचा तो यवनेश्वर तेथें आला ॥ २२ ॥ तेव्हां ते यवन, त्याला पशूप्रमाणें पाशांनीं बांधून आपल्या घरीं घेऊन चालले असतां, त्याला अनुसरणारे जे नागादिक सेवक होते तेहि अत्यंत व्याकुळ होऊन शोक करीत त्याच्याबरोबर निघून गेले. ॥ २३ ॥ जेव्हां यवनांनीं कोंडलेला तो नाग मोठ्या संकटानें नगरीचा त्याग करून बाहेर निघून गेला, तेव्हां लागलीच ती नगरी विस्कळित होऊन आपल्या मूळच्या स्वरूपाला जाऊन मिळाली ॥ २४ ॥ याप्रमाणें प्रबल यवनानें बलात्कारानें आकर्षण केलें असतां त्या वेळींहि अज्ञानानें व्याप्त झालेल्या त्या पुरंजन राजानें पूर्वीच्या आपल्या हितकर्त्या मित्राचें स्मरण केलें नाहीं. जर केलें असतें तर त्यानें त्याच वेळीं त्याला यवनापासून सोडविलें असतें ॥ २५ ॥ नंतर ह्या निर्दय राजानें पूर्वी जे यज्ञपशु मारिले होते, ते त्यानें दिलेल्या पीडेचें स्मरण झाल्यामुळें तप्त झाले, व नाना प्रकारचे भयंकर वेष धारण करून कुऱ्हाडींनीं त्याला तोडूं लागले ॥ २६ ॥ नंतर स्मृति नष्ट होऊन स्त्रीच्या संगानें दूषित झाल्यामुळें तो पुरंजन राजा, अपार अंधकारामध्यें निमग्न झाला आणि शेंकडों दुःखांचा अनुभव घेत त्यांतच पडला ॥ २७ ॥ पुढें तेथून तो सुटला तरीहि तो आपल्या स्त्रीचेंच मनानें चिंतन करीत असल्यामुळें विदर्भनामक

एका श्रेष्ठ राजाच्या घरीं त्याला उत्तम स्त्रीचा जन्म मिळाला ॥ २८ ॥ कालान्तरानें वैदर्भी उपवर झाली असतां तिच्या स्वयंवरासाठीं पित्यानें असा पण लाविला कीं, 'जो कोणी क्षत्रिय बलवान् असेल यानें आपला पराक्रम दाखवून हिला वरावें !' त्याप्रमाणें शत्रूंचीं नगरें जिंकून आपल्या स्वाधीन करून घेणाऱ्या मलयध्वजनामक पांड्य राजानें युद्धामध्यें क्षत्रियांना जिंकून तिला वरिलें ॥ २९ ॥ मग त्या मलयध्वजाला त्या विदर्भ कन्येपासून सुस्वरूप अशी कृष्णेक्षणानामक अशी एक कन्या व तिच्यापेक्षां कनिष्ठ असे सात पुत्र झाले आणि ते पुढें सात द्रविड देशांचे राजे झाले ॥ ३० ॥ हे राजा, त्या एकएका पुत्राला दहादहा कोटी पुत्र झाले. ज्यांचे वंशज पुढें मन्वंतरापर्यंत व त्याच्या पुढेंहि कांहीं काळपर्यंत पृथ्वीचें पालन करतील ॥ ३१ ॥ असो. पूर्वी सांगितलेल्या मलयध्वजाच्या शमदमादिक व्रतें धारण करणाऱ्या कृष्णेक्षणा-नामक कन्येशीं अगस्त्यऋषीनें विवाह करून घेतला. तिच्यापासून त्याला दृढच्युतनामक मुनिपुत्र उत्पन्न झाला. त्या दृढच्युताचा पुत्र इध्मवाह होय ॥ ३२ ॥ इकडे तो मलयध्वज राजर्षि, पुत्रांना पृथिवीचे विभाग करून देऊन व कृष्णाचें आराधन करण्याची इच्छा मनांत धरून कुलपर्वतावर गेला ॥ ३३ ॥ त्या वेळीं जशी चंद्राची प्रभा मागोमाग निघून जात्ये, त्याप्रमाणें दुसऱ्याला मोह उत्पन्न करणाऱ्या कटाक्षांनीं युक्त अशी ती विदर्भ राजकन्या आपल्या घरचा, विषयभोगाचा व पुत्रांचा त्याग करून, आपला पति जो पांड्य राजा मलयध्वज, त्याच्या मागोमाग अरण्यांत निघून गेली ॥ ३४ ॥ त्या स्थलीं चंद्रवसा, ताम्रपर्णी आणि वटोदका ह्या नांवांच्या नद्या होत्या. त्यांच्या पवित्र उदकानें मलयध्वज-राजानें आपल्या अंतरींच्या व बाहेरच्या मळांचें क्षालन केलें ॥ ३५ ॥ तेथें कंद, आठ्या, मुळें, फळें, फुलें, पानें, गवत व उदक यांच्या योगानेंच देहाचा निर्वाह करून हळूहळू शरिराला शोषण करणारें तप तो करूं लागला ॥ ३६ ॥ सर्व ठिकाणीं समदृष्टि ठेवणाऱ्या त्या मलयध्वजानें, शीत-उष्ण, वायु—वृष्टि, क्षुधा-तृषा, प्रिय—अप्रिय, सुख—दुःख हीं द्वंद्वें चित्ताला अस्वस्थ न करितील अशा रीतीनें स्वाधीन करून घेतलीं ॥ ३७ ॥ तपश्चर्या, उपासना, अहिंसादिक यम व जपादिक नियम, यांच्या योगानें त्याच्या कामादिक वासना दग्ध झाल्या व त्यानें इंद्रियें, प्राण व चित्त यांचाहि जय केल्यामुळें त्याला ब्रह्म आणि जीवात्मा यांच्या ऐक्याची जाणीव उत्पन्न झाली ॥ ३८ ॥ याप्रमाणें भावना करीत देवांची शंभर वर्षेंपर्यंत झाडांच्या खोडाप्रमाणें तो एका ठिकाणीं निश्चल राहिला. भगवान् वासुदेवावर प्रेम ठेवल्यामुळें त्याला त्या वेळीं आत्मरूपाहून देह इत्यादि दुसरें कांहींच भासत नाहींसें झालें ॥ ३९ ॥ हे राजा, याप्रमाणें भगवद्भक्त असा तो मलयध्वजराजा, जसें प्राण्याला स्वप्नामध्यें 'माझें हें मस्तक तुटलें' अशी प्रतीती होत असतांहि त्या स्वप्नांतील शरीराहून आपण वेगळा आहों असें ज्ञान असतें, त्याप्रमाणें साक्षात् भगवान् श्रीहरिरूप गुरूनें अंतःकरणामध्यें प्रकाशित केलेल्या व सर्व बाजूंनीं स्फुरण पावणाऱ्या विशुद्ध ज्ञानदीपाच्या योगानें आपले ठिकाणीं अंतःकरणवृत्तींचा साक्षी अशा आत्म्याला 'मी देहादिक उपाधींहून निराळा व्यापक ब्रह्मरूप आहें' असें ज्ञान झाल्यामुळें संसारा-

पासून विराम पावला. म्हणजे परब्रह्माच्या ठिकाणीं आत्म्याला व आत्म्याच्या ठिकाणीं परब्रह्माला अभेदबुद्धीनें पाहतां पाहतां, त्या पाहण्याचें सुद्धां अनुसंधान सोडून तो देहादि बंधानापासून मुक्त झाला ॥ ४० ॥ ४१ ॥४२॥ असो. इकडे ती पतिव्रता विदर्भराजाची कन्या, विषयभोगांचा त्याग करून परम धर्मवेत्ता अशा आपल्या मलयध्वजनामक पतीची वनामध्यें प्रेमपूर्वक सेवा करीत असे ॥ ४३ ॥ ती वल्कलें नेसून व व्रताचरण करून कृश झाली होती व विंचरणें नसल्यामुळें तिच्या केसांची जटारूप एकच वेणी झाली होती. अशी ती वैदर्भी शांत झालेल्या अग्नीजवळ त्याची धूमरहित ज्वाळा जशी शोभते तशी शोभत होती ॥४४॥ हे राजा, तो मलयध्वजराजा देहत्याग करून गेला असतांहि, त्याचें आसन तसेंच स्थिर होतें; म्हणून जोंपर्यंत त्या वैदर्भीला आपला प्रियतम पति देहत्याग करून गेला ही गोष्ट समजली नाहीं, तोंपर्यंत ती त्याच्याजवळ बसून पूर्वीप्रमाणें त्याची शुश्रूषा करीत राहिली ॥ ४५ ॥ पण एकदां ती पतीच्या चरणांची पूजा करावयास गेली असतां, जेव्हां तिला त्यांत उबारा लागेनासा झाला, तेव्हां ती जशी कळपांतून चुकलेली हरिणी वनामध्यें व्याकुल होते तशी व्याकूल झाली ॥ ४६ ॥ आणि पतीच्या विरहानें दीन होऊन शोकानें विव्हळ झाली असतां ती वैदर्भी त्या अरण्यामध्यें दुःखाश्रूंच्या योगानें आपल्या स्तनांवर अभिषेक करीत करीत मोठ्यानें रडूं लागली ॥ ४७ ॥ ती म्हणाली, ' हे राजर्षे, ऊठ ऊठ ! चोरापासून व अधार्मिक राजांपासून भिऊन गेलेल्या ह्या समुद्रवलयांकित पृथिवीचें रक्षण कर ! ' ॥ ४८ ॥ हे प्राचीनबर्हिराजा, मागोमाग अरण्यात गेलेली ती कोमलांगी स्त्री याप्रमाणें विलाप करीत करीत पतीच्या पायांवर मस्तक ठेवून नेत्रांतून अश्रु ढाळूं लागली ॥ ४९ ॥ शेवटीं रडत रडत तिनें काष्ठांची चिता रचून तिच्यावर पतीचें मृत शरीर ठेविलें, त्या चितेला अग्नि लाविला, आणि मग स्वतः सहगमन करण्याचा तिनें निश्चय केला ॥ ५० ॥ हे समर्थ राजा, इतक्यांत त्या ठिकाणीं फार प्राचीन काळचा मित्र असलेला कोणीएक आत्मज्ञानसंपन्न ब्राह्मण तेथें येऊन मनोवेधक व प्रियकारक अशा शब्दानें रडणाऱ्या त्या वैदर्भीचें सांत्वन करून तिला विचारूं लागला ॥ ५१ ॥

तो म्हणाला, तूं कोण व कोणाची स्त्री आहेस ? तूं ज्याच्याकरितां शोक करित्तेस तो हा येथें निजलेला पुरुष तुझा कोण ? अगे, ज्याच्याबरोबर तूं पूर्वी संचार करीत होतीस, त्या मज मित्राला तूं ओळखितेस काय ? ॥५२॥ मित्रा ! आपला अविज्ञात नांवाचा एक स्नेही होता असें तरी तुला स्मरतें काय ? अरे, तुला पृथ्वीवरील भोग भोगण्याची इच्छा झाली, म्हणून तूं त्या इच्छेला योग्य असें स्थळ शोधीत मज मित्राला सोडून गेलास व म्हणून हा अनर्थ तुला प्राप्त झाला आहे ॥ ५३ ॥ हे श्रेष्ठा, तूं आणि मी दोघेहि मानस-सरोवरांत राहणारे हंस आहोंत. पूर्वी आपण हजार वर्षें घरावांचूनच राहत होतों ॥५४॥ हे मित्रा, पण तूं माझा त्याग करून ग्राम्य सुखें भोगण्याच्या इच्छेनें पृथिवीवर गेलास आणि तेथें फिरतां फिरतां कोणी एका स्त्रीनें निर्माण केलेलें एक नगर पाहिलेंस ॥५५॥ त्या नगरासभोंवतीं पांच उपवनें होतीं. त्याला नऊ दरवाजे होते. एक रक्षक होता त्याभोंवतीं

तीन तट होते. त्यामध्यें इच्छित पदार्थ देणारे सहा बाणी होते. त्यांचीं पांच उत्पत्तिस्थानें होतीं व त्याची धनीण एक स्त्री होती ॥ ५६ ॥ हे राजा, यांचा असा अर्थ कीं,— शब्दादिक पांच विषय हीं उपवनें होत, नऊ इंद्रियच्छिद्रें हे दरवाजे होत. तेज, उदक आणि पृथिवी हे तीन कोट होत. पांच ज्ञानेंद्रियें व एक मन हे सहा बाणी होत ॥ ५७ ॥ कर्मे करण्याची शक्ति असलेलीं पांच कर्मेंद्रियें हे तेथील बाजार होत व पंचमहाभूतें हेंच त्यांचें व्ययरहित उत्पत्तिस्थान होय. बुद्धि ही ज्याची शक्ति आहे, असा तो पुरुष या देहरूप नगरीमध्यें प्रविष्ट झाला असतां त्या बुद्धीच्या स्वाधीन होऊन आपल्या नगरास ओळखीत नाहींसा होतो ॥ ५८ ॥ हे समर्थ मित्रा, तूं त्या नगरींत प्रवेश केलास तेव्हां तेथें एका स्त्रीनें तुला मोहित केलें असतां तिच्याबरोबर रममाण होऊन तूं आपल्या ब्रह्मस्वरूपास विसरलास व तिच्या संगतीनें अशी ही दुःखदायक दशा पावला आहेस ! ॥ ५९ ॥ बा मित्रा, तूं विदर्भाची कन्या नव्हेस, हा वीर मलयध्वज तुझा पति नव्हे आणि जिनें तुला पूर्वी नऊ द्वारांच्या नगरीमध्यें कोंडिलें होतें त्या पुरंजनीचाहि तूं पति नव्हेस ! ॥ ६० ॥ बा सख्या, पूर्वजन्मीं मी पुरुष होतों असें व आतां पतिव्रता स्त्री आहें असें जें तूं मानितोस, ही सर्व मी निर्माण केलेली मायाच आहे. तूं तीं दोन्ही नव्हस, आपण दोघेहि हंस आहों. आपली मूळची खरी स्थिति मी तुला सांगतों, तिचा तूं विचार कर ! ॥ ६१ ॥ हे मित्रा, मीच तूं आहेस, तूं माझ्याहून निराळा नाहींस आणि तूंच मी आहें हें ध्यानांत आणा कारण, विवेकी पुरुष, आपणां उभयतांमध्यें थोडासुद्धां भेद मानीत नाहींत ॥ ६२ ॥ जसा पुरुष आपल्या एकाच देहाला आरशामध्यें स्थिर, मोठा व निर्मळ असा आणि दुसऱ्याच्या नेत्रामध्यें चंचल, लहान व मलिन असा दोन प्रकारचा पाहतो, त्याप्रमाणेंच आम्हां उभयतांतील भेद भासत आहे, ( म्हणजे विद्या आणि अविद्या या दोन उपाधींच्या योगेंकरून आम्हांस सर्वज्ञत्वादिक व अज्ञत्वादिक धर्म भासत आहेत. ) वस्तुतः आपणामध्यें कोणताच भेद नाहीं ॥ ६३ ॥ याप्रमाणें हंसानें ( ईश्वरानें ) त्या मानससरोवरांतील हंसाला ( जीवाला ) बोध केला असतां तो स्वस्वरूपीं स्थित होऊन आपल्या मित्राच्या वियोगामुळें गेलेली त्याची स्मृति त्याला पुनः प्राप्त झाली ॥ ६४ ॥ हे प्राचीनबर्हिराजा, हें अध्यात्मज्ञान मीं तुला, राजाच्या कथेच्या मिषानें सांगितलें आहे. कारण षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा सृष्टिचालक प्रभूला, अप्रत्यक्षपणें सांगितलेला विषय प्रिय असतो ॥ ६५ ॥

**अठ्ठाविसावा अध्याय समाप्त**

# अध्याय २९ वा

प्राचीनबर्हिराजा नारदाला म्हणाला,—हे भगवन्, तुमच्या भाषणांचा गूढ अर्थ आम्हांला चांगलासा समजला नाहीं. आत्मतत्त्ववेत्त्या पुरुषांना त्याचा अर्थ नीट समजतो; पण कर्माच्या योगानें मोहित झालेल्या आम्हांला तो समजत नाहीं. यास्तव आम्हांला समजेल अशा रीतीनें तो तुम्ही उलगडून सांगा ॥ १ ॥

नारद म्हणाला,—राजा, पुरंजन म्हणजे जीव असें समजावें. कारण, तो आपणाला राहण्याकरितां शरीर उत्पन्न करितो. तें शरीर, एक, दोन, तीन किंवा चार पायांचें अथवा पुष्कळ पायांचें किंवा ज्याला मुळींच पाय नाहींत असें त्याच्या कर्मानुसार प्राप्त झालेलें असतें ॥ २ ॥ त्या पुरंजन राजाचा जो अविज्ञातनामक मित्र पूर्वी सांगितला तो ईश्वर होय. कारण, अंतर्यामीं इत्यादिक नांवांनीं, शुभाशुभ कर्माविषयीं जीवांना प्रेरणा करणें इत्यादिक कर्मांनीं अथवा सर्वज्ञत्वादिक गुणांनींहि त्याचें ज्ञान जीवांना होत नाहीं ॥ ३ ॥ ज्या वेळीं जीव, पूर्णपणें प्रकृतीच्या शब्दादि गुणांचें ग्रहण करण्याची इच्छा करितो, त्या वेळीं त्या पूर्वी सांगितलेल्या एकपादादिक शरिरामध्यें नऊ इंद्रियच्छिद्रें, दोन हात व दोन पाय ह्यांनीं युक्त असलेलें मनुष्यशरीरच 'सर्व विषय भोगण्याविषयीं उपयुक्त असल्यामुळें' उत्तम आहे असें त्याला वाटूं लागतें ॥ ४ ॥ जिच्या योगानें देह व इंद्रियें इत्यादिकांविषयीं अहंकार आणि ममत्व उत्पन्न होतें व जिचा आश्रय केल्यानेंच या देहामध्यें इंद्रियांच्या योगानें रूपरसादिक विषयांचा जीव उपभोग घेतो, त्या बुद्धीला स्त्री असें समजावें ॥ ५ ॥ तसेंच ज्याच्या योगानें श्रवणादिक पांच प्रकारचें ज्ञान आणि भाषणादिक पांच प्रकारचें कर्म घडतें, असें जे श्रोत्रादिक इंद्रियांचे समुदाय, ते तिचे मित्र होत व त्या दोन्ही प्रकारच्या इंद्रियांच्या ज्या वृत्ति त्या तिच्या मैत्रिणी होत. तसेंच प्राण, अपान इत्यादिक पांच प्रकारचा जो प्राण, तोच पांच फडांचा नगररक्षक नाग होय ॥ ६ ॥ त्या दोन्ही प्रकारच्या इंद्रियांचा नायक जें मन तेंच 'बृहद्बल' नांवाचा अकरावा योद्धा होय. तसेंच ज्याच्यामध्यें इंद्रियरूप नऊ द्वारांनीं युक्त असें शरीर उत्पन्न होतें, ते शब्द-स्पर्शादिक पांच विषय हेच 'पंचाल' देश होत ॥ ७ ॥ त्या नगराला एकेका ठिकाणीं निर्माण केलेलीं जीं दोन दोन द्वारें सांगितलीं तीं म्हणजे दोन डोळे, दोन नाकपुड्या व दोन कान हीं असून, मुख, शिश्न आणि गुद हे तीन दरवाजे निरनिराळ्या जागीं केलेले आहेत. त्या प्रत्येक जागीं राहात असलेल्या इंद्रियरूप मित्रांना बरोबर घेऊन त्या त्या द्वारानें जीव बाहेर विषयाकडे जातो ॥ ८ ॥ दोन डोळे, दोन नाकपुड्या आणि एक मुख हीं पांच द्वारें शरिराच्या पुढच्या बाजूला केलेलीं आहेत. उजवा कान हें दक्षिणद्वार आणि डावा कान हें उत्तरद्वार असें समजावें ॥ ९ ॥ तशींच पश्चिमेस जीं दोन द्वारें सांगितलीं, तीं या शरिराच्या अधोभागीं असलेलीं गुद आणि शिश्न हीं होत. 'खद्योता'

आणि 'आविर्मुखी' अशीं जीं एका ठिकाणीं निर्माण केलेलीं दोन द्वारें सांगितलीं तीं या शरिरांतील डोळे समजावे. 'विभ्राजित' नामक जो देश सांगितला, तें रूप नांवाचा (विषय) होय. द्युमान् नांवाचा जो मित्र सांगितला तो चक्षुरिंद्रिय होय. जीव हा चक्षुरिंद्रियरूप मित्रासह नेत्रद्वारा रूपविषयाला जातो ॥ १० ॥ तशींच 'नलिनी' व 'नालिनी' अशीं जीं दोन द्वारें एकत्र सांगितलीं, तीं नासिकाच्छिद्रें होत. जो 'सौरभ' देश म्हणून सांगितला तो गंध नांवाचा (विषय) होय. 'अवधूत' म्हणून जो मित्र सांगितला, तें घ्राणेंद्रिय होय. 'मुख्या' म्हणून जें द्वार सांगितलें तें मुख होय. 'विपण' नामक जो मित्र सांगितला तें वागेंद्रिय होय. 'रसज्ञ' म्हणून जो मित्र सांगितला तें रसनेंद्रिय होय ॥ ११ ॥ 'आपण' नामक जो देश सांगितला, तो म्हणजे सर्व प्रकारचा भाषणव्यवहार. 'बहूदन' नामक देश म्हणजे नाना प्रकारचें अन्न असून 'पितृहू' नांवाचें दक्षिण द्वार म्हणजे उजवा कान व 'देवहू' नामक उत्तर द्वार म्हणजे डावा कान होय ॥ १२ ॥ 'दक्षिण पंचाल' देश म्हणजे कर्मकांडात्मक प्रवृत्तशास्त्र असून 'उत्तर पंचाल' म्हणजे कर्मकांडात्मक निवृत्तशास्त्र होय. 'श्रुतधर' नांवाचा मित्र सांगितला तो श्रोत्रेंद्रिय असून त्या इंद्रियानें प्रवृत्तशास्त्राचें श्रवण करून व त्यांत सांगितलेल्या उपासनेचें अनुष्ठान करून जीव पितृयाननामक मार्गानें पितृलोकास जातो व त्याच इंद्रियानें निवृत्तशास्त्राचें श्रवण करून व त्यांत सांगितलेल्या उपासनेचें अनुष्ठान करून तो देवयाननामक मार्गानें देवलोकास जातो ॥ १३ ॥ 'आसुरी' नामक जें पश्चिम द्वार सांगितलें, तें शिश्न होय. तसेंच 'ग्रामक' नामक जो देश सांगितला तो येथें विषयी जनांची रतिक्रीडा होय. 'दुर्मद' नांवचा मित्र म्हणजे उपस्थेंद्रिय असून निर्ऋति म्हणजे गुदद्वार होय ॥ १४ ॥ 'वैशस' म्हणून जें स्थान सांगितलें तें नरकस्थान असून 'लुब्धक' हें पायुनामक इंद्रिय समजावें. दोघे आंधळे म्हणून जे सांगितले, त्यांचा अर्थ आतां सांगतों, ऐक. ते म्हणजे दोन हात व दोन पाय होत. त्यांनीं युक्त असलेला हा जीव कर्में करितो व गमन करितो ॥ १५ ॥ 'अंतःपुर' म्हणून जें सांगितलें तें हृदय असून 'विषूची' हें मन होय. हा जीव, त्या मनानें युक्त होऊन तम, सत्त्व आणि रज या गुणांच्या योगानें मोह, प्रसाद आणि हर्ष या विकारांचा अनुभव घेतो ॥ १६ ॥ जशी जशी बुद्धि, स्वप्नामध्यें स्वतः विकार पावत्ये किंवा जागृदावस्थेमध्यें इंद्रियांमध्यें विकार उत्पन्न करित्ये, त्या त्याप्रमाणें तिच्या गुणांनीं लिप्त झालेला आत्मा, वस्तुतः केवळ तिचे व्यापार पाहणारा असूनहि बलात्कारानें ती बुद्धि त्याला पाहणें, स्पर्श करणें, इत्यादिक आपल्या वृत्तीचें अनुकरण करावयास लाविते ॥ १७ ॥ हे राजा, देह हा रथ म्हणून सांगितला आहे. इंद्रियें हे त्याचे घोडे असून वर्षें हेंच त्याचीं गति होय. स्वतः याला कोणतीहि गति नाहीं. पुण्य आणि पाप हीं दोन त्याचीं चाकें असून तीन गुण हे त्याचे ध्वज व पांच प्राण हे त्याच्या दोऱ्या होत ॥ १८ ॥ मन ही त्याला आवरून धरण्याची लगामाची दोरी होय. बुद्धि हा त्यावर सारथि, हृदय हें त्यावरील बैठक, सुखदुःखादिक द्वंद्वें म्हणजे त्याचें जोखड बांधण्याची जागा, पांच इंद्रियांचे विषय हींच त्यांतील शस्त्रास्त्रें,

त्वचा आदिकरून सात धातु हीं त्याचीं आच्छादनें होत ॥ १९ ॥ कर्मेंद्रियें हीं त्यांची बाह्यगति असून त्या देहरूपी रथावर बसून जीव विषयरूप मृगजळाच्या मागें लागून नित्य धांवतो. अकरा इंद्रियें ही त्याची सेना असून गृहव्यवहारांतील पांच पातकें हे त्याचे विनोदी मित्र होत ॥ २० ॥ 'चंडवेग' म्हणून जो सांगितला तो संवत्सरात्मक काळ असून त्याच्या योगानें आयुष्याच्या वेळाची गणना होत्ये. त्याच्या हाताखालचे 'गंधर्व' म्हणजे दिवस आणि 'गंधर्वी' म्हणजे रात्रि समजाव्या. ते वर्षाचे तीनशें साठ दिवस अनुक्रमानें फिरून प्राण्याचें आयुष्य हरण करितात ॥ २१ ॥ 'कालकन्या' म्हणून सांगितली ती जरा होय. कोणताही प्राणी तिचा अंगीकार आनंदानें करीत नाहीं. 'यवनेश्वर' म्हणून जो सांगितला तो सर्व रोगांचा राजा जो मृत्यु तो होय. लोकांचा नाश करण्याकरितां त्यानें त्या जरेचा बहीण म्हणून स्वीकार केला ॥ २२ ॥ त्या मृत्यूचे यवन म्हणून जे आज्ञाधारक सैनिक सांगितले ते मानसिक व्यथा व शारीरिक रोग होत. 'प्रज्वार म्हणजे तो प्राण्यांना लवकर मृत्यु येईल अशी पीडा देणारा शीत व उष्ण असा दोन प्रकारचा ज्वर होय ॥ २३ ॥ हे प्राचीनबर्हि राजा, याप्रमाणें जीवात्मा वस्तुतः निर्गुण असतांहि अज्ञानानें व्याप्त होऊन, क्षुधा व तृषा इत्यादिक प्राणधर्मांचा, अंधत्वादिक इंद्रियधर्मांचा व कामादिक मनोधर्मांचा स्वतःवर अरोप करून देहादिकांविषयीं 'मी आणि माझें' असा अभिमान धारण करितो आणि अल्प तरी विषयसुख आपणांस प्राप्त व्हावें, या इच्छेनें अनेक प्रकारचीं कर्में करीत नाना प्रकारच्या आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक दुःखांच्या योगानें क्लेश पावून शंभर वर्षेंपर्यंत या देहांत राहतो ॥ २४ ॥ ॥ २५ ॥ हे राजा, हा पुरुष, वस्तुतः स्वयंप्रकाश असतांहि जेव्हां आपल्या स्वरूपाला आणि श्रेष्ठ गुरु जो भगवान् परमात्मा त्यालाहि न जाणतां प्रकृतीच्या गुणकार्यरूप विषयांवर आसक्त होतो, तेव्हां देहेंद्रियादिकांचा अभिमान धरिल्यामुळें तो परतंत्र होऊन सात्त्विक, तामस किंवा राजस अशीं तीन प्रकारचीं कर्में करितो, आणि जसें कर्म असेल त्याप्रमाणें तो देवमनुष्यादि योनींमध्यें जन्मास जातो ॥ २६ ॥ २७ ॥ म्हणजे तो प्राणी केव्हां तरी सात्त्विक कर्माच्या योगेंकरून पुष्कळ प्रकाशानें युक्त अशा देवादिलोकांचे ठिकाणीं जन्म पावतो. कधीं कधीं राजस कर्माच्या योगेंकरून ज्यांपासून परिणामीं दुःखच मिळतें व ज्यामध्यें कर्माच्या योगानें आयास घडतात, अशा मनुष्यलोकांत तो जन्म पावतो आणि एखाद वेळीं अज्ञान व शोक यांनीं भरलेल्या पश्वादि योनींमध्यें जन्म पावतो ॥ २८ ॥ ज्याची ज्ञानशक्ति अज्ञानानें नष्ट झाली आहे असा हा जीव, कधीं पुरुष, कधीं स्त्री, कधीं नपुंसक, कधीं देव, कधीं मनुष्य अथवा पशुपक्ष्यादि यांत उत्पन्न होतो. एकंदरींत त्यानें जीं कर्में व गुण संपादन केले असतील त्याप्रमाणें त्याला देवमनुष्यादिकांचा जन्म मिळतो ॥ २९ ॥ जसा भुकेनें व्याकुळ झालेला दीन कुत्रा, घरोघर फिरत असतां, त्याचें दैव असेल त्याप्रमाणें त्याला कोठें काठीचा मार मिळतो, तर कोठें अन्नहि मिळतें, अंतःकरण विषयवासनांनीं भरून गेलें असतां जीव, विधिनिषेधरूप मार्गानें देवलोक, नरकलोक अथवा मनुष्यलोक यांत भ्रमण करीत दैवीं असेल त्याप्रमाणें सुख

किंवा दुःख यांचा अनुभव घेतो ॥ ३० ॥ ३१ ॥ एकेका दुःखाचा प्रतिकार केला असतां सुख-प्राप्ति होईल असेंहि नाहीं. कारण आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक अशा दुःखा-पैकीं एखाद्याचा तरी जिवाशीं संयोग नाहीं असें कधींच घडत नाहीं ॥ ३२ ॥ जसा डोक्यावरून मोठें ओझें नेणारा माणूस डोक्याला पीडा होऊं लागली म्हणजे तें ओझें जसें फारतर खांद्यावर घेतो त्याप्रमाणेंच सुखाच्या आशेनें दुःखाच्या निवृत्तीकरितां जे जे उपाय करावे त्याचा प्रतिकार होतो, ते सर्वहि दुःखकारकच असतात. ॥ ३३ ॥ हे निष्पाप राजा, जसा स्वप्नामध्यें प्राप्त झालेल्या दुःखाच्या निवृत्तीचा स्वप्नामध्येंच योजिलेला उपाय जागृदावस्थे-वांचून खरा परिणामकारक होत नाहीं, त्याप्रमाणें संसाराला कारणभूत जें भक्तिज्ञानरहित कर्म तें दुःखांना कारणभूत असलेल्या पापकर्माचें निवर्तक होत नाहीं. कारण, दुःखाला कारणभूत जें पापकर्म व त्याचें निवर्तक जें पुण्यकर्म तीं दोन्हीही अज्ञानापासूनच उद्भवलेलीं असल्यामुळें ज्ञानाशिवाय त्यांची निवृत्ती होत नाहीं ॥ ३४ ॥ उपाधिरूप अशा मनासह संचार करणाऱ्या जीवाला स्वप्नामध्यें दृष्टीस पडलेल्या, परंतु वस्तुतः मुळींच नसणाऱ्या व्याघ्र–सर्प–चोरादिकांपासून प्राप्त झालेलें भय, तो जागा झाल्याखेरीज दुसऱ्या कोणत्याहि उपायानें जसें निवृत्त होत नाहीं, तसें जागृदावस्थेमध्येंहि हा प्रपंचरूप अर्थ आत्म्याच्या दृष्टीनें वस्तुतः मुळींच नसतांहि, जोंपर्यंत ज्ञानाच्या योगानें या जीवाचें अज्ञान निवृत्त होत नाहीं, तोंपर्यंत दुसऱ्या कोणत्याहि उपायानें याचा जन्ममरणरूप संसार निवृत्त होत नाहीं ॥ ३५ ॥ म्हणून सर्व पुरुषार्थरूपी अशा या जीवात्म्याला, ज्या अज्ञानामुळें जन्ममरणादि दुःखपरंपरारूप संसार प्राप्त होतो, त्या अज्ञानाचा नाश ज्ञानप्रकाशक गुरु जो भगवान् त्याच्या ठिकाणीं केलेल्या उत्तम भक्तीच्या योगानेंच होतो ॥ ३६ ॥ कारण भगवान् वासुदेव, त्या ठिकाणीं केलेला निष्काम भक्तियोग, उत्तम प्रकारचें वैराग्य आणि ज्ञान हीं प्रथम उत्पन्न करितो ॥ ३७ ॥ हे राजर्षे, भगवत्कथेचा आश्रय करून राहणारा तो भक्तियोग, निरंतर श्रद्धापूर्वक भगवत्कथांचें श्रवण करणाऱ्या व अध्ययन करणाऱ्या पुरुषाला लवकरच प्राप्त होतो ॥ ३८ ॥ हे राजन्, जेथें सदाचारनिष्ठ, शुद्धांतःकरणानें युक्त आणि भगवंताच्या गुणांचें वारंवार होणारें कीर्तन व श्रवण यांमध्यें ज्यांचें चित्त गढून गेलें आहे असे भगवद्भक्त राहतात, तेथें भगवद्भक्तांच्या समुदायांनीं वर्णन केलेलें भगवान् मधु-सूदनाचें चरित्ररूप अमृतच भरलें आहे अशा नद्या चोहोंकडून वाहत असतात. जे पुरुष आधाशीपणानें एकाग्र अशा श्रोत्रेंद्रियांनीं त्यांचें श्रवण करितात, त्यांना क्षुधा, तृषा, भय, शोक आणि मोह हे कधींहि बाधा उत्पन्न करीत नाहींत ॥ ३९ ॥ ॥ ४० ॥ यास्तव अनेक जन्मपरंपरेमुळें स्वाभाविकच प्राप्त झालेल्या या क्षुधा, तृषा, काम व क्रोध इत्यादिक उपद्रवांनीं निरंतर पीडित झालेल्या या जीवांना भगवद्भक्तांच्या संगतीवांचून खरोखरच हरीच्या कथामृतसमुद्राविषयीं प्रीति उत्पन्न होत नाहीं ॥ ४१ ॥ प्रजापतींचा अधिपति ब्रह्मदेव, साक्षात् षड्गुणैश्वर्यसंपन्न शंकर, मनु, दक्षादिक प्रजापति, सनकादिकांसारखे नैष्ठिक ब्रह्मचारी, तसेंच मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु, भृगु, वसिष्ठ व मी नारद हे सगळे वेदवेत्ते असून तप, विद्या आणि

समाधि यांच्या योगानें भगवंताच्या दर्शनाविषयीं प्रयत्न करीत असतांहि अद्यापि सर्वसाक्षी अशा परमेश्वराचें दर्शन आम्हांला होत नाहीं. तसेंच अतिविस्तृत आणि अपार अशा वेदांचें आलोडन करून वेदमंत्रांनीं प्रतिपादन केलेल्या इंद्रादि देवतांच्या स्वरूपानें भिन्न भिन्न भासणाऱ्या परमेश्वराची सेवा करणाऱ्या अशा पुरुषांनाहि त्याचें खरें स्वरूप कळत नाहीं. ॥ ४२ ॥ ४३ ॥ ४४ ॥ ४५ ॥ अंतःकरणामध्यें चिंतन केलेला भगवानच जेव्हां पुरुषावर अनुग्रह करितो, तेव्हांच तो पुरुष, लोकव्यवहारामध्यें व वैदिक कर्मामध्यें आसक्त झालेल्या आपल्या बुद्धीचा त्याग करितो ॥ ४६ ॥ यास्तव हे प्राचीनबर्हि राजा, फलश्रुति श्रवण करितांना कानाला मात्र प्रिय लागणारीं, परंतु वस्तुतः परमात्म्याला स्पर्शसुद्धां न करणारीं, आणि अज्ञानाच्या योगेंकरून परमार्थरूप भासणारीं अशीं जीं कर्मे, त्याच्या ठिकाणीं, यांच्या योगानेंच मला मोक्ष प्राप्त होईल असें तूं मनामध्यें मुळींच आणूं नकोस ॥ ४७ ॥ स्वर्गादिसुख प्राप्त करून देणाऱ्या कर्माचेंच वेदांपासून ज्ञान होतें, असें जे म्हणतात, त्यांना वेदांचें रहस्य मुळींच समजलें नसून त्यांच्या बुद्धि मलिन झाल्या आहेत असें समजावें. कारण, ज्ञानप्रद भगवान् सर्व देवतारूपानें जेथे क्रीडा करीत असतो, त्या वेदाचा विषयभूत असलेल्या आत्मतत्त्वाचें ज्ञान त्यांना होत नाहीं ॥ ४८ ॥ हे राजा, पूर्वेकडे अग्रें केलेल्या दर्भांनीं सर्व भूमंडळाला आच्छादून अनेक पशूंच्या वधानें, मीच मोठा यज्ञ करणारा, असा अभिमान व गर्व तुला झाला आहे. यास्तव तूं फारच अज्ञानी आहेस. कर्माचें तत्त्व काय आहे, हें तुला मुळींच समजलें नाहीं. कारण ज्याच्या योगानें श्रीहरीकडे बुद्धि लागते तीच खरी विद्या होय ॥ ४९ ॥ हे राजा, हरि हा सर्व प्राणिमात्रांचा आत्मा, शुभाशुभ कर्माचा फलदाता व स्वतः स्वतंत्र असून सर्वांचें मूळकारण असा आहे. म्हणून ज्याच्या आश्रयानें सर्वतोपरी कल्याण होतें, असें जें त्याच्या चरणाचें स्थान, तेंच या संसारांत मनुष्यांनीं आश्रय करण्यास योग्य आहे ॥ ५० ॥ ज्याच्यापासून अणुमात्रहि भय नाहीं, तोच अतिप्रिय असा आत्मा होय, असें जो जाणतो, तोच ज्ञानी व तोच गुरु होय. फार काय, पण तो साक्षात् श्रीहरिच समजावा ॥ ५१ ॥ हे राजा, याप्रमाणें तुझ्या प्रश्नाचें उत्तर मीं दिलें आहे. आतां आपल्या उद्धारासाठीं तूं काय केलें पाहिजेस, याबद्दल मोठमोठ्यांनीं निश्चित केलेला आणि गुप्त असा एक उपाय मी तुला सांगतों, तो तूं श्रवण कर ॥ ५२ ॥ हे राजा, थोडें थोडें खाणारा एक हरिण, फुलांच्या बागेमध्यें समागमांत गुंग झालेला असून त्याचे कान भ्रमरसमुदायांच्या गायनावर अगदीं लुब्ध होऊन गेले आहेत, व त्यामुळें दुसऱ्याचे जीव घेऊन आपल्या प्राणांची तृप्ति करणारे लांडगे पुढें चालले असतांहि त्यांना न जुमानतां तो आणखी पुढें चालला आहे. इतक्यांत मागून पारध्याचे बाण लागून त्याचें शरीर छिन्नभिन्न होत चाललें आहे. अशा हरिणाचा तूं शोध कर ॥ ५३ ॥ हे राजा, पुष्पाप्रमाणें फुलणें किंवा कोमजणें असे ज्याचे धर्म आहेत, अशा स्त्रियांनीं युक्त अशा गृहस्थाश्रमांत राहून फुलांतील अतिअल्प मध व गंध; याप्रमाणें अतितुच्छ व सकाम कर्माचें फलरूप अशा जिव्हा व शिश्न, इत्यादिसंबंधीं क्षुद्र विषयसुखाचा शोध करीत असणारा, स्त्रियांबरोबर

समागम करून त्यांच्यावर आसक्त झालेला, भ्रमरसमूहाच्या सामगायनाप्रमाणें अतिमनोहर अशा स्त्रीपुत्रादिकांच्या भाषणांवर पराकाष्ठेचा लुब्ध झालेला, पुढून चालून येणाऱ्या लांडग्यांच्या कळपाप्रमाणें आपलें आयुष्य हरण करणाऱ्या दिवस, रात्र, घटिका, पळें इत्यादिक कालविभागांना न जुमानतां गृहामध्यें रमत असलेला आणि कोणाला न समजतां मागोमाग येणारा मृत्युरूप पारधी ज्याच्या हृदयामध्यें दुरून वेध करण्याची इच्छा करीत आहे असा तो भिन्न हृदय झालेला मृग स्वतःच तूं आहेस हें समजून घेणें उचित होय ॥ ५४ ॥ हे राजा, त्या मृगासारखीं स्वतःचीं कृत्यें तूं ध्यानांत आण आणि हृदयामध्येंच चित्ताला स्थापन करून नदीच्या प्रवाहाप्रमाणें विषयाकडे धावत असलेल्या सर्व इंद्रियांच्या वृत्तींना त्या चित्तामध्यें तूं आवरून धर. तसेंच जेथें विषयलोलुप लोकांच्याच अनेक गोष्टी चालतात, अशा गृहस्थाश्रमाचा त्याग कर आणि शुद्धचित्त झालेल्या जीवांचा आश्रय अशा भगवंताला प्रसन्न करून घे आणि अशा रीतीनें क्रमाक्रमानें संसारदुःखापासून तूं निवृत्त हो ! ॥ ५५ ॥

राजा म्हणाला,—हे ब्रह्मज्ञानसंपन्न नारदा, आपण जें भाषण केलें, तें मीं श्रवण केलें आणि त्याचा विचारहि केला. हें आपण सांगितलेलें आत्मतत्त्व, मला कर्माचा उपदेश करणाऱ्या गुरूंना माहीत नव्हतें. जर त्यांना तें माहीत असतें तर त्यांनीं मला सांगितलें असतें ॥ ५६ ॥ हे नारदा, त्या उपाध्यायांनीं वेदवाक्यांचा विरोध दाखवून वेद कर्ममार्गपर आहे किंवा निवृत्तिपर आहे, अशाविषयीं मला मोठा जो संशय उत्पन्न केला होता त्याचें आपण निराकरण केलें; परंतु ज्या ठिकाणीं इंद्रियांची प्रवृत्ति नसल्यामुळें मोठमोठे ऋषिहि मोह पावतात, अशा एका गोष्टीविषयीं मला संशय आहे ॥ ५७ ॥ तो असा कीं, जीवात्मा ज्या देहाच्या योगानें या लोकामध्यें कर्में करितो, त्या देहाला या लोकांतच टाकून देऊन स्वर्गनरकादिक परलोकांमध्यें कर्मवशात् प्राप्त झालेल्या दुसऱ्या देहानें या लोकीं केलेल्या कर्मांचीं सुखदुःखादि फळें तो भोगितो, असा वेदवेत्त्यांचा सिद्धांत आहे, तो कसा ? तसेंच सर्व लोक वेदांनीं सांगितलेलें जें यज्ञादिक कर्म करितात तें उत्तरक्षणींच नाहींसें होतें व परलोकीं प्रकाशच पावत नाहीं, मग नष्ट झालेल्या त्या कर्माचा परलोकीं भोग कसा घडतो ? ॥ ५८ ॥ ५९ ॥

नारद म्हणाला,—हे राजा, पुरुष ज्या मनःप्रधान लिंगदेहाच्या योगानें या लोकीं कर्में करितो, त्यास चिकटून राहिलेल्या लिंगदेहाच्या योगानें परलोकीं तो स्वतःच त्या कर्मांच्या फळांचा उपभोग घेतो. स्थूल देहाचा नाश झाला, तरी लिंगदेहाचा नाश होत नसल्यामुळें इहलोकीं केलेल्या कर्माचें फळ लिंगदेहद्वारा भोगतां येतें ॥ ६० ॥ जसा पुरुष, निजलेल्या ह्या जिवंत देहाचा अभिमान सोडून स्वप्नामध्यें त्याच्यासारख्याच दुसऱ्या देहानें अथवा इतर पश्वादि देहानें, मनामध्यें संस्काररूपानें स्फुरित झालेल्या कर्मफळांचा उपभोग घेतो, त्याप्रमाणेंच परलोकामध्येंहि तो लिंगदेहानें कर्मफळांचा उपभोग घेतो

॥ ६१ ॥ हे राजा, हे पुत्रादिक माझे आहेत व हा मी आहें, असें भाषण करणारा पुरुष, मनानें ज्या ज्या देहाचा आत्मा म्हणून स्वीकार करितो, त्या त्या देहापासून सिद्ध झालेलें पुण्यपापरूप कर्महि तो ग्रहण करितो. म्हणजे 'मीं हें कर्म आपल्या सुखाकरितांच केलें' असें मानितो व त्याच्या योगानें त्याला पुनः जन्म प्राप्त होतो ॥ ६२ ॥ आतां 'नष्ट झालेल्या कर्मांचा परलोकीं उपभोग घडत नाहीं' असा जो तुझा दुसरा प्रश्न आहे, त्याचें उत्तर असें आहे कीं, ज्ञानेंद्रियांच्या व कर्मेंद्रियांच्या प्रवृत्तीनें त्यांच्या प्रेरक असलेल्या चित्ताचें जसें अनुमान करावें लागतें, त्याप्रमाणें अनेक प्रकारच्या चित्तवृत्तींच्या योगेंकरून पूर्वींच्या देहापासून झालेल्या पुण्यपापरूप कर्मांचेंहि अनुमान करणें प्राप्त होतें ॥ ६३ ॥ ह्या विद्यमान असलेल्या स्थूलदेहानें ज्याचा कधींच अनुभव घेतलेला नाहीं किंवा जें कधींच पाहिलेलें अथवा ऐकिलेलें नाहीं, असेंहि एखादें विलक्षण प्रकारचें स्वरूप, ज्या अर्थीं स्वप्नामध्यें किंवा मनोराज्यामध्यें मनांत स्फुरण पावतें, त्या अर्थीं, हे राजा, ह्या वासनाश्रयरूप जीवालाच तो तशा प्रकारचा अनुभव पूर्वदेहापासून झालेला आहे असें निश्चयानें समज. कारण, ज्या वस्तूचा पूर्वीं कधींच अनुभव घेतलेला नाहीं, ती वस्तु कधींच मनांत यावयाची नाहीं, असा सिद्धांत आहे ॥ ६४ ॥ ६५ ॥ राजा, तुझें कल्याण असो. मी सांगतों इकडे नीट लक्ष दे. मनुष्य, पूर्वीं कोणकोणत्या जन्मांस गेला होता, पुढें कोणकोणत्या जन्मांस जाणार आहे व कोणकोणत्या जन्मांस जाणार नाहीं, ह्या सर्व गोष्टी त्याचें मनच सांगत असतें. म्हणजे मनाचें औदार्य, कृपणता इत्यादिक धर्मांवरून हा पूर्वीं अमुक होता व पुढें अमुक योनींत जाईल हें सर्व कळून येतें ॥ ६६ ॥ राजा, देश, काल अथवा कर्म ह्यांच्या आश्रयानें असलेलें, कधीं न पाहिलेलें व कधीं न ऐकिलेलें असें कांहीं एखादे वेळीं मनामध्यें स्फुरण पावतें असें दिसतें, पण तें सुद्धां निद्रादिकांच्या दोषामुळेंच तसें भासतें असें अनुमान करावें लागतें ॥ ६७ ॥ कारण सगळ्या प्राण्यांचीं मनें सारखींच असल्यामुळें त्या मनामध्यें सर्व प्रकारचे इंद्रियांचे विषय क्रमाक्रमानें वर्गावर्गानें प्रवेश करतात व मग तेथून निघूनहि जातात ॥ ६८ ॥ हे राजा, जसा एरवीं न दिसणारा राहु ग्रहणाच्या वेळीं चंद्राजवळ दृष्टीस पडतो, त्याप्रमाणें सत्त्वगुणानें युक्त व भगवद्ध्यानपरायण झालेल्या योग्याच्या मनामध्यें, हें सर्व जग संयोग पावल्यासारखें होऊन प्रकाशमान होतें ॥ ६९ ॥ हे राजा, अनादिकाळापासून चालत असलेला, बुद्धि, मन, इंद्रियें व शब्दस्पर्शादिक विषय अशा प्रकारचा हा गुणकार्यरूप लिंगदेह जोंपर्यंत विद्यमान आहे, तोंपर्यंत, मी आणि माझें असा जीवाचा भ्रम नाहींसा होत नाहीं ॥ ७० ॥ सुषुप्ति, मूर्च्छा, दुःख, मृत्यु व प्रज्वार ह्या अवस्थांमध्यें सर्व इंद्रियें व्याकुळ झालेलीं असल्यामुळें 'हा मी' असें ज्ञान, सूक्ष्म रीतीनें असतांहि तें स्पष्टपणें प्रकाशित होत नाहीं ॥ ७१ ॥ तसेंच गर्भावस्था व बाल्यावस्था यांमध्येंहि इंद्रियें सूक्ष्मरूपांत असल्यामुळें, त्या वेळीं अहंकाराचें स्वरूप, अमावास्येला चंद्राचें स्वरूप जसें दिसून येत नाहीं, त्याप्रमाणें स्पष्टपणें दिसून येत नाहीं. तथापि 'मी पाहतों, मी ऐकितों' इत्यादि प्रकारचें अकरा इंद्रियांनीं स्पष्ट भासणारें तें

अहंकाराचें स्वरूप तरुण पुरुषाच्या ठिकाणीं दिसून येतें. त्यावरून सुषुप्त्यादि अवस्थांमध्यें सूक्ष्मरूपानें असलेल्या अहंकाराच्या निवृत्तीवांचून जीवाला खरी मुक्ति प्राप्त होत नाहीं ॥ ७२ ॥ जसा स्वप्नावस्थेमध्यें दृष्टोत्पत्तीस येणारा 'आपलें मस्तक तुटलें' इत्यादिक अनर्थाचा अनुभव, वस्तुतः खरा नसतांहि जागृत्अवस्थेवांचून निवृत्त होत नाहीं, त्याप्रमाणें रूपरसादिक विषयांचें ध्यान करणाऱ्या पुरुषाचा संसार वस्तुतः खरा नसतांहि आत्मज्ञानादि साधनावांचून निवृत्त होत नाहीं ॥ ७३ ॥ पंचमहाभूतात्मक असून सोळा प्रकारांनीं विस्तार पावलेला जो हा त्रिगुणात्मक लिंगदेह, तोच चैतन्यानें युक्त झाला म्हणजे त्याला जीव, असें म्हणतात ॥ ७४ ॥ ह्याच लिंगदेहानें युक्त झालेला जीव, देव, पशु, मनुष्य इत्यादि स्थूल देहांचा स्वीकार करितो आणि त्याग करितो व ह्यानें युक्त असलेलाच तो जीव सुख, दुःख, हर्ष, शोक व भय यांचा अनुभव घेतो ॥ ७५ ॥ गवतावरची कीड जशी पुढच्या पायांनीं दुसऱ्या गवताला घट्ट धरल्याखेरीज मागचे पाय सोडून देत नाहीं, त्याप्रमाणें मरणोन्मुख झालेला प्राणी, पूर्वदेहाला उत्पन्न करणाऱ्या कर्माच्या संबंधानें, दुसऱ्या देहाचा स्वीकार करीतोंपर्यंत पूर्वदेहाविषयींचा 'मी व माझें' हा अभिमान सोडीत नाहीं. तात्पर्य, हे राजा, मन हेंच सर्व प्राण्यांच्या जन्ममरणरूप संसाराचें खरें कारण आहे ॥ ७६ ॥ ७७ ॥ तें असें कीं, देहादिकांचे ठिकाणीं अभिमानरूप अज्ञान असलें म्हणजे आत्मानुसंधानरहित अशा प्राण्यांच्या हातून चांगलें किंवा वाईट कर्म घडतें. तें घडलें म्हणजे तदनुसार विषयोपभोग प्राप्त होतो. नंतर तो पुरुष इंद्रियांनीं उपभोग घेतलेल्या विषयांचें चिंतन करून पुनः पुनः त्या विषयांची प्राप्ति होण्यासाठीं कर्में करितो व त्यांच्या योगानें त्याला वारंवार संसारबंध प्राप्त होतो ॥ ७८ ॥ म्हणून त्याची निवृत्ति होण्याकरितां हें सर्व विश्व भगवन्मयच आहे असें समजून तूं एकाग्र अंतःकरणानें श्रीहरीचें सेवन कर. कारण, त्यापासूनच ह्या जगाचे उत्पत्ति-स्थिति-संहार होत असतात ॥ ७९ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें भगवद्भक्तांमध्यें श्रेष्ठ असा भगवान् नारद प्राचीनबर्हिराजाला जीवेश्वराचें तत्त्व निरूपण करून नंतर त्या राजाचा निरोप घेऊन तेथून सिद्धलोकास निघून गेला ॥ ८० ॥ नंतर तो प्राचीनबर्हिराजर्षिहि, प्रजोत्पादन व राज्यपालन हीं कार्यें पुत्रांवर सोंपवून आपण तपश्चर्या करण्याकरितां कपिलाश्रमास निघून गेला ॥ ८१ ॥ तेथें विषयांपासून इन्द्रियें अंतर्मुख करून एकाग्रचित्त झालेला तो राजा, भगवंताच्या चरणकमलाचें सेवन करीत त्याच्याच स्वरूपाला प्राप्त झाला ॥ ८२ ॥ हे निष्पाप विदुरा, देवर्षि नारदानें परोक्षरीतीनें वर्णन केलेल्या ह्या आख्यानाचें जो पुरुष पठण करितो किंवा श्रवण करितो, तो संसारास कारणभूत अशा लिंगशरीरापासून मुक्त होतो ॥ ८३ ॥

श्रीनारदाच्या मुखापासून निघालेलें, मनाची शुद्धि करणारें, सर्वोत्कृष्ट फल देणारें व मुक्तिदात्या भगवंताच्या संसारोद्धारकत्वेंकरून प्रसिद्ध असलेल्या माहात्म्यानें युक्त व जगताला पवित्र करणाऱ्या अशा ह्या आख्यानाचें वर्णन चाललें असतां जो पुरुष श्रवणाच्या

योगेंकरून तें आपल्या हृदयामध्यें धारण करितो, तोहि सर्वबंधांपासून मुक्त होऊन या संसारामध्यें भ्रमण पावत नाहींसा होतो ॥ ८४ ॥ हे विदुरा, परोक्षरीतीनें वर्णन केलेलें हें अध्यात्मविषयक कथानक, मीं गुरूपासून निःसंशयपणें श्रवण केलें होतें, तें तुला सांगितलें आहे. याच्या श्रवणानें बुद्धियुक्त पुरुषाचा गृहस्थाश्रमविषयक अहंकार व तसाच याला परलोकीं कर्मफलाचा उपभोग कसा प्राप्त होतो याबद्दलचा संशय नष्ट होतो ॥ ८५ ॥

**एकोणतिसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ३० वा

विदुर म्हणाला,—हे ब्रह्मनिष्ठ मैत्रेयऋषे, तुम्हीं पूर्वी प्राचीनबर्हिराजाचे पुत्र प्रचेते म्हणून जे मला सांगितलेत त्यांनीं रुद्रानें दिलेल्या योगादेशनामक स्तोत्राच्या योगानें श्रीहरीला संतुष्ट करून कोणती सिद्धि मिळविली बरें ? ॥ १ ॥ हे बृहस्पतिशिष्या मैत्रेया, त्या प्रचेत्यांना शंकराचें दर्शन झाल्यामुळें ते मोक्षदात्या भगवंताचे आवडते सहचारी होऊन मोक्षाला तर गेलेच; परंतु त्याच्या पूर्वी या लोकीं किंवा परलोकीं त्यांना काय फल प्राप्त झालें बरें ? ॥२॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, पित्याच्या आज्ञेप्रमाणें बागणाऱ्या त्या प्रचेत्यांनीं रुद्रगीताचा जप व तपश्चर्या यांच्या योगानें भगवंताला संतुष्ट केलें ॥ ३ ॥ तेव्हां दहा हजार वर्षांच्या शेवटीं पुराणपुरुष भगवान् शुद्धसत्त्वमय मूर्ति जणूं काय धारण करून, आपल्या कांतीनेंच त्यांचे क्लेश दूर करीत त्यांच्या पुढें प्रत्यक्ष प्रकट झाला ॥ ४ ॥ तो मेरुपर्वताच्या शिखरावर आरूढ झालेल्या मेघाप्रमाणें गरुडाच्या स्कंधावर बसला होता; तो पीतांबर नेसलेला असून कंठामध्यें त्यानें कौस्तुभमणि धारण केला होता व त्याच्या कांतीनें दाही दिशा प्रकाशमय झाल्या होत्या ॥ ५ ॥ त्याचे गाल व मुख हीं दैदीप्यमान व हिरव्या, पिंवळ्या वगैरे अनेक वर्णांच्या रत्नांनीं जडित अशा सुवर्णाच्या कुंडलादिक अलंकारांनीं शोभायमान झालीं होतीं व त्याच्या मस्तकावर तेजःपुंज किरीट होता. त्याला आठ भुजा असून, त्या प्रत्येकांत त्यानें एकेक आयुध धारण केलें होतें. पार्षद मुनि व मोठमोठे देव त्याची सेवा करीत असून गरुड आणि किन्नर त्याची कीर्ति गात होते. पुष्ट व दीर्घ अशा आठ बाहूंच्या मध्यभागीं वक्षःस्थलावर असणाऱ्या शोभेनें स्पर्धा करणारी वनमाला त्यानें गळ्यांत घातली होती, आणि त्याची दृष्टि दयेनें थबथबली होती असा तो भगवान् आदिपुरुष मेघासारखा शरण आलेल्या त्या प्राचीनबर्हि राजाच्या पुत्रांना गंभीर वाणीनें बोलूं लागला ॥ ६ ॥ ७ ॥ भगवान् म्हणाले,—अहो राजपुत्र हो, तुम्ही एकमेकांच्या प्रेमानें भगवदाराधनरूप एकाच धर्माचें आचरण करीत आहां या तुमच्या परस्पर सख्यामुळें मी संतुष्ट झालों आहें. तुमचें कल्याण असो ! तुम्हीं माझ्यापासून वर मागून घ्या ! ॥ ८ ॥ जो मनुष्य प्रत्यहीं संध्याकाळीं तुमचें स्मरण करील, त्याच्या मनांत आपल्या बंधूंविषयीं आपलेपणा आणि सर्व प्राणिमात्रांविषयीं प्रेम उत्पन्न होईल ॥ ९ ॥ आणि जे पुरुष एकाग्रचित्त होऊन सायंकाळीं व प्रातःकाळीं या रुद्रगीतानें माझी स्तुति करितील, त्यांना मी संतुष्ट होऊन इच्छित विषयभोग व उद्धाराविषयीं योग्य अशी बुद्धि देईन ॥ १० ॥ ज्या अर्थीं तुम्हीं आनंदित होऊन प्रजावृद्धि करण्याविषयीं पित्याच्या आज्ञेचा स्वीकार केला, त्या अर्थीं तुमची उत्तम कीर्ति लोकांत सर्वत्र पसरेल ॥ ११ ॥ हे राजपुत्र हो, सत्कीर्ति आदिकरून गुणांच्या योगानें कांहीं कमी नाहीं व लोकांमध्यें प्रख्यात

असा तुम्हांला एक पुत्र होईल व तो आपल्या संततीच्या योगानें हें त्रैलोक्य भरून टाकील ॥ १२ ॥ हे राजपुत्र हो, कंडूऋषि तप करीत असतां त्या तपाच्या नाशाकरितां इंद्रानें पाठविलेल्या प्रम्लोचानामक अप्सरेसह त्या ऋषीनें बहुत काळपर्यंत क्रीडा केली. नंतर ती अप्सरा स्वर्गी जाण्यास निघाली असतां त्या ऋषीपासून झालेल्या कन्येचा वृक्षांच्या झाडीमध्यें तिनें त्याग केला. तेव्हां तिनें टाकलेल्या त्या कमलनेत्री कन्येचा वृक्षांनींच स्वीकार केला ॥ १३ ॥ एके वेळीं ती कन्या क्षुधेनें पीडित होऊन रडूं लागली असतां सर्व वनस्पतींचा राजा जो सोम, त्याला दया येऊन त्यानें अमृत स्रवणारी आपली तर्जनी तिच्या मुखांत घातली. तात्पर्य, ती कन्या अप्सरेपासून झालेली, अमृतपान घडलेली व अति लावण्ययुक्त अशी आहे ॥ १४ ॥ अहो प्रचेते, माझा परमभक्त जो तुमचा पिता प्राचीनबर्हिराजा त्यानें पुत्रादिकांची उत्पत्ति करण्याविषयीं तुम्हांला आज्ञा केलेली आहे; यास्तव त्या सर्वलावण्ययुक्त कन्येचा तुम्ही लवकर स्वीकार करा ! ॥ १५ ॥ राजपुत्र हो, तुमचे सर्वांचे धर्म आणि स्वभाव एकसारखे आहेत म्हणून तुम्हां सर्वांची मिळून ती सुंदरी एकच पत्नी होईल. कारण, तिचेहि धर्म व स्वभाव तुम्हांशीं पूर्णपणें जुळत असून तिनें आपलें अंतःकरण तुम्हांला अर्पण केलें आहे ॥ १६ ॥ यास्तव तुम्ही माझ्या कृपेनें देवांचीं दहा लक्ष वर्षेपर्यंत अकुंठित असे भूमीवरील व स्वर्गातील भोगांचे उपभोग घ्या ! ॥ १७ ॥ माझ्याविषयींच्या एकनिष्ठ भक्तीमुळें तुमच्या अंतःकरणांतील कामादिक सर्व मळ जळून जातील व इहलोक व परलोकसंबंधीं नरकतुल्य विषयभोगांपासून विरक्त होऊन शेवटीं माझ्या स्थानाला याल ॥ १८ ॥ कारण ज्यांचा काळ माझ्या कथेचें श्रवण करण्यांत जात असतो व ज्यांचें कर्म माझ्या ठिकाणींच अर्पण होत असतें, ते पुरुष जरी गृहस्थाश्रमी असले, तथापि त्यांचे ते गृहस्थाश्रम त्यांच्या बंधाला कारण होत नाहींत ॥ १९ ॥ याचें कारण, तशा गृहस्थाश्रमी पुरुषांना साधूंचा समागम घडतो, त्यामुळें त्या साधूंनीं वर्णन केलेल्या कथेच्या श्रवणानें त्यांच्या हृदयामध्यें सर्वज्ञ ईश्वर असा जो तो मी, पदोपदीं नवीन जणूं काय असा प्रविष्ट होतों. ब्रह्म म्हणून जें म्हणतात तें मीच होय, दुसरें कांहीं नाहीं. म्हणून मजप्रत प्राप्त झालेल्या पुरुषांना मोह, शोक व हर्ष हीं मुळींच प्राप्त होत नाहींत ॥ २० ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें पुरुषार्थ देणारा भगवान् जनार्दन भाषण करीत असतां त्याच्या दर्शनानें त्या प्रचेत्यांच्या तमोगुणसंबंधीं व रजोगुणसंबंधीं मनाचें निरसन झालें आणि ते हात जोडून त्या परम हितकर्त्या भगवंताची सद्गदित वाणीनें स्तुति करूं लागले ॥ २१ ॥

प्रचेते म्हणाले,—हे देवा, तूं भक्तांचे क्लेश दूर करितोस, तुला नमस्कार असो. तुझे भक्तवात्सल्यादिक गुण व नांवें वेदांनीं सर्व पुरुषार्थांचें साधन म्हणून सांगितलीं आहेत. तुझा वेग, मन आणि वाणी यांच्या वेगापेक्षांहि पलीकडे आहे आणि तुझा मार्ग सर्व इंद्रियांच्या मार्गांना सुद्धां कळून येत नाहीं, अशा तुला माझा नमस्कार असो ॥२२॥

तुझें स्वरूप शुद्ध व शांत असून मन हें निमित्त असलें म्हणजे, ज्या तुझे ठिकाणीं वस्तुतः मिथ्याभूत असलेलें हें द्वैत स्फुरण पावतें, त्या तुज कारणें नमस्कार असो. जगाचें पालन प्रलय व उत्पत्ति यांविषयीं ज्या तूं मायेच्या सत्त्वादिक गुणांच्या योगेंकरून विष्णु, रुद्र व ब्रह्मदेव यांचीं स्वरूपें धारण केलीं, त्या तुला नमस्कार असो ॥ २३ ॥ तूं विशुद्ध सत्त्व-मूर्ति व भक्तदुःखनिवारक आहेस. तुझें ज्ञान संसाराचा नाश करणारें आहे. तूं सर्व यादवांचा पालक अ‍सून वसुदेवाचा पुत्र म्हणून प्रसिद्ध आहेस; त्या तुज कृष्णाला नमस्कार असो ! ॥ २४ ॥ ज्या तुझ्या नाभीपासून ब्रह्मांडात्मक कमळ उत्पन्न झालें, अशा तुला नमस्कार असो. ज्या तूं आपल्या कंठांत कमळांची माळा धारण केली आहेस, त्या तुला नमस्कार असो. ज्या तुझे नेत्र कमलासारखे कोमल आहेत, त्या तुला नमस्कार असो. ज्या तुझे चरण कमलासारखे आहेत, अशा हे देवा, तुला आम्ही नमस्कार करितों ॥ २५ ॥ तुझीं वस्त्रें, कमळाच्या केसराप्रमाणें पिंगट वर्णाचीं असून स्वच्छ आहेत, अशा तुला नमस्कार असो. तूं सर्व भूतांचें निवासस्थान व सर्वसाक्षी आहेस, त्या तुला आम्ही नमस्कार करितों ॥ २६ ॥ हे भगवन्, तूं अज्ञानादिक क्लेशांनीं व्याप्त झालेल्या आमच्या सर्व क्लेशांचा नाश करणारें हें रूप प्रगट केलें आहेस. ह्याहून दुसरी आम्हांवर कृपा ती करावयाची कोणती ? ॥ २७ ॥ हे अमंगलनाशका, योग्यसमयीं ' हे आमचे आहेत ' अशा कृपाबुद्धीनें दीनांचें स्मरण करणें एवढेंच वस्तुतः दीनवत्सल समर्थ पुरुषांचें कर्तव्यकर्म होय; पण तूं तर तें करून शिवाय आम्हांला दर्शनहि दिलें आहेस, तेव्हां तुझा आम्हांवर अत्यंत अनुग्रह आहे ॥ २८ ॥ कारण समर्थांनीं ज्यांचें स्मरण ठेविलेलें असतें ते प्राणी जरी अगदीं क्षुल्लक असले तरी देखील त्यांच्या सर्व क्लेशांची निवृत्ति होऊन त्यांना परमानंदाची प्राप्ति होत्ये. हे देवा, आमचा मनोरथ तर तूं जाणलाच आहेस. कारण, क्षुल्लक प्राण्यांच्याहि हृदयांमध्यें अंतर्यामिस्वरूपानें राहणारा तूं त्यांचे मनोरथ जाणतोस, मग तुझी उपासना करणाऱ्या आमचे मनोरथ तूं जाणणार नाहींस काय ? ॥ २९ ॥ आतां आमच्या मुखानें ऐकावें असें असेल, तर हे जगत्पालका, मोक्षमार्ग दाखविणारा आणि स्वतः पुरुषार्थरूपी असा भगवान् तूं ज्या आम्हांला प्रसन्न झालास त्या आम्हांला हाच इष्ट वर मागावयाचा होता ॥ ३० ॥ तथापि हे ईश्वरा, प्रकृतिरूप कारणाहूनहि श्रेष्ठ अशा तुज-पासून आम्ही एक वर मागून घेतों. हे देवा, तुझ्या विभूतींचा अंत नाहीं म्हणून लोक तुला अनंत असे म्हणतात. यावरून तूं पाहिजे तें देण्यास समर्थ आहेस व मागण्याजोग्या संपत्तीहि पुष्कळ आहेत ॥ ३१ ॥ तथापि भ्रमराला अनायासानें पारिजातक वृक्ष प्राप्त झाला असतां, तो जसा दुसऱ्या वृक्षाचा आश्रय करीत नाहीं, त्याप्रमाणें तुझ्या कृपेनें आम्हांला तुझें चरणसामीप्य प्राप्त झालें असतां, दुसरें आम्ही काय बरें मागावें ? ॥ ३२ ॥ यास्तव आतां आमची एवढीच प्रार्थना आहे कीं, तुझ्या मायेनें मोहित झालेले आम्ही आपल्या कर्मांच्या योगें करून या संसारामध्यें जोंपर्यंत भ्रमण करीत आहों, तोंपर्यंत प्रत्येक जन्मामध्यें आम्हांला तुझ्या भक्तांची संगति तरी घडो ! ॥ ३३ ॥ हे भगवन्, तुझ्या ठिकाणीं रत असणाऱ्या साधूंच्या समागमाच्या एका

क्षणाच्याहि बरोबरीनें आम्ही स्वर्गाची किंवा मोक्षाचीहि तुलना करीत नाहीं, मग त्याच्यापुढें मनुष्यांच्या राजभोगादि सुखांचा पाड काय आहे ! ॥ ३४ ॥ ज्या भगवद्भक्तांच्या समाजामध्यें विषयभोगासंबंधीं तृष्णेला शांत करणाऱ्या शुद्ध भगवत्कथांचें वर्णन चाललेलें असतें, जेथें प्राणिमात्रांविषयीं वैरभाव मुळींच राहत नाहीं, जेथें कोणत्याहि प्रकारचें भय असत नाहीं ॥ ३५ ॥ जेथें निरपेक्ष भगवद्भक्त, सत्कथांमध्यें संन्यासी लोकांचीहि परमगति अशा साक्षात् भगवान् नारायणाचें बारंवार स्तवन करीत असतात व जे गंगादिक तीर्थांना सुद्धां पवित्र करण्याच्या इच्छेनें आपल्या पायांनीं भूमीवर संचार करीत असतात, त्या तुझ्या भक्तांचा समागम, संसारापासून भ्यालेल्या जनाला कसा बरें आवडणार नाहीं ? ॥ ३६ ॥ ॥ ३७ ॥ सत्संगाच्या फलाचा अनुभव तर आम्हीं घेतच आहों, पाहा ! हे भगवन्, तुझा प्रियसखा जो शंकर त्याचा एक क्षणभर झालेल्या समागमाच्या योगानें अतिप्रयत्नानेंहि निवृत्त होण्यास अशक्य अशा जन्ममरणरूप रोगाची निवृत्ति करणारा जो उत्तम वैद्य तूं त्या तुला प्रत्यक्ष आज आम्ही शरण आलों आहों ॥ ३८ ॥ असो. हे ईश्वरा, पूर्वी आम्हीं जें कांहीं उत्तम अध्ययन केलें असेल, तसेंच गुरु, ब्राह्मण व वृद्ध यांस नित्य सेवेच्या योगानें जें प्रसन्न करून घेतलें असेल अथवा श्रेष्ठ जनांना, मित्रांना, बंधुजनांना आणि सर्व प्राणिमात्रांना दोषबुद्धि सोडून शुद्धभावानें जें वंदन केलें असेल ॥ ३९ ॥ तसेंच अन्नसुद्धां वर्ज्य करून पुष्कळ वर्षेंपर्यंत उदकामध्यें उभें राहून जें हें तप आम्हीं केलें, त्या आमच्या सर्व कर्मांनीं सर्वांतर्यामीं व सर्वव्यापक अशा तुला संतोष होवो, असाहि एक वर आम्हीं तुजपासून मागून घेतों ॥ ४० ॥ स्वायंभुवमनु, ब्रह्मदेव, महासमर्थ शंकर, तसेंच ' तप आणि ज्ञान यांच्या योगानें ज्यांचें अंतःकरण शुद्ध झालें आहे असे दुसरे ' कितीएक पुरुष तुझ्या महिम्याचा अंत जाणत नसतांहि ज्या अर्थीं यथामति तुझी स्तुति करितात, त्या अर्थीं, आम्हींहि आपली बुद्धि चालेल त्याप्रमाणें तुझीच स्तुति करितों ॥ ४१ ॥ हे भगवंता, तूं सर्व ठिकाणीं शत्रुमित्रादिभेदरहित, निर्दोष, सर्वांतर्यामी व सर्वोत्तम असा आहेस. यास्तव हे शुद्धस्वरूपा वासुदेवा, तुला वारंवार नमस्कार असो ! ॥ ४२ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें प्रचेत्यांनीं स्तुति केलेला, शरणागतवत्सल व अकुंठितशक्ति असा तो भगवान् हरि संतुष्ट होऊन ' तथास्तु ' असें म्हणाला आणि त्याच्या दर्शनाविषयीं प्रचेत्यांचे नेत्र तृप्त झाले नसल्यामुळें त्यानें जाऊं नये अशी ते इच्छा करीत असतांहि, तो आपल्या स्थानीं निघून गेला ॥ ४३ ॥ नंतर ते प्रचेते, सागराच्या उदकांतून जों बाहेर पडले तों आपल्या विस्तारानें स्वर्गाचा रोधच करीत आहेत कीं काय, अशा रीतीनें अतिरिक्त उंच वाढलेल्या वृक्षांनीं पृथिवी भरून गेलेली अवलोकन करून त्यांना त्या वृक्षांचा राग आला ॥ ४४ ॥ नंतर, हे राजा, त्या प्रचेत्यांनीं प्रलयकाळींच्या कालाग्निरुद्राप्रमाणें पृथिवीवरील सर्व वृक्ष व वल्लीही नाहींशा करून टाकण्याकरितां आपल्या मुखांतून अग्नि व वायु सोडून दिले ॥ ४५ ॥

तेव्हां त्यांच्यायोगानें जळून भस्म होत असलेल्या त्या वृक्षांना पाहून ब्रह्मदेव त्या ठिकाणीं प्राप्त झाला आणि त्यानें अनेक युक्तींनीं त्या प्राचीनबर्हिराजाच्या पुत्रांचें सांत्वन केलें ॥ ४६ ॥ तेव्हां त्या ठिकाणीं जे वृक्ष अवशेष राहिले होते, त्यांनाहि भीति होतीच, म्हणून त्यांनीं ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून आपली कन्या त्या प्रचेत्यांना अर्पण केली ॥ ४७ ॥ त्या प्रचेत्यांनींहि ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून वृक्षांनीं दिलेल्या त्या मारिषानामक कन्येशीं विवाह केला. पुढें तिच्या उदरीं दक्ष जन्मास आला ॥ ४८ ॥ चाक्षुष मन्वंतर प्राप्त झालें असतां ज्याचा पूर्वदेह कालगतीनें नाहींसा झाला, तोच हा प्रसिद्ध दक्ष होय. त्यानें परमेश्वराच्या प्रेरणेवरून आपल्या इच्छेप्रमाणें पुष्कळ प्रजा उत्पन्न केल्या ॥ ४९ ॥ तो जन्मास आला त्या वेळींच आपल्या कांतीनें सर्व तेजस्वी पुरुषांचें तेज त्यानें फिक्कें पाडिलें आणि आपल्या कर्मामध्यें तो निरंतर दक्ष असे; म्हणून त्याला सर्व लोक दक्ष असें म्हणूं लागले ॥ ५० ॥ त्याला ब्रह्मदेवानें अभिषेक करून प्रजांची सृष्टि व रक्षण करण्याच्या कामीं त्याची योजना केली असतां, पुढें दक्षानें, इतर सर्व प्रजापतींना, त्यांच्या त्यांच्या कामावर नेमिलें ॥ ५१ ॥

## तिसावा अध्याय समाप्त

---

# अध्याय ३१ वा

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, नंतर दिव्यमानानें दहा लक्ष वर्षें होऊन गेल्यावर ज्यांना विवेकज्ञान उत्पन्न झालें, असे ते प्रचेते 'तुम्ही इहपरलोकांविषयीं विरक्त होऊन माझ्या स्वरूपाला पावाल' असें अधोक्षज भगवंताचें भाषण स्मरण करून, तत्काल आपल्या भार्येला पुत्राच्या स्वाधीन करून घर सोडून निघून गेले ॥ १ ॥ त्यांनीं पश्चिम दिशेस समुद्रतीरीं जाऊन जेथें जाजलीनामक ऋषीला मुक्ति प्राप्त झाली होती, तेथें जाऊन ज्या योगें भूतांविषयीं 'हीं आत्मस्वरूपेंच आहेत' असें ज्ञान होतें, अशा ब्रह्मसत्राची दीक्षा घेतली ॥ २ ॥ पुढें प्राण, मन, वाणी आणि दृष्टि यांचें नियमन करणाऱ्या, आसनांचा जय करणाऱ्या, मूलाधारचक्रापासून मस्तकापर्यंत आपले सर्व अवयव शांत व निश्चळ धारण करणाऱ्या आणि शुद्ध परब्रह्माच्या ठिकाणीं आपलें मन लाविलेल्या प्रचेत्यांना, देवदैत्यांनीं स्तुति करण्यास योग्य अशा नारदऋषीनें अवलोकन केलें ॥ ३ ॥ तेव्हां नारदमुनि येत आहे असें पाहतांक्षणीं यांनीं त्याला उत्थापन देऊन वंदन केलें आणि येण्याची कृपा केल्याबद्दल आपला आनंद प्रदर्शित करून यथाशास्त्र त्याचें पूजन केलें. पुढें नारद स्वस्थ बसला असतां ते प्रचेते बोलूं लागले ॥ ४ ॥

प्रचेते म्हणाले,—हे देवर्षे, तुझें आगमन आमच्या कल्याणार्थच आहे. म्हणून आमच्या सुदैवानेंच तूं आमच्या दृष्टीस पडलास. कारण हे ब्रह्मनिष्ठा, जसें सूर्याचें दर्शन अंधकार घालवून लोकांची भयनिवृत्ति करतें, त्याप्रमाणें तुझें पर्यटन लोकांचें अज्ञान नष्ट करून त्यांची संसारभयनिवृत्ति करतें ॥ ५ ॥ हे समर्थ नारदमुने, भगवान् शंकरानें व श्रीविष्णूनें आम्हांला पूर्वी जें तत्त्वज्ञान सांगितलें होतें तें आम्हीं आज संसारांत आसक्त झाल्यामुळें विसरल्यासारखें झालें आहे; तरी तें आज भगवंताच्या स्वरूपाचा साक्षात्कार करणारें अध्यात्मज्ञान आम्हांला तूं पुनः सांग, म्हणजे त्याच्या योगानें आम्ही ह्या दुस्तर भवसागरांतून तरून जाऊं ॥ ६ ॥ ७ ॥

मैत्रेय म्हणाला,—हे विदुरा, याप्रमाणें प्रचेत्यांनीं प्रश्न केला असतां तो भगवान् नारदऋषि, उत्तमश्लोक अशा भगवंताच्या ठिकाणीं आपलें चित्त स्थिर करून त्या प्रचेतस् राजांना सांगूं लागला ॥ ८ ॥

नारद म्हणाला,—नृप हो, या संसारामध्यें ज्याच्या योगानें विश्वव्यापक श्रीहरीची सेवा घडत्ये, तोच जन्म खरा, तेंच आयुष्य उपयुक्त, तेंच मन थोर, तेंच भाषण उत्तम व तींच कर्में श्रेष्ठ होत ॥ ९ ॥ नाहीं तर ज्यांच्या योगानें श्रीहरि प्रसन्न होऊन भक्तांना आत्मस्वरूपाचा लाभ देत नाहीं, अशा 'शुद्ध मातापितरांपासून उत्पन्न होणें, उपनयन-

संस्कार घडणें व यज्ञाची दीक्षा प्राप्त होणें ' अशा तीन प्रकारच्या जन्मांचा किंवा वेदोक्त कर्मांचा अथवा देवांसारख्या पुष्कळ असलेल्या आयुष्याचा काय बरें उपयोग ? यमादिक योगसाधन, सांख्यज्ञान, वैराग्य, वेदांचें अध्ययन व इतरहि जीं दानतीर्थयात्रादिक कल्याणांचीं साधनें आहेत, त्यांचा सुद्धां उपयोग काय आहे ? ॥ १० ॥ ११ ॥ १२ ॥ कारण, विचार करून पाहिलें असतां, आत्म्याकरितांच इतर वस्तु प्रिय आहेत. सर्वप्रकारच्या कल्याणकारक फलांची पराकाष्ठा म्हणजे आत्माच होय. तसाच सर्व प्राणिमात्रांचा अंतर्यामी व त्यांच्या अविद्येचा निरास करून त्यांना आत्मप्राप्ति करून देणारा आणि परमानंदरूप असल्यामुळें सर्वांना अत्यंत प्रिय असा तो आत्मा म्हणजे हरीच होय ॥१३॥ ज्याप्रमाणें वृक्षाच्या मुळांत पाणी घातलें असतां त्याच्या मोठमोठ्या फांद्या, लहान लहान फांद्या, बारीक डहाळ्या, पुढें त्यांचा पत्रपुष्पादिक विस्तार हीं सर्वहि टवटवीत होतात किंवा भोजन केलें असतां जशी निरनिराळ्या सर्व इंद्रियांची तृप्ति होते, त्याप्रमाणें भगवान् अच्युताचें आराधन केलें असतां सर्व देवतांचें आराधन केल्यासारखें होतें ॥ १४ ॥ कारण ज्याप्रमाणें सूर्यापासून वर्षाकाळामध्यें जल उत्पन्न होतें आणि तें ग्रीष्मकाळामध्यें पुनः त्याच ठिकाणीं प्रविष्ट होतें किंवा जशीं स्थावरजंगमात्मक भूतें पृथ्वीपासून उत्पन्न होऊन शेवटीं तिच्या ठिकाणींच लय पावतात, त्याप्रमाणें हा चेतनाचेतनात्मक प्रपंच, सृष्टिकाळीं ज्या श्रीहरीपासून उत्पन्न होतो, त्याच श्रीहरीमध्यें तो प्रलयकाळीं लय पावतो ॥ १५ ॥ हें जग सृष्टिकाळीं जरी गंधर्वनगराप्रमाणें स्फुरण पावलें तरी तें भगवंताचें निरुपाधिक स्वरूपच आहे, त्याहून निराळें नाहीं. जशी सूर्यापासून उत्पन्न झालेली प्रभा निराळी भासली तरी ती वतुतः त्याहून निराळी नाहीं किंवा जशीं इंद्रियें जागृदावस्थेमध्यें निरनिराळीं स्फुरण पावलीं, तरी त्यांचा लय सुषुप्तीमध्यें आत्म्यांतच होतो, त्याप्रमाणें पंचमहाभूतें, शब्दादिक विषय, अकरा इंद्रियें व त्यांच्या देवता व त्यांचा भेदरूप भ्रम हा जरी सृष्टिकाळीं निरनिराळा स्फुरण पावला तरी त्यांचा लय भगवंतांतच होतो ॥ १६ ॥ हे प्रचेते हो, जसे आकाशामध्यें मेघ, अंधकार आणि प्रकाश हे अनुक्रमानें उत्पन्न होतात व लय पावतात; परंतु त्यांच्या योगानें आकाश लिप्त होत नाहीं; त्याप्रमाणें परब्रह्मामध्यें रज, तम आणि सत्त्व ह्या शक्ति कधीं कधीं उत्पन्न होतात व कधीं कधीं लय पावतात. अशा प्रकारें हा जगत्प्रवाह चालतो; तथापि त्यांच्या योगानें भगवान् लिप्त होत नाहीं ॥ १७ ॥ यास्तव सर्व प्राणिमात्रांचा आत्मा, जगाचें निमित्तकारण, उपादानकारण, कर्ता, ब्रह्मादिकांचाहि नियंता आणि आपल्या चिच्छक्तीच्या योगानें गुणप्रवाहरूप प्रपंचाचा निरास करणारा असा जो परमेश्वर, त्याचेंच तुम्ही आपल्या अंतर्यामीं स्फुरण पावणाऱ्या चैतन्यरूपी आत्म्याशीं कांहीं भेद न ठेवितां सेवन करा ॥ १८ ॥ सर्व भूतांवर दया करणें, प्रारब्धयोगानें जें प्राप्त होईल त्याच्या योगानें संतोष मानणें आणि सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवणें यांच्या योगेंकरून संसारनिवर्तक भगवान् शीघ्र प्रसन्न होतो ॥ १९ ॥ ज्यापासून सर्व कामना निरास पावल्या आहेत, अशा शुद्ध झालेल्या साधूंच्या मनामध्यें निरंतर वृद्धिंगत होणाऱ्या भक्तीनें स्थिर झालेला अविनाशी भगवान् ' मी भक्तजनांच्या स्वाधीन

आहे' असें म्हणतो आणि हृदयाकाश जसें आकाशापासून दूर होत नाहीं, तसा तो या साधूंच्या हृदयांतून केव्हांहि निघून जात नाहीं ॥ २० ॥ ज्याला लोकदृष्टीनें निर्धन परंतु स्वरूपानुभवरूप धनानें युक्त असे भक्तजन प्रिय आहेत व जो भक्तांचें प्रेमरूपीं भक्तिसुख जाणतो तो श्रीहरि विद्या, धन, कुल आणि कर्म यांच्या मदांनीं रहित अशा सज्जनांचा तिरस्कार करणाऱ्या दुष्ट कुबुद्धि पुरुषांनीं केलेला पूजेचा स्वीकार करीत नाहीं ॥ २१ ॥ तसाच जो निरंतर सेवा करणाऱ्या लक्ष्मीला किंवा तिची इच्छा करणाऱ्या राजांना किंवा देवांना अनुसरत नाहीं, तर आपल्या स्वरूपानंदानें परिपूर्ण असल्यामुळें आपल्या एकांत भक्तांच्या तंत्रानें वागत असतो, त्या परमेश्वराचा कोणता कृतज्ञ पुरुष त्याग करील बरें ? ॥ २२ ॥

मैत्रेय म्हणाला,— हे विदुरा, ह्याप्रमाणें कथन केलेल्या कथा व दुसऱ्या हि ध्रुवचरित्रादिक कित्येक भगवत्कथा त्या प्रचेत्यांना सांगून तो ब्रह्मपुत्र नारदामुनि ब्रह्मलोकास निघून गेला ॥ २३ ॥ नंतर ते प्रचेतेहि त्या नारदाच्या मुखांतून निघालेलें, लोकांच्या पापांचा नाश करणारें, असें तें हरीचें यश श्रवण करून, त्याच्या चरणांचें ध्यान करीत करीत वैकुंठलोकास गेले ॥ २४ ॥ हे विदुरा, तूं मला जें विचारलेंस, तें हें हरीच्या कथांनीं युक्त असें प्रचेते व नारद यांमधील संवादरूप आख्यान मीं तुला सांगितलें आहे ॥ २५ ॥

श्रीशुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्राजा, स्वायंभुवमनूला प्रियव्रत आणि उत्तानपाद असे दोन पुत्र होते. त्यांपैकीं उत्तानपादराजाचा हा वंश मीं तुला वर्णन करून सांगितला. आतां प्रियव्रतराजाचाहि वंश सांगतों तो श्रवण कर ॥ २६ ॥ त्या प्रियव्रतानें प्रथमतः नारदापासून आत्मविद्या संपादन करून नंतर पृथिवीचा उपभोग घेतला आणि तो पुत्रांना पृथिवीचे विभाग करून देऊन स्वतः ईश्वराच्या स्वरूपाला अनायासानें जाऊन मिळाला ॥ २७ ॥ हे राजा, ही मैत्रेयऋषीनें वर्णन केलेली भगवंताच्या माहात्म्यानें युक्त अशी उत्तम कथा श्रवण करून, भगवंताच्या ठिकाणीं प्रेमलक्षणाभक्ति प्राप्त झालेल्या व आनंदाश्रूंनीं व्याकूळ झालेल्या त्या विदुरानें मनांत हरीच्या चरणाचें ध्यान केलें आणि मैत्रेयऋषीच्या चरणांवर मस्तक ठेविलें आणि तो म्हणाला ॥ २८ ॥

विदुर म्हणाला,—हे महासमर्थ मैत्रेयऋषे, सदय अंतःकरण अशा तूं निष्किंचन भगवद्भक्तांना प्राप्त होणारा हरि ज्याच्या योगानें प्राप्त होतो, तो हा अज्ञानाचा पैलपार मला दाखविलास ॥ २९ ॥

श्रीशुकाचार्य म्हणाला,—हे राजा, याप्रमाणें भाषण करून संतुष्टचित्त झालेला तो विदुर, त्या मैत्रेयाला वंदन करून व त्याचा निरोप घेऊन आपल्या धृतराष्ट्रादिक बंधुजनांना

पाहण्याच्या इच्छेनें तेथून हस्तिनापुरास निघून गेला ॥ ३० ॥ हे राजा, हरीच्या ठिकाणीं आपलें चित्त अर्पण करणाऱ्या प्रचेतस्‌राजाच्या ह्या चरित्राचें जो पुरुष श्रवण करील, त्याला आयुष्याची वृद्धि, धन, यश, कल्याण व सद्गति हीं प्राप्त होतील ॥ ३१ ॥

**एकतिसावा अध्याय समाप्त**

**चौथा स्कंध समाप्त**

---